


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

ऑक्टोबर - नोव्हेंबर - डिसेंबर २००५

## 'उत्तर-नव' भारत

विकासाची विविध प्रतिमाने

### तीन कोडी

(१) खालील विधान चूक की अचूक ?

लोकशाही + समाजवाद

=

समाजवाद + लोकशाही

(२) खालील विधाने समान अर्थच दाखवतात का ?

(अ) लोकशाही ∝ समाजवाद

(ब) समाजवाद ∝ लोकशाही

(३) लोकशाही ⇄ समाजवाद

यातही 'उजवीकडे डावीकडे कोण ?' असा वाद उपस्थित करणे कितपत उचित अनुचित ?

या अंकातील विषयावरील चर्चासत्र दि० २७, २८ मे २००७ रोजी वाई येथे होईल.







अनुक्रमणिका

# तर मग आम्ही काय करावे ?

## ठाकुरदास बंग

ज्या काँग्रेसने प्रथम स्वातंत्र्य संग्राम केला तिने पुढे पाऊल टाकून द्वितीय स्वतंत्रता संग्राम करावयास पाहिजे होता. पण ते लोक थकले. म्हणून गांधीजींनी आपल्या शेवटच्या संदेशात सांगितले की आज आम्हाला फक्त राजकीय स्वतंत्रता मिळाली आहे, पण सामाजिक, आर्थिक आणि नैतिक स्वतंत्रता भारताच्या ७ लाख खेड्यांत प्राप्त करावयास हवी. यापासून काँग्रेस मागे हटली. विरोधी पक्ष एकटेएकटे वा एकत्र होऊन हे कार्य करण्यास तयार झाले नाहीत. भारतीय जनता दलालाही मतदारांनी केंद्रात मागील वेळी वा अनेक राज्यांत अनेकदा सत्तेत पाठविले. पण ते हे कार्य करू शकले नाहीत. निरनिराळ्या पक्षांना सत्ता देऊन मतदारांनी सत्तेवर पाठविले. पण त्यांनी या दृष्टीने कार्य केले नाही. गुजरातने तर ३ वर्षांपूर्वी अनेक जिल्ह्यात अल्पसंख्यांकांवर कहर केला. हे सर्वच विफल झालेत. आज काँग्रेसच्या प्रमुखत्वाखाली संयुक्त दलाचे केंद्रात राज्य आहे. त्यांनी सार्वजनिक माहितीचा अधिकार लोकांना देण्याचा व प्रत्येक कुटुंबास १०० दिवसांचे काम दरवर्षी देण्याचा कायदा केला आहे. पण व्यसनमुक्ती, पूर्ण रोजगार, विश्व व्यापार संघटनेद्वारा शेतकऱ्यांवर होणाऱ्या अन्यायाचा विरोध वा आत्महत्या रोकणे, दारूबंदी, विषमता कमी करणे, भ्रष्टाचारनिर्मूलन इ. महत्त्वाच्या बाबतीत कार्य केले नाही. स्त्रियांना विधानसभा व लोकसभेत १/३ स्थान देण्याचे १० वर्षांपासून भिजत पडलेले घोंगडे पूर्ववतच ठेवले आहे. नैतिक मूल्यांबाबत सर्व पक्ष समान आहेत. अशा नाजुक परिस्थितीत संकटमोचन रस्ता कोणता? अशा परिस्थितीत कोणी मोठा नेता वा समूह या आव्हानांचा सामना करू शकेल अशी संभावना दिसत नाही.

असे संघटित समूह उपलब्ध नाहीत तर मग सर्व देशभक्त एकत्र होऊन देशाच्या परिवर्तनाचा संकल्प, आपली शक्ती एकत्र करून का करत नाहीत? आज सज्जन सक्रिय नाहीत. भद्र वर्ग, बुद्धिवंत गुणवंत आपापला स्वार्थ, तंद्रा किंवा उपभोग सोडण्यास तयार दिसत नाहीत. आणि जनता गाढ झोपलेली आहे. या अशा नवीन सामन्यात सेवकांना जुन्या अंधश्रद्धा तर सोडल्याच पाहिजेत, आधुनिक अंधश्रद्धांचाही त्याग करावा लागेल. लोकशाहीत प्रयोगातून परिवर्तन हळूहळू पचत-पचत होते. तोपर्यंत काय शेतकऱ्यांच्या आत्महत्या चालू द्याव्यात? बेरोजगार व भुकेलेल्यांना हा प्रश्न बिचारल्यास त्यांचे उत्तर काय असेल? तोपर्यंत त्यांनी काय उपवास करावा? स्वातंत्र्यानंतर आता त्या प्रथम संग्रामामुळे निर्माण झालेला उत्साह, त्याची गती केव्हाच संपलेली आहेत. त्या संग्रामातील शेकडा ९० हून अधिक सैनिक परलोकास गेले आहेत. आणि सर्व दुष्कर्म आज उघड्या डोळ्यांनी सर्वांना पहावे लागत आहे. आम्ही काही करू शकत नाही, आम्हाला नेता हवा ही आधुनिक अंधश्रद्धा आहे. ती सोडावी लागेल. आमचे भले कोणी नेता करील - दुसरे कोणी करतील - सरकार करील, हा 'देईज्म' झाला. आम्हाला वी-इजम हवा. सर्वांत भयंकर गुलामी मानसिक गुलामी आहे. तिचे आपण आज बळी आहोत. आत्मविश्वासहीन पुढारी इतरांत आत्मविश्वास कसा जागवणार? आपण हे काम सर्व मिळून करू असा आत्मविश्वास जागवावा लागेल.

या लोकशाहीतील सुस्त गाडी गतिमान करण्यासाठी आपापले प्रेमक्षेत्र बनवून त्यांना आदर्श बनविण्याचे काम सुरू करावे लागेल. मधून-मधून एकत्र येऊन मूल्यांकन करून, पुढील पाऊल सर्व मिळून ठरवावे लागेल. आम्ही चूक करणार नाही व इतरांच्या चुकांना सहन करणार नाही असे मानस बनवावे लागेल. प्रेमक्षेत्रांतील युवक शक्ती, महिला शक्ती व अन्य जनशक्तीस जागविण्यासाठी त्यांचे प्रबोधन आणि त्याद्वारे रचनेचे काम करावे लागेल. दुर्भाग्य हे आहे की लोक आजच्या स्थितीने त्रस्त आहेत आणि तरीही हाच विचार करतात की या आपल्या समस्येचे उत्तर सरकार देईल - हे सरकार नाही तर ते सरकार देईल. जनतेचा सरकारवरून विश्वास उडाला आहे आणि तरीही सरकारने हे सर्व करावे असा विचार जनता करते. 'आम्ही हे करू' असा विचार जनता करीत नाही. सर्वांत मोठी शोकांतिका हीच आहे. आजचे संकट हे विश्वासाचे संकट आहे. म्हणून जनतेस समजवावे लागेल की हे काम आम्हासच करावयाचे आहे आणि हे आम्ही करणार. सरकारात सत्तेचे केंद्रीकरण हेच तर अनेक संकटांचे मूळ आहे. त्याला बदलविण्यासाठी पुन्हा त्याच सत्तेस शरण जाणे म्हणजेच सरकारलाच मजबूत करणे झाले. 'पराधिनहुं सपने सुख नाहीं' हा

(मुखपृष्ठ क्र. ३ वर)

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५९ । अंक १-२-३ । ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००५
प्रत्यक्ष प्रसिद्धी सप्टेंबर २००६
अश्विन-कार्तिक-मार्गशीर्ष शके १९२७
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची विशेष किंमत रु. ६०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियत-कालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.











अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



**लेखक परिचय :**

'नवभारत' च्या वाचक वर्गाला वरील नावे सुपरिचित आहेत. अधिक माहितीसाठी व/वा पत्त्यासाठी प्रा० देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.

# अतिथी संपादकीय

## देवदत्त दाभोलकर

भद्रम्
कर्णेभि:
श्रृणुयाम
देवा: ।

हा अंक सप्टेंबर २००६ च्या अखेरीस प्रसिद्ध होऊ शकला. गतवर्षीचा बॅकलॉग भरून काढावयाचे पूर्ण झाले. हा विलंब वाचकांनी सहानुभूतीपूर्वक सहन केला यासाठी 'नवभारत'ला कृतज्ञता वाटते.

या वर्षीचा नेहमीचा सप्टेंबरचा अंक हा यापूर्वीच काही दिवस प्रसिद्ध झाला आहे. त्याचा विषयही लोकशाही समाजवाद हाच आहे.

तो अंक प्रसिद्ध झाल्यानंतर लगेचच एका दक्ष वाचकाचे मला पत्र आले. ' तुम्ही या अंकाला 'लोकशाही समाजवाद' हे शीर्षक दिले आहे. परंतु त्यात सगळीकडे समाजवादच दिसतो. 'लोकशाही' कुठे आहे ? '

हे पत्र पाहून मला आनंद झाला. 'नवभारत'चा इतका दक्ष वाचक मिळाल्याचा तो आनंद होता. हा अंक योग्य क्रमाने प्रसिद्ध झाला असता तर हा घोटाळा झाला आहे असे त्या वाचकाला नक्कीच वाटले नसते.

हा पौर्वापर्याचा घोटाळा आहे. 'पौर्वापर्य' हा जड शब्द फक्त 'नवभारत'च पेलू शकतो. असे जड ओझे टाकून देण्याचा प्रयत्न 'नवभारत' उत्तर-नव भारत काळात करील अशी मला आशा आहे.

तसे हे जुने दुखणे आहे. 'पु०लं०'नी हे हेरले होते. सुरुवातीच्या दशकात दर महिन्याला संपादक प्रा० वि० म० बेडेकर लेखक हितचिंतकांची बैठक घेत असत. एकदा 'नवभारत' मधील लेखांचे हिंदीतही भाषांतर करावे असा विषय निघाला. पु०लं०नी सर्व चर्चा ऐकून घेतली आणि मिस्किलपणे म्हणाले, '- आणि मराठीतही भाषांतर करा.' ('नवभारत'च्या एका अंकाचा गतवर्षी हिंदी भाषिकांनी आपण होऊन आवर्जून हिंदीत अनुवाद केला हे कळून 'पु०लं०'ना मनापासून आनंद झाला असता असा माझा विश्वास आहे.)

असो. हा प्रकृतिधर्म आहे. सध्याच्या प्रकृतिधर्माला अनुसरून 'लोकशाही समाजवाद' या विषयावरील कृति-चर्चासत्र वाई येथे दि० २७ मे २००७ रोजी सकाळी १०.०० ते ५.०० या वेळात होईल. 'नवभारत' मधून ही चर्चा तशी तर निरंतरच चालू राहणे युक्त आहे.

❋ ❋ ❋

अनुक्रमणिका







# चर्चासत्रांविषयी

## 'उत्तर-नव' भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

संयोजक : नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही साभार स्वीकार करण्यात येईल.)

### सर्वसाधारण निवेदन

(हीरक वर्ष कालावधीसाठी, ऑक्टोबर २००६ ते ऑक्टोबर २००७.)

१. ही चर्चासत्रे प्राज्ञपाठशाळा, वाई किंवा अ०ल०दा० निकेतन, सातारा येथे आयोजित केली जातील.
२. मनि ऑर्डरने शंभर रुपये आल्यानंतर आपण येत आहात हे गृहित धरले जाईल व काही पूरक वाङ्मय पाठवावयाचे असल्यास पाठविले जाईल.
३. जाण्यायेण्याचा खर्च प्रत्येकाने आपापला करावयाचा आहे.
४. निवास-भोजनासाठी प्रतिदिनी रु. १२५ द्यावयाचे आहेत.
५. आधी व नंतरही एक दिवस याच पद्धतीने राहता येईल. मात्र पूर्वसूचना आवश्यक.
६. ज्यांना उपस्थित राहता येणे शक्य नसेल परंतु सहभागाची इच्छा असेल त्यांची टिपणे चर्चासत्रात सादर केली जातील.

संपर्कासाठी पत्ते -

सातारा चर्चासत्रांसाठी

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८
E-mail : ndabholkar@rediffmail.com

वाई चर्चासत्रांसाठी

**प्रा. यशवंत कळमकर**
**निवास :** २४१०-क, सोनगीरवाडी,
दूरध्वनी कॉलनी रस्ता, वाई ४१२८०३
दूरध्वनी : (०२१६७) २२२७०४
**कार्यालय :** सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई
दूरध्वनी : (०२१६७) २२०००६








# लोकशाही आणि सर्वोदय

श्री. शंकरराव देव

(नवभारत ऑगस्ट-सप्टेंबर १९५२)

भारताच्या व जगाच्या वर्तमान व भूतकालीन परिस्थितीचा सांगोपांग व दूरवर विचार करून या देशात लोकशाही राज्यपद्धती व संस्कृती यांची स्थापना करावयाची अशी आम्ही पवित्र प्रतिज्ञा केली आहे. या पवित्र प्रतिज्ञेची प्रेरणा आम्हाला पाश्चात्त्य व मुख्यतः आंग्ल सामाजिक व राजकीय विचार-आचारांपासून मिळाली आहे याबद्दल दुमत होण्याचा संभव नाही.

आमच्याइकडे वज्जी, मल्ल इत्यादिकांची गणसत्ताक राज्ये बुद्धाच्यावेळी अस्तित्त्वात होती. (स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेत प्रजासत्ताक 'गणराज्य'असा शब्द योजिलेला आहे.) हे जरी खरे असले, तरी ज्या अर्वाचीन लोकशाहीच्या संसाराचा मांड आम्ही मांडीत आहोत तिचे माहेर पाश्चात्त्य जग असून तिचे उगमस्थान शोधावयाचेच म्हटले तर ते प्राचीन ग्रीक नगरराज्यांतच सापडेल. ही प्राचीन ग्रीक राज्ये एक शहर व त्याच्या आजूबाजूचा थोडा प्रदेश यांची बनलेली असल्यामुळे ती लहान होती नागरिकांनी स्वतः आपला कारभार पाहणे ही कल्पना त्यात अभिप्रेत होती. पण अर्वाचीन लोकशाहीचा जन्म मोठमोठ्या देशात झालेला असून प्रातिनिधिक पद्धतीला बरोबर घेऊनच ती जवळजवळ जन्माला आली आहे असे म्हणावयास हरकत नाही. मात्र यामुळे 'जनतेचे स्वामित्व पण प्रतिनिधींचे प्रभुत्व' अशी अर्वाचीन लोकशाहीची व्याख्या करणे अपरिहार्य होऊ पाहत आहे.

### लोकशाहीची मूळ प्रेरणा ही नैतिक

आधुनिक युरोपातील लोकशाहीचा उदय व्यक्तिवादी तत्त्वज्ञानांतूनच झालेला आहे. धार्मिक, सामाजिक वगैरे जीवनाच्या सर्व क्षेत्रात व्यक्तीला विचारांचे व आचारांचे जसे संपूर्ण स्वातंत्र्य असले पाहिजे, तसेच प्रत्येक व्यक्तीला आपल्या गुणांचा पूर्ण उत्कर्ष करून घेण्यास समान व योग्य संधी आणि साधनसामग्री मिळाली पाहिजे हे स्वातंत्र्याचे व समतेचे दोन सिद्धांत या व्यक्तिवादाच्या बुडाशी आहेत. लोकशाहीची ही दोन फुफ्फुसे आहेत असे म्हणावयास हरकत नाही. सर्व माणसे सारखी आहेत आणि एखादे मत सत्य असेल आणि ते सत्य असल्याचा पुरावा माणसापुढे मांडला, तर त्याची बुद्धी निःपक्षपातीपणे त्या मताचा विचार करून आज ना उद्या त्याचा स्वीकार करील, ही तत्त्वे येथे गृहीत धरली आहेत. पण समता आणि विवेकबुद्धी या ज्या दोन गोष्टी येथे गृहीत धरल्या आहेत, त्या जगाच्या व्यवहारात सिद्ध झालेल्या नाहीत. त्या अजून साध्य करावयाच्या आहेत, हे लक्षात ठेवणे जरूर आहे. एकाच मातापित्यांची दोन अपत्ये घेतली तरीसुद्धा ती सारखी नसतात. मग दूरच्या दोन माणसांचा प्रश्न कशाला ? माणसांची शरीर, मन, बुद्धी वगैरे अंगे व त्यांचे गुण घेतले व त्यांची परीक्षा केली. तर त्यांच्यात हमखास विषमता आढळून येते. तसेच माणसांची बुद्धी नेहमी सत्य चटकन् ग्रहण करतेच असाही अनुभव नाही. जगात सुवर्णाने सत्याला झाकलेले आहे. ('हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्) सामान्य माणसाचीच काय, पण तथाकथित श्रेष्ठींची बुद्धीसुद्धा स्वार्थाने व लोभाने लडबडलेली असते. स्वार्थालाच परार्थ समजणे हा सामान्य बुद्धीचा जणु स्वभावच दिसतो! म्हणून समता व धर्म-अधर्म, कार्य-अकार्य यांच्यात विवेक करणारी बुद्धी ही ज्या लोकशाहीची साधने आहेत व साध्येही आहेत त्या लोकशाहीची मूळ प्रेरणा खरी नैतिक आहे हे विसरता कामा नये. संपूर्ण लोकशाहीच्या प्रस्थापनेसाठी लोकांमध्ये 'सर्वांच्या ठिकाणी स्वतःला पाहणे' ही वृत्ति व सत्यान्वेषिणी व सत्यनिष्ठ बुद्धी असणे जरूर आहे.

ज्या जीवनामुळे लोकांमध्ये ही समता वृत्ती व विवेकबुद्धी जागृत होऊन पोसली जाईल ते जीवनच खऱ्या अर्थाने लोकशाही जीवन म्हणता येईल. पण ज्या युरोपीय राज्यनीतिशास्त्रज्ञांनी व कार्यधुरंधर मुत्सद्यांनी अर्वाचीन लोकशाहीचे पालनपोषण केले त्यांचे लोकशाहीच्या या मूलगामी नैतिक अंगाकडे जावे तसे लक्ष गेलेले नाही असे खेदाने म्हणावे लागेल.

### 'शहाण्या स्वार्था' चे लोकशाहीला ग्रहण

अर्वाचीन लोकशाहीच्या जन्मस्थानी जे दोन ग्रह होते. 'त्यापैकी धार्मिक व सामाजिक क्षेत्रातील स्वातंत्र्य व समता यांच्यावर आधारलेला व्यक्तिवाद हा एक पुण्यग्रह होता; तर






दुसरा आर्थिक क्षेत्रांतील स्वातंत्र्य व समता यांच्यावर आधारलेला व्यक्तिवाद हा पापग्रह होता! आर्थिक क्षेत्रातील व्यक्तिवादाचे ध्येय वैयक्तिक सांपत्तिक भरभराट हे बनले. या व्यक्तिवादातूनच समाजाच्या आर्थिक व्यवहारावर वित्तरक्षण आणि कराराचे पालन याखेरीज कोणतीही राजकीय बंधने नसावीत हे अनियंत्रणाचे तत्त्व पुढे आले आणि प्रत्येकाने आपापले सुख संपादन करण्याचा प्रयत्न करीत राहिले म्हणजे व्यक्ती-व्यक्तीमध्ये जी अनिर्बंध स्पर्धा निर्माण होते तीमुळे एकंदर समाजाचे हित किंवा 'अधिकात अधिकांचे अधिकात अधिक सुख' आपोआप साध्य होते, हे घातक तत्त्व प्रसार पावू लागले. याचा परिणाम असा झाला की, या व्यक्तिवादास सुखवादाचे व त्यावर आधारलेल्या लोकशाहीला भांडवलशाहीचे स्वरूप प्राप्त झाले. सुखवादाचा परिणाम लोकशाही राष्ट्रातील लोक स्वार्थपरायण व सुखलोलुप बनण्यात झाला आणि भांडवलशाहीचा परिणाम साम्राज्यशाहीची तृष्णा वाढण्यात झाला. जेथे स्वार्थपरायणतेने व सुखलोलुपतेने बाजारपेठा काबीज केल्या तेथे नीतीची देवघेव कोण व कशी करणार ? तेथे भरभराट झाली तरी ती 'शहाण्या स्वार्था'चीच होणार! आज युरोपीय व अमेरिकन लोकशाही राष्ट्रांची नीति अथवा धर्म हा 'शहाणा स्वार्थ' च बनला आहे. शहाण्या स्वार्थाच्या नावाखाली अधर्मच धर्माच्या बुरख्याखाली उजळ माथ्याने वावरू लागला आहे व त्यामुळे लोकशाहीला ग्लानी आणि क्षीणता आली आहे.

धार्मिक व सामाजिक क्षेत्रातील बुद्धिप्रधान व्यक्तिवादाचा वैयक्तिक स्वार्थ आणि लोभ यांच्याशी काही संबंध नसून आत्मशुद्धी व सत्यशोधन हे त्यांचे साध्य आहे. परंतु राहून जसे चंद्राला त्याप्रमाणे या दोन व्यक्तिवादांना आर्थिक क्षेत्रातील तिसऱ्या व्यक्तिवादाने ग्रासून टाकले आहे. स्पर्धा व सुख यांवर आधारलेल्या तिसऱ्या प्रकारच्या व्यक्तिवादाच्या विषारी वायूने लोकशाहीची स्वतंत्रता व समता ही जी दोन फुफ्फुसे ती क्षीण करून टाकली आहेत. आज याचा परिणाम असा झाला आहे की, लोकशाही मृत्युशय्येवर पडलेली असून तिचा विनाशकाल जवळ येऊ लागला आहे.

### यंत्रप्रधान युगातील केंद्रीकरण

लोकशाहीला आणखीही एक गोष्ट विघातक ठरली आहे, तिचाही विचार करणे आवश्यक आहे. अर्वाचीन लोकशाहीला ज्या भांडवलशाहीचे स्वरूप प्राप्त झाले आहे, त्या भांडवलशाहीचे यंत्रप्रधान प्रचंड उद्योगधंदे हे अत्र आहे. या भांडवलशाहीने आपल्या वाढीबरोबर सत्तेचे अधिकाधिक केंद्रीकरण केले आहे व पक्षनिष्ठ राजकारणाला जन्म देऊन सत्तादानाच्या वा सत्तासंक्रमणाच्या राजकीय युगाला प्रारंभ केला आहे. पण पक्षनिष्ठ व सत्तासंक्रमणाच्या राजकारणाचा परिणाम आधुनिक लोकशाहीला आधुनिक लोकशाहीला अभावात्मक बनविण्यात झाला आहे. भांडवलशाहीप्रधान लोकशाहीत खऱ्या लोकसत्तेचा अभावच दिसून येतो. या लोकशाहीत सामान्य नागरिकांचा आत्मविश्वास व स्वावलंबन वाढण्याऐवजी त्यांची असहाय्यता व परावलंबनच वाढत आहेत. तसेच लोकशाही पक्षनिष्ठ बनल्यामुळे सर्वांचे सुख अथवा हित हे तिचे ध्येय न राहता बहुसंख्याकांचे किंवा अधिकांत अधिकांचे हित अगर सुख हे तिचे ध्येय बनले आहे. तसेच सध्याच्या पक्षनिष्ठ लोकशाहीत व्यक्तीला स्वतःच्या विवेकबुद्धीप्रमाणे वागण्याला क्वचितच वाव राहिला आहे. पक्षनिष्ठेने व्यक्ती इतकी भारली गेली आहे की तिच्या जीवनात विवेकाची जागा पक्षशिस्त व आज्ञापालन यांनी घेतली आहे. या शिस्तीमुळे व्यक्तीच्या जीवनात सत्यनिष्ठेचा हळूहळू लोप होत जाऊन व्यक्तीचा विकास हा जो लोकशाहीचा मूळ हेतू, तो विफल होऊ पहात आहे.

लोकशाहीवरील ही सर्व अरिष्टे टळून व्यक्तिविकास हा जो तिचा मूळ हेतू, तो सफल व्हावयाचा तर लोकशाहीची मूळ प्रेरणा नैतिक आहे या कल्पनेचे पुनरुज्जीवन झाले पाहिजे. आणि व्यक्तीची जीवनगंगा नैतिक मूल्यांच्या पवित्र पात्रांतून वाहू लागली पाहिजे.

धार्मिक व सामाजिक क्षेत्रांतील व्यक्तिवादाचा मूळ हेतू सत्यसंशोधनाने प्रत्येक माणसाला स्वतःची शुद्धी व उन्नती करून घेण्याला स्वातंत्र्य असावे व या बाबतीत सर्व माणसे सारखी मानली जावी हा आहे. उन्नती किंवा सुख म्हणजे केवळ शारीरिक किंवा भौतिक सुख, पैशाअडक्याचे सुख असा अर्थ मानण्यात येऊ लागला. म्हणून आर्थिक क्षेत्रातील व्यक्तिवादाला स्पर्धेचे स्वरूप प्राप्त झाले व स्वतःच्या किंवा पुष्कळांच्या सुखासाठी अगर उन्नतीसाठी इतर थोड्यांचे नुकसान करणे वा त्यांना दुःख देणे समर्थनीय ठरले. असे झाल्यामुळेच लोकशाही म्हणजे लोकांचे राज्य असे नाव राहिले, पण प्रत्यक्षात लोकांपैकी किंवा समाजापैकी काही लोकांच्या सुखासाठी अगर हितासाठी लोकशाहीला राबविण्यात येऊ लागले. सध्याची राजकीय पक्षपद्धती लोकशाहीचा सर्वांसाठी उपयोग न करता तिला काही थोड्यांच्यासाठी राबविण्याचे मुख्य साधन बनले आहे.

समाजातील व्यक्ती केवळ स्वसुखपरायणच असतात अथवा असणे शक्य आहे, स्वसुख म्हणजे पैशाच्या मानदंडाने मोजता येण्यासारखे आर्थिक वा भौतिक सुख आणि ते प्राप्त



अनुक्रमणिका

करून घेणे हीच मनुष्याची नैसर्गिक प्रवृत्ति आहे - या दोन सिद्धांतावर आधुनिक लोकशाहीची उभारणी झालेली आहे. पण हे दोन्हीही सिद्धांत फक्त काही अंशीच खरे आहेत. कारण मनुष्य म्हणजे केवळ शरीर नव्हे. शरीराप्रमाणे माणसाला मन, बुद्धी व आत्मा ही आहेत. म्हणून माणसाचे सुख किंवा उन्नती म्हणजे केवळ शारीरिक सुख किंवा भौतिक संपत्तीची प्राप्ती नव्हे, तर बौद्धिक व आत्मिक सुखाची व उन्नतीची प्राप्ती होय.

### राजकीय पक्ष ही आपत्ती

सद्‌गुणांचे संवर्धन करून व्यक्तीला सत्यसंशोधनाने आत्मोन्नती करून घेता येईल अशी परिस्थिती निर्माण करणे व त्याला तशी संधी देणे हेच कोणत्याही राज्यपद्धतीचे मुख्य ध्येय असले पाहिजे. याच अर्थाने लोकशाही राज्यपद्धती सर्व राज्यपद्धतीत श्रेष्ठ मानली गेली आहे. कारण, या राज्यपद्धतीत स्वतःसाठी अशी परिस्थिती निर्माण करण्याचे नागरिकांना जितके स्वातंत्र्य व सत्ता असते तितकी दुसऱ्या कोणत्याही राज्यपद्धतीत नसते असे गृहीत धरले आहे व अनुभवाने ते सिद्धही झाले आहे. असे असल्यामुळे लोकशाहीचा कारभार अशा रीतीने चालला पाहिजे की, त्यात आत्मक्लेषाने परस्परांची सद्सद्विवेकबुद्धी जागृत करून सद्भावजन्य व्यवहाराने एकमेकांची आत्मशक्ती जागृत करण्याला नागरिकांना जास्तीत जास्त उत्तेजन व संधी मिळाली पाहिजे. स्पर्धेवर आधारलेले पक्षनिष्ठ राजकारण या गोष्टींना प्रतिकूल आहे हे सांगायास नकोच.

सद्यःस्थितीत राजकीय पक्षपद्धती एक आवश्यक आपत्ति (necessary evil) मानली तरी 'सर्व नागरिकांना स्वातंत्र्य व समतेचा परस्परव्यवहार' हे लोकशाहीचे साध्य शीघ्र सिद्ध व्हावयाचे तर लोकांत सत्यनिष्ठा व प्रेमवृत्ती अधिकाधिक बाणत गेली पाहिजे हे विसरता कामा नये. हे कार्य राजकीय पक्षापेक्षा सर्वोदयी जीवनदृष्टीचा व जीवनपद्धतीचा ज्यांनी स्वीकार केला आहे, असे सत्याग्रही निष्ठेचे निःस्वार्थी सेवक सत्तानिरपेक्ष जनसेवेनेच अधिक करू शकतील. अशा सेवकांचा वर्ग जसजसा वाढत जाईल त्या मानाने राजकीय पक्षांचे प्रयोजनच (raison d'etre) असमर्थनीय ठरेल व एक काळ असा येईल की, त्यावेळी ते अंतर्धान पावतील.

राजकीय पक्षाच्या लोपाबरोबर बहुसंख्यांकांच्यासाठी लोकशाहीला राबवून घेण्याची अनिष्ट प्रथाही नाश पावून खऱ्या लोकशाहीला खरोखर अभिप्रेत अशा 'सर्वकल्याणकारी' समाजकारणाच्या व राजकारणाच्या शुभ युगाला प्रारंभ होईल.

◆◆◆

### लोकशाही समाजवाद

काँग्रेस आणि साम्यवाद या दोन भिन्न टोकांच्या विचारप्रणालीतून वेगळी अशी आपली स्वतंत्र राजकीय वाटचाल शोधण्याचा भारतीय लोकशाही समाजवादाचा प्रयत्न चालू आहे. सर्वोदयाच्या विचारसरणीबद्दलही त्याला आकर्षण आहे. थोडक्यात म्हणजे काँग्रेस, साम्यवाद आणि सर्वोदय अशा तिहेरी ताणांच्या मध्यबिंदूवर भारतीय समाजवाद उभा आहे. त्याला आर्थिक समता हवी आहे, राष्ट्रीय स्वत्वाचा अभिमान राखावयाचा आहे आणि त्याचबरोबर मानवमात्रावर प्रेम करून त्याचे मंगलही चिंतावयाचे आहे. काँग्रेस, साम्यवाद व सर्वोदय यांची कोणाच्याही एकाच्या आहारी जावयाची तयारी नाही. साम्यवाद लोकशाहीच्या गळ्याला आज ना उद्या नख लावणार याविषयी त्याची खात्री झाली आहे. आर्थिक समतेच्या दिशेने काँग्रेस झपाट्याने पावले टाकू शकत नाही, असा त्याला अनुभव येत आहे आणि सर्वोदयाच्या तत्त्वज्ञानात शास्त्रीय, ऐहिक व आधुनिकअसे फारच थोडे आहे, हे त्याच्या समाजवादी पिंडाला समजून चुकले आहे. पण एवढे सर्व झाले तरी, आपले स्वतंत्र धोरण आखून ते खंबीरपणे कार्यवाहीत आणण्याची कुवत अद्यापि या भारतीय समाजवाद्यात आलेली नाही; हेही नाकारता येत नाही. जरुरीपुरते या तिघांपैकी कोणाशीही सहकार्य करू, परंतु जुळणार नाही तेव्हा फटकून तडफेने बाजूला राहू; असे धोरण आखण्यासाठी जी वैचारिक व संघटनात्मक कुवत आणि अस्मिता लागते, ती भारतीय समाजवादाला प्राप्त झालेली नाही. याचमुळे भारतातील लोकशाही समाजवादी चळवळ, एकतर 'त्रिशंकुरिव अंतराले' लोंबकळत राहून निष्क्रीय बनली, किंवा या तिघांपैकी कोणाशी तरी सहकार्य करताना त्याच्या मागून फरफटत ओढली जाऊ लागली. हा विदारक अनुभव आहे. याचा दोष नेत्यावर येतो की भारतीय परिस्थितीवर; किंवा भारतीय जनमानसाच्या एकूण घडणीवर येऊन पडतो, हे सांगणे कठीण आहे. परंतु कोणत्याही कारणामुळे असले तरी शेवटी परिस्थिती मात्र वर लिहिल्याप्रमाणेच निर्माण झाली, ही गोष्ट अनेक समाजवादी नेतेही मान्य करतील.

परंतु, परिस्थितीचे असे विश्लेषण करण्यात लोकशाही समाजवादाच्या भवितव्याविषयी निराशावादी सूर काढण्याची दृष्टी नाही; आणि तसे निराश, साशंक किंवा उदास होण्याचे कारणही नाही. लोकशाही समाजवादाचे ध्येय - स्वाभाविक ध्येय, आंतरिक प्रेरणेने रुचणाऱ्या लोकांचा एक मोठा वर्ग समाजात निर्माण झालेला आहे, वाढत आहे.

**देवदत्त दाभोलकर : 'लोकशाही समाजवाद'**
(साधना प्रकाशन, १९६०. पृष्ठ ११४-११५)









# लोकशाही आणि समाजवाद

प्रा. गोवर्धन पारीख

(नवभारत जुलै १९५२)

भांडवलशाही अर्थव्यवस्थेचा ढासळणारा डोलारा आणि साम्यवादी समाजरचनेच्या प्रयोगाचा कटू अनुभव यांतून पुढे येऊ पाहणारी एक नवी प्रवृत्ति म्हणजे लोकशाही आणि समाजवाद यांचा समन्वय करण्याचा प्रयत्न ही होय. असा प्रयत्न केवळ भारतातच नव्हे तर जगातील इतर अनेक देशात सुरू आहे. या प्रयत्नांतील मूलभूत प्रश्न एका अर्थाने जुनाच आहे. तथापि परिस्थिती सतत वदलत असल्यामुळे जुने प्रश्न नव्याने उपस्थित करण्याची आणि वेगळ्या मार्गाने ते सोडविण्याचा प्रयत्न करण्याची आवश्यकता वेळोवेळी निर्माण होत असते. अशा प्रयत्नांमुळे त्या प्रश्नांच्या स्वरूपावरही प्रकाश पडतो आणि त्यांची मांडणीही बदलण्याचा संभव असतो. लोकशाही आणि समाजवाद यांच्या पारस्परिक संबंधाच्या बाबतीत अशा प्रकारच्या तपासणीची आवश्यकता निर्माण झाली आहे असे म्हणता येईल.

भारतीय राजकारणात लोकशाही आणि समाजवाद यांच्या समन्वयावर आधारलेला एक राजकीय पक्ष कार्य करत आहे. नुकत्याच झालेल्या सार्वत्रिक निवडणुकीत या पक्षाने अत्यंत हिरिरीने भाग घेतला असल्यामुळे या चर्चेत एक प्रकारचा ताजेपणा निर्माण होण्याचा संभव आहे. या दृष्टीने एक गोष्ट आरंभीच स्पष्ट करणे जरूर आहे. प्रस्तुत विषयाची चर्चा आणि समाजवादी पक्षाचे निवडणुकीतील अपयश यांचा संबंध या लेखात फारसा अभिप्रेत नाही. केवळ निवडणुकीतील यशापयशातून ही चर्चा उद्‌भवलेली नाही. विचारांची योग्यायोग्यता ही जरी निवडणुकीसारख्या अत्यंत गुंतागुंतीच्या राजकीय घटनेतील यशापयशाला अंशतः जबाबदार ठरत असली, तरी निवडणुकीतील यशापयश हे त्या योगायोगाचे सर्वस्वी विश्वसनीय गमक मानता येणार नाही. विचारांची कसोटी व्यवहारातच लागते हे जरी मान्य केले, तरी एखाद्या विशिष्ट व्यावहारिक घटनेला ते तत्त्व लागू करताना त्या घटनेचे स्वरूप, तिच्या विशिष्ट मर्यादा व कालानुक्रम इत्यादींचा विचार करणे आवश्यक असते. तसे न केल्यास जे यशस्वी तेच योग्य असे मानावे लागून वैचारिक क्षेत्रात मोठाच अनावस्था प्रसंग निर्माण झाल्यावाचून राहणार नाही. तात्पर्य, सार्वत्रिक निवडणुकीत समाजवादी पक्षाला जरी पुरेपूर यश मिळाले असते, तरीदेखील वर उल्लेख केलेल्या स्वरूपाच्या चर्चेची गरज शिल्लक राहिलीच असती. वैचारिक भूमिकेत दोष असल्यास यश हे अपयशापेक्षा देखील अधिक भयंकर ठरू शकते, हा अनुभव इतिहासात आढळतो.

**समन्वयामागील गृहीत भूमिका**

लोकशाही आणि समाजवाद यांच्या पारस्परिक संबंधांच्या चर्चेतील एक प्राथमिक अडचण म्हणजे या दोन शब्दांविषयीची होय. यातील लोकशाहीचा अर्थ स्पष्ट आहे. राजकीय क्षेत्रातील या शब्दामागील कल्पनेच्या अर्थासंबंधी भरपूर चर्चा झाली असून त्यायोगे त्यात निश्चितता, स्पष्टता आलेली आहे. या अर्थासंबंधी गोंधळ निर्माण करणाऱ्या कल्पना काही वेळा पुढे येतात, परंतु त्यातील तर्कदुष्टता चटकन् ध्यानात आल्यावाचून राहत नाही. उलट समाजवाद हा एक पडशी शब्द (Blanket term) बनला आहे. त्याच्या योगाने अनेक निरनिराळ्या कल्पना व्यक्त केल्या जातात. आणि यामुळे लोकशाही आणि समाजवाद यांच्या परस्परसंबंधाविषयी उलटसुलट विधाने करणे शक्य होते. या अडचणीतून बाहेर पडण्याचे दोन मार्ग संभवतात. पहिला मार्ग म्हणजे - लोकशाही आणि समाजवाद यांचा एखादा विशिष्ट संबंध गृहीत धरावयाचा; त्याला अनुलक्षून त्यात अभिप्रेत असलेला लोकशाही आणि समाजवाद या दोन्ही कल्पनांचा अर्थ स्पष्ट करावयाचा; तो अर्थ तपासून त्याला मान्यता देण्याच्या बाबतीत अडचणी असल्यास त्या विशद करावयाच्या; आणि त्या अडचणींच्या अनुषंगाने दोन्ही कल्पनांमधील गृहीत धरलेल्या संबंधाच्या स्वरूपावर परिणाम होत असल्यास तो कोणता हे स्पष्ट करावयाचे हा होय. दुसरा मार्ग म्हणजे लोकशाही आणि समाजवाद या दोन्ही कल्पनांची निश्चित व्याख्या वा अर्थ करून त्याच्या आधाराने त्यांच्या पारस्परिक संबंधाचे स्पष्टीकरण करणे हा होय. या दोन्ही मार्गांचा अवलंब केल्याने प्रस्तुत चर्चेची वैचारिक बैठक स्पष्ट व साफ होऊ शकेल, असे वाटते. आणि त्या योगाने प्रस्तुत प्रश्नावाबत पूर्वोत्तरपक्ष करणारांमधील मतभेदाचे क्षेत्रही संकुचित होऊन त्याचें स्वरूप 'अमुक शब्द अमुक अर्थाने वापरावयाचा की

नाही?' एवढ्यापुरतेच मर्यादित होण्याचा संभव आहे. अशा प्रकारचा मतभेद सहज मिटवता येण्यासारखा आहे असे वाटते.

वर उल्लेख केलेल्या दोन मार्गांपैकी पहिल्या मार्गाने प्रस्तुत प्रश्नाचा ऊहापोह करणे आरंभी उचित होईल. लोकशाही आणि समाजवाद यांचा समन्वय करणे शक्य आहे असे अनेकांचे म्हणणे आहे. या म्हणण्याचा आशय थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगता येईल : भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या अनिष्टतेबद्दल, ती कायम राहण्यात ज्यांचे हितसंबंध गुंतलेले आहेत ते व त्यांचे अंकित असलेले थोडेबहुत लोक यांच्या व्यतिरिक्त इतरांत मतभेद होण्याचे मुळीच कारण नाही. ही अर्थव्यवस्था उत्पादन साधनांच्या खाजगी मालकीवर आधारलेली असून नफा हा तिच्यातील आर्थिक उत्पादनाचा हेतू आहे. ही उत्पादन साधनांवरील खाजगी मालकी आणि त्यामुळे पर्यायाने खाजगी नफ्याची शक्यता नष्ट करणे हे समाजवादाचे कार्य होय. हीच आजची मूलभूत सामाजिक गरज आहे. ही गरज पुरी करण्यासाठी साम्यवाद 'कामगार-हुकमती'चा म्हणजे हुकुमशाहीचा मार्ग सांगतो. परंतु ते साधन अनिष्ट आहे. त्यामुळे मानवी स्वातंत्र्य धोक्यात येते. यासाठी हा बदल लोकशाहीच्या मार्गानेच घडवून आणला पाहिजे. बहुसंख्य जनतेस त्याची आवश्यकता पटवून दिली म्हणजे त्यांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्या बहुमताने तो घडवून आणणे सहज शक्य आहे. समाजवादी क्रांती घडवून आणण्याचे लोकशाही हेच योग्य साधन होय. अन्य साधनांचा, उदा. सशस्त्र बंडाचा, उपयोग केल्यावर त्याचे क्रांतीवर - समाजवाद्यांस ज्या प्रकारची समाजरचना करावयाची आहे त्या साध्यावर अनिष्ट परिणाम घडून आल्यावाचून राहणार नाहीत. साम्यवादी समाजरचनेच्या प्रयोगाने हे स्पष्ट केले आहे. म्हणून लोकशाहीच्या मार्गानेच समाजवादी क्रांती घडवून आणणे इष्ट होय. लोकशाही आणि समाजवाद यांच्या समन्वयाची शक्यता मान्य करणारांच्या विचारसरणीतील ही मध्यवर्ती कल्पना होय असे म्हणता येईल.

या समन्वयात समाजवादाचा अर्थ 'ज्या समाजव्यवस्थेत उत्पादनसाधनांवरील खाजगी मालकी नष्ट करण्यात येऊन ती सामाजिक वा राज्याच्या मालकीची करण्यात आली आहे, ज्यात खाजगी नफ्याच्या हेतूने संपत्तीचे उत्पादन होत नसून अधिकाधिक प्रमाणात सामाजिक गरजा पुऱ्या करण्याच्या हेतूने ते होत आहे अशा प्रकारची वर्गविहीन समाजरचना' असा आहे. आणि लोकशाहीचा अर्थ 'लोकप्रतिनिधींच्या बहुमताचे राज्य' असा आहे. प्रतिनिधींच्या बहुमत निर्णयाने वर उल्लेख केलेल्या स्वरूपाचे बदल घडवून आणणे शक्य असल्यामुळे लोकशाही आणि समाजवाद यांचा समन्वय शक्य आहे. समाजवादावर आधारलेले सामाजिक जीवन प्रस्थापित करण्याचे आणि त्याचा विकास करण्याचे लोकशाही हेच इष्ट साधन होय, असा वरील शक्यतेतून आग्रह निर्माण होतो. लोकशाही आणि समाजवाद यांच्या या विशिष्ट अर्थांची आणि त्यांच्या समन्वयाची शक्या-शक्यता व योग्यायोग्यता थोडीशी काळजीपूर्वक तपासून पाहणे आवश्यक आहे.

### लोकशाहीत बहुमताच्या राज्याबरोबर

लोकप्रतिनिधींच्या बहुमताने एखादा विशिष्ट सामाजिक बदल घडवून आणणे म्हणजे तो लोकशाहीच्या मार्गाने घडवून आणणे होय, हे विधान केवळ तांत्रिक स्वरूपाचे आहे. लोकशाही हा तांत्रिक अर्थ जरी क्षणभर मान्य केला, लोकशाही म्हणजे लोकप्रतिनिधींच्या बहुमताचे राज्य हे जरी मान्य केले, तरी त्यात अल्पमताची बहुमताच्या निर्णयास मान्यता आणि प्रचार, संघटन आणि अन्य लोकशाही मार्गांनी बहुमत बनविण्याचे अल्पमताचे अबाधित स्वातंत्र्य या दोन्ही गोष्टी अभिप्रेत आहेत. 'बहुमताचे राज्य' या कल्पनेइतकीच 'अल्पमताचे स्वातंत्र्य' ही मूलभूत कल्पना आहे. 'लोकशाही आणि बहुमताचे राज्य' हे मान्य करणारे देखील या कारणास्तव 'बहुमताचे राज्य म्हणजे लोकशाही' हे म्हणणे मान्य करावयास तयार होणार नाहीत. तांत्रिक अर्थाने देखील लोकशाही कायम टिकवण्यासाठी, समाजरचनेच्या मूलभूत सिद्धांताबाबत बहुमत व अल्पमत यांत जर मौलिक मतभेद असतील, तर मोठीच अडचण निर्माण होण्याचा संभव आहे. समाजवादाच्या मूलभूत सिद्धांताबाबत अशा प्रकारचे एकमत होणे कठीण असल्यामुळे समाजवादाला मिळणाऱ्या पाठिंब्याच्या वाढीबरोबरच तांत्रिक लोकशाहीच्या संस्थांवरील ताण वाढत जाणे शक्य आहे, किंबहुना अपरिहार्य आहे! बहुमताच्या निर्णयाला अल्पमताची मान्यता मिळण्याची शक्यता, अल्पमतवाल्यांना आपले बहुमत करण्याचे व त्यायोगे ते निर्णय बदलण्याचे स्वातंत्र्य कितपत आहे, यावरही अवलंबून राहील. हे स्वातंत्र्य म्हणजे प्रचार व संघटनद्वारा जेथे उत्पादनसाधने सामाजिक वा राज्याच्या मालकीची आहेत अशा समाजव्यवस्थेत प्रस्थापित व्यवस्थेवर टीका करण्याचे, खाजगी मालकीचे इष्टत्व व श्रेष्ठत्व प्रतिपादन करण्याचे व लोकशाही मार्गाने त्या व्यवस्थेत बदल घडवून आणण्याचा प्रयत्न करण्याचे स्वातंत्र्य होय. या भूमिकेस विशेष पाठिंबा मिळू शकणार नाही. खाजगी मालकीचे सामाजिक मान्यतेतून उद्‌भवणारे नैतिक अधिष्ठान आता नाहीसे होऊ लागले आहे. हा मुद्दा याठिकाणी अप्रस्तुत आहे. तांत्रिक

अर्थाने देखील लोकशाही कायम ठेवावयाची झाल्यास विरोधकांचे हे स्वातंत्र्य मान्य करणे व अबाधित राखणे आवश्यक आहे. अगदी मूलभूत स्वरूपाच्या विरोधकांशीसुद्धा लोकशाही पद्धतीनेच वागणे म्हणजेच विरोध करण्याचा त्यांचा हक्क मान्य करणे, हे लोकशाही श्रद्धेचे एक महत्त्वाचे गमक आहे. उलट, अशा प्रकारचे स्वातंत्र्य समाजवादास विघातक आहे हे उघड आहे. विरोधी विचार हा योग्य असण्याचा संभव आहे म्हणून तो दडपून टाकण्यात सामाजिक हानी संभवते, चुकीच्या वा अयोग्य विचारांचा सामना बरोबर व योग्य विचारांनीच केला पाहिजे, अन्य मार्गांनी नव्हे - ही कल्पना लोकशाही श्रद्धेच्या मुळाशी आहे. उलट, विरोधी विचारांच्या बाबतीत योग्यायोग्यतेचा प्रश्न उद्‌भवू शकत नाही; वर्गाच्या विशिष्ट हितसंबंधातूनच निरनिराळ्या विचारसरणी जन्माला येतात; खाजगी मालकीचे अनिष्टत्व या कल्पनेत खाजगी मालकीचे इष्टत्व प्रतिपादन करणाऱ्या विचारसरणीचे अनिष्टत्व देखील सामावलेले आहे; म्हणून पहिली गोष्ट नष्ट करणे याचा अर्थ दुसरीही नष्ट करणे असाच केला पाहिजे; हीच भूमिका समाजवादाच्या सिद्धांतास अनुसरून घ्यावी लागेल. ज्या समाजव्यवस्थेत उत्पादनसाधनांची खाजगी मालकी नष्ट झाली आहे, त्या व्यवस्थेत खाजगी मालकीचे इष्टत्व प्रतिपादन करणारा विचारच उद्‌भवू शकणार नाही, हा युक्तिवाद अगदीच फोल आहे. एक तर हा बदल लोकशाहीच्या मार्गाने घडवून आणण्यात आला असल्यामुळे एके काळी खाजगी मालकी असलेले लोक समाजात राहणारच. दुसरे म्हणजे तांत्रिक लोकशाहीच्या मर्यादा सांभाळावयाच्या म्हणजे साम्यवादात संभवतो तशा प्रकारचा लोकांच्या विचारात एकमार्गीपणा (conditioning)आणता येणार नाही. आणि तिसरे म्हणजे विचारांच्या उद्‌भूतीला अशा प्रकारे मर्यादा घालता येत नाहीत. तात्पर्य, तांत्रिक लोकशाहीच्या मार्गाने जरी समाजवादाची स्थापना करता आली, तरी प्रस्थापित झालेल्या समाजवादास तांत्रिक लोकशाहीच्या मर्यादा सांभाळता येणे अशक्य आहे. वास्तविकपणे तांत्रिक लोकशाहीच्या मार्गाने समाजवाद प्रस्थापित तरी करता येईल की नाही हाही एक प्रश्नच आहे!

**समाजवादी अर्थव्यवस्थेत लोकशाहीला मुरड**

आता याच प्रश्नाकडे थोडेसे दुसऱ्या दिशेने पाहू. उत्पादनाची साधने राज्याच्या मालकीची झाली म्हणजे त्यांचा उत्पादनकार्यातील उपयोग राज्याच्या निर्णयानुसारच होणार हे उघड आहे. या उपयोगाच्या कार्यक्षमतेच्या दृष्टीने त्यासंबंधीच्या धोरणात निश्चिती व स्थिरता असणे सामान्यतः अत्यंत जरूरीचे आहे. या दृष्टीने हे कार्य लोकप्रतिनिधींकडे सोपविण्याऐवजी तज्ज्ञांच्या एखाद्या समितीकडेच सोपविणे अधिक योग्य म्हटले पाहिजे. म्हणजे तज्ज्ञांच्या म्हणण्याला मान डोलावणारे प्रतिनिधी कायदेमंडळात निवडून आले पाहिजेत किंवा आर्थिक व्यवहार व धोरण लोकप्रतिनिधींच्या अधिकाराच्या कक्षेबाहेर तरी ठेवली पाहिजेत. हे दोन्ही मार्ग लोकशाहीस मुरड घालणारे आहेत हे उघड आहे. या बाबतीत सामान्य धोरण ठरविण्याचा अधिकार प्रतिनिधींकडे आणि त्याच्या तपशीलाचे स्वरूप निश्चित करण्याचे कार्य तज्ज्ञांकडे, अशा तऱ्हेच्या विभागणीवर आधारलेला युक्तिवाद करता येणे शक्य आहे. परंतु सगळी उत्पादनसाधने राज्याच्या मालकीची झाली आणि त्यासंबंधीचे निर्णय घेण्याची जबाबदारी राज्यावर आली की, अशा प्रकारचा धोरण व तपशील यांत फरक करणे तितकेसे सोपे व निश्चित राहणे अशक्य आहे. शिवाय, धोरणाचे तपशीलात रूपांतर योग्य रीतीने झाले की नाही हे पाहण्याची जबाबदारी अंतिम अर्थाने प्रतिनिधींकडेच राहणार हे मान्य केले म्हणजे त्या बाबतीतील अस्थिरता व अनिश्चितता यांपासून मुक्त होता येणे अत्यंत कठीण आहे. या बाबतीत 'गिल्ड' - समाजवाद्यांच्या निरनिराळ्या सूचनांवरील टीकाही ध्यानात ठेवणे जरूर आहे. तात्पर्य, लोकशाहीत आवश्यक असलेला लोकप्रतिनिधींचा अधिकार कायम ठेवावयाचा म्हणजे अर्थव्यवस्थेच्या कार्यक्षमतेत बाध येणे अपरिहार्य आहे. शिवाय, उत्पादनप्रयत्न हा सामाजिक गरजा अधिकाधिक प्रमाणात पुऱ्या करण्याच्या हेतूने आहे असा दावा प्रस्तुत अर्थव्यवस्थेत असल्यामुळे, त्यासंबंधीची टीका व त्यास विरोध यांना नैतिक गुन्ह्याचे स्वरूप प्राप्त होणे संभवनीय आहे. तथापि, ही कल्पना लोकशाहीशी पूर्णपणे विसंगत आहे. लोकशाहीस मान्यता दिली म्हणजे राज्याच्या दंडकांना नैतिक दंडकाचे स्थान देता येणार नाही. उलट, समाजवादाच्या आर्थिक व्यवहाराची ती एक महत्त्वाचे गरज बनण्याचा संभव आहे. तात्पर्य, समाजवादी अर्थव्यवस्थेत आर्थिक व्यवहाराच्या गरजेतून लोकशाहीस मर्यादा वा मुरड घालण्याची आवश्यकता निर्माण होणे अपरिहार्य आहे. ही गरज पुरी न झाल्यास आर्थिक व्यवहारात कार्यक्षमता येऊ शकणार नाही. तो सुरळीतपणे चालणार नाही. अशा तऱ्हेची मुरड समाजवादाच्या स्थापनेनंतर घालण्यात येईल अथवा घालणे अपरिहार्य होईल, म्हणून समाजवादाच्या स्थापनेबद्दल चर्चा करीत असताना त्याचा विचार करण्याची गरज नाही असे यावर म्हणण्यात येईल. परंतु ते योग्य नाही. समाजवादाची स्थापना हे एखाद्या विशिष्ट कालक्षणी घडणारे कार्य नसून एका ऐतिहासिक कालखंडात घडणारे कार्य






आहे. आणि त्या ऐतिहासिक कालखंडात वरील प्रकारची मुरड घातली जाणे अपरिहार्य होणे म्हणजे लोकशाही आणि समाजवाद यांचा समन्वय होऊ शकत नाही याची कबुलीच होय.

**सामान्य नागरिकाची असहायता**

आतापर्यंतच्या विवेचनात सामान्यतः लोकशाहीची तांत्रिक कल्पनाच गृहीत धरली आहे. आता या कल्पनेच्या अपुरेपणाकडे थोडेसे लक्ष देणे जरूर आहे. लोकप्रतिनिधींच्या बहुमताने प्रस्थापित होणारा निर्णय हा लोकशाहीचा निर्णय होय हे मान्य केल्यास, हुकुमशाहीदेखील लोकशाहीच्या मार्गाने प्रस्थापित करता येऊ शकते, असे मान्य करावे लागेल. विसाव्या शतकातील हुकुमशाह्या ह्या अल्पमताच्या हुकुमशाह्या नसून बहुमताच्या हुकुमशाह्या आहेत हे ध्यानात घेतले पाहिजे. आधुनिक हुकुमशाहीची प्रवृत्ति बहुसंख्य जनतेला राजकारणापासून परावृत्त करण्याकडे नसून तिला राजकारणात ओढण्याकडेच आहे. या बाबतीत आणखीही एक मुद्दा विचारात घेतला पाहिजे. 'कामगारहुकुमती'चे पुरस्कर्तेदेखील, ती हुकुमत बहुसंख्यांकांची असल्यामुळे ती हुकुमशाही नसून खरीखुरी लोकशाहीच आहे, असे तिचे समर्थन करताना आढळतात. लोकशाही म्हणजे बहुमताचे राज्य अशी केवळ तांत्रिक व्याख्या मान्य केल्यास ह्या समर्थनास उत्तर देणे कठीण आहे. या तांत्रिक व्याख्येत आणखीही काही दोष शिल्लक राहतातच. त्यातील एक मुख्य दोष प्रतिनिधित्वाच्या कल्पनेतच आढळतो. तांत्रिक लोकशाहीतील प्रतिनिधित्व हे वास्तविकपणे प्रतिनिधित्व नसून प्रभुत्व असते. सामान्यतः दोन निवडणुकांच्या दरम्यानच्या काळात निवडून दिलेल्या प्रतिनिधींवर सामान्य जनतेचा कोणत्याही प्रकारचा ताबा असत नाही. यामुळे 'जनतेने केलेले सत्तादान' असा प्रतिनिधित्वाचा अर्थ ठरतो; आणि लोकसत्तेऐवजी प्रतिनिधीसत्ता अस्तित्वात येते. सत्तेचे केंद्रीकरण होते आणि सामान्य नागरिकाच्या आत्मविश्वासाऐवजी त्याची असहायताच वाढीस लागते. ही असहायता नाहीशी करून राज्याच्या सामर्थ्यात प्रत्येक नागरिकास आत्मसामर्थ्याचीच वाढ आणि आविष्कार होत आहे असा प्रत्यय येऊ शकेल अशी परिस्थिती निर्माण होणे केवळ राजकीय दृष्टीनेच नव्हे तर नैतिक दृष्टीनेदेखील अत्यंत आवश्यक आहे. नैतिक दृष्ट्या स्वतःचे इष्टत्व आणि श्रेष्ठत्व कायम ठेवावयाचे झाल्यास लोकशाहीने सत्तेच्या केंद्रीकरणाचा प्रश्न सोडविला पाहिजे. तांत्रिक लोकशाहीत हा प्रश्न सुटू शकत नाही. तिच्या संस्थात्म सांगाड्यात सत्तेचे केंद्रीकरण कायम राहते हा तिच्यातील एक मूलभूत दोष आहे. शिवाय, पक्षसंघटना, निवडणुकीचे तंत्र इत्यादींचा प्रतिनिधित्वावर परिणाम होतो तो निराळाच! तात्पर्य, तांत्रिक लोकशाहीच्या संस्थांचे स्वरूप सदोष आणि अपुरे आहे ही गोष्ट स्पष्ट झाली आहे.

**रोगांपेक्षा त्यावरील उपाय अधिक भयंकर!**

ही सदोषता आणि अपूर्णता लोकशाहीच्या मूल्यांच्या दृष्टीने आहे, इतर प्रकारच्या राजकीय संघटना वा संस्थांच्या दृष्टीने नव्हे. नैतिक दृष्ट्या तर राहोच, परंतु साध्या कार्यक्षमतेच्या दृष्टीनेदेखील हुकुमशाहीतील शासनसंस्था लोकशाही संस्थेपेक्षा अधिक चांगल्या असतात की नाही हा एक प्रश्नच आहे. होत असलेल्या चुका विशेष हानीकारक ठरण्यापूर्वी टीकास्वातंत्र्यामुळे त्या सुधारल्या जाण्याची संभाव्यता हुकुमशाहीत असू शकत नाही. उलट चुका व त्यामुळे होणारी हानी यांचे प्रमाण प्रत्यही वाढत जाण्याचाच संभव असतो. आणि म्हणूनच हुकुमशाहीतील कार्यक्षमता आणि त्यामुळे प्राप्त होणारे यश हे व्यापक व टिकाऊ स्वरूपाचे असू शकत नाही. कार्यक्षमतेच्या दृष्टीनेदेखील दूरवरचा व व्यापक स्वरूपाचा विचार केल्यास लोकशाही शासन पद्धतीचेच श्रेष्ठत्व अनुभवास येते. परंतु ज्या लोकशाहीच्या मूल्यांवर या संस्थांची उभारणी झाली आहे ती मूल्ये प्रत्यक्ष जीवनात, दैनंदिन व्यवहारात अनुभवण्याच्या दृष्टीने त्या संस्था सदोष व अपूर्ण आहेत. याचा अर्थ त्यांची सुधारणा वा पुनर्रचना करण्याची गरज आहे असा होतो; त्या कुचकामाच्या आहेत वा अन्य प्रकारच्या शासनसंस्था त्यांच्यापेक्षा चांगल्या होत असा नव्हे!

वरील विवेचनाच्या पार्श्वभूमीवर समाजवादाचा विचार केल्यास त्याच्या योगाने लोकशाहीचा मूलभूत प्रश्न सुटण्याऐवजी तो अधिकच कठीण व तीव्र स्वरूपाचा होईल. उत्पादन साधनांवरील खाजगी मालकी नष्ट करून ती सरसहा राज्याच्या मालकीची केल्याने सत्तेचे केंद्रीकरण अधिकच वाढणे अपरिहार्य आहे. रोगापेक्षा त्यावरील उपाय अधिक भयंकर असावा अशी या मार्गाबाबतची काही अंशी अवस्था आहे! त्याचा स्वाभाविक परिणाम लोकशाही नष्ट होणे हाच होय. आर्थिक विषमता आणि सामाजिक अन्याय, उत्पादनसाधने राज्याच्या मालकीची केल्याने, दूर होऊ शकतात ही आशा प्रत्यक्ष अनुभवाने फोल ठरली आहे. विषमता आणि अन्याय नाहीसे होण्याऐवजी नव्या प्रकारची आणि अधिक कडक (rigid) स्वरूपाची विषमता आणि अधिक भयंकर स्वरूपाचे अन्याय राज्याच्या मालकीतून उद्भवू शकतात आणि समता व न्याय प्रस्थापित होण्याऐवजी ती

मृगजलवत् ठरतात असा हा अनुभव आहे. मालकी प्रस्थापित केली जाईल तिच्यावर हे अवलंबून असते. लोकशाहीच्या चौकटीत ही मालकी प्रस्थापित झाल्यास, वरील दुष्परिणाम टाळता येतील असे यावर म्हटले जाईल. परंतु या युक्तिवादात जे सिद्ध करावयाचे तेच गृहीत धरले असल्यामुळे तो निरुपयोगी आहे. एकतर लोकशाहीच्या चौकटीत अशा प्रकारची मालकी प्रस्थापित होणे कठीण; आणि दुसरे म्हणजे अशा रीतीने ती प्रस्थापित झाली तरी ती टिकविण्याच्या आणि त्या आधारावर आर्थिक जीवनाची संघटना करण्याच्या प्रयत्नात लोकशाहीस मुरड घातली जाणे अपरिहार्य आहे. उत्पादनसाधनांत श्रमशक्तीचाही अंतर्भाव होतो आणि तीही राज्याच्या मालकीची करण्याची आवश्यकता निर्माण होते; म्हणजेच व्यवसायस्वातंत्र्यास मुरड घालावी वागते. अखेरीस हा क्रम मानवी मेंदूपर्यंत - विचारशक्तीपर्यंत गेल्यावाचून राहत नाही. तात्पर्य, समाजवादामुळे लोकशाहीतील आजचा मूलभूत प्रश्न सुटण्याऐवजी तो अधिकच कठीण होऊन अखेरीस त्या योगाने लोकशाहीच नष्टहोण्याची अधिक शक्यता आहे.

## दोन भिन्न, स्वतंत्र, परस्परविरोधी जीवनदृष्टी

वरील विवेचनावरून लोकशाही म्हणजे प्रातिनिधीक शासनयंत्राचा सांगाडा व समाजवाद म्हणजे उत्पादनसाधनांवरील खाजगी मालकीऐवजी राज्याची मालकी प्रस्थापित करणारा आर्थिक बदल, असे समजणे अपुरे व म्हणून चुकीचे आहे, हे सहज लक्षात येते. लोकशाही आणि समाजवाद या दोन भिन्न, स्वतंत्र व परस्परविरोधी स्वरूपाच्या जीवनदृष्टी आहेत. एक व्यक्तिप्रधान असून दुसरी समुदायप्रधान आहे. एकीत व्यक्तीचे सार्वभौमत्व मान्य केले जाते, तर दुसरीत ते स्थान व्यक्तिनिरपेक्ष समुदायास दिले जाते. एकीत व्यक्तीची विवेकशीलता हा मानदंड मानला जातो, तर दुसरीत व्यक्तिनिरपेक्ष सामुदायिक हित ह्याला ते स्थान देण्यात येते. या ठिकाणी या दोन दृष्टिकोनांशी 'वैयक्तिक' व 'सामाजिक' वा 'व्यक्तिनिष्ठ' व 'समाजनिष्ठ' या दोन कल्पनांची गल्लत करता कामा नये. व्यक्तिनिष्ठेत समाजनिष्ठा म्हणजे इतर व्यक्तींच्या हिताबद्दलची दक्षता ही अंतर्भूत होऊ शकते. म्हणून समाजहिताची जाणीव तिच्यात राहत नाही असा आक्षेप लोकशाहीविरुद्ध घेणे व्यर्थ आहे. समाजहित हे व्यक्तिहितात अंतर्भूत होते. समाजविरोध हा एका परीने आत्म-विरोध होऊ शकतो. इतरांशी अयोग्य वर्तन हे आत्मघातकी ठरू शकते. तात्पर्य, व्यक्तिनिष्ठेत समता, सामाजिक न्याय, समाजहिताबद्दलची जबाबदारी ही सर्व अंतर्भूत होऊ शकतात.

परंतु समुदायप्रधान विचारसरणीबद्दल असे म्हणता यावयाचे नाही. व्यक्तिनिरपेक्ष समाजात अंतर्भूत होणाऱ्या व्यक्तींहून वेगळे, स्वतंत्र असे समुदायाचे अस्तित्व हा त्या विचारसरणीचा पाया आहे. त्यामुळे समुदायाचे अस्तित्व हे त्यातील व्यक्तींचे मिळून बनत नाही. उलट, त्या व्यक्ति त्यांत विलीन होतात. सामाजिक घटनांच्या इष्टानिष्टतेचा निकष व्यक्ती न राहता समुदाय हा तो निकष बनतो. आणि त्याची निश्चितता नाहीशी होते. अशा दोन मूलतः भिन्न, परस्परविरोधी दृष्टी लोकशाही आणि समाजवाद या कल्पनांनी व्यक्त केल्या जातात.

## लोकशाही मूल्यांवरील श्रद्धेला आवाहन

गेल्या काही काळात आर्थिक प्रश्न दिवसेंदिवस तीव्र स्वरूप धारण करीत आहे असे म्हणावयास हरकत नाही. आर्थिक जीवन समृद्ध करण्याची शक्यता वैज्ञनिक दृष्टीने प्रत्यही वाढत आहे. सतत सुधारणारे राहणीचे मान ही एक जीवनातील मूलभूत गरज आहे या विषयीची जाणीवही दिवसेंदिवस अधिक व्यापक, तीव्र व बलवान होत आली आहे व अजूनही होत आहे. त्या मानाने प्रत्यक्ष घडलेली सुधारणा असमाधानकारक वाटणे स्वाभाविक आहे. या असमाधानामुळे राजकीय क्षेत्रातील तांत्रिक समता ही अपुरी वाटणे, तिचा विकास आर्थिक व सामाजिक क्षेत्रांतही झाला पाहिजे अशी इच्छा बळावणे साहजिकच आहे. त्यातच, प्रस्थापित भांडवलशाही अर्थव्यवस्थेत होणारा प्रत्येकाचा स्वहिताचा व्यवहार हा आपोआप समाजहितासही पोषक बनतो ही श्रद्धा त्या अर्थव्यवस्थेच्या पुरस्कर्त्यांच्या ठिकाणी देखील फारशी आढळत नाही. उलट, आर्थिक व्यवहारांत वेळोवेळी आरिष्टे, बेकारीची वाढ, उत्पादनाची मुद्दाम केली जाणारी गळचेपी, साधनसामग्रीचा उपयोग करण्याची असमर्थता इत्यादी समाजहिताच्या दृष्टीने अनिष्ट स्वरूपाच्या अनेक घटना उद्भवतात आणि त्यांचे निराकरण करण्यासाठी राज्याने आर्थिक व्यवहारांत हस्तक्षेप करणे अपरिहार्य होते. याविषयी आता फारसा मतभेद आढळत नाही. भांडवलशाही अर्थव्यवस्था आर्थिक प्रश्न योग्य रीतीने सोडवू शकत नाही. बहुसंख्य जनतेला दारिद्र्य, बेकारी, उपासमार व जीवनातील अनिश्चितता यांपासून मुक्त करू शकत नाही यासंबंधी देखील अनेकांचे एकमत होईल. परंतु आर्थिक प्रश्न म्हणजे लोकशाहीच्या मूल्यांवरील श्रद्धेला आवाहन आहे, लोकशाहीने तो सोडविला पाहिजे हीच त्याकडे पाहण्याची योग्य दृष्टी होय. त्यांतून लोकशाहची कल्पना अधिक व्यापक व सखोल करण्याची आवश्यकता व्यक्त होते. आर्थिक प्रश्न समाधानकारक रीतीने लोकशाहीवरील श्रद्धेशी सुसंगत व

तिला पोषक अशा मार्गाने सोडविण्याची जबाबदारी येते.

वर उल्लेख केलेल्या मार्गाने तो प्रश्न कसा सोडवता येईल, यासंबंधी समाजवाद मार्गदर्शन करू शकत नाही. तो सोडविण्याची संभाव्यता ज्यात आहे अशा एका विशिष्ट मार्गाचे समाजवाद आग्रहाने प्रतिपादन करतो. लोकशाहीचे त्या मार्गात केवळ एक साधन म्हणूनच स्थान आढळते. तिचा तांत्रिक उपयोग करून समाजवाद आणणे हे आर्थिक प्रश्न सोडविण्यासाठी एक आवश्यक कार्य बनते. अर्थात समाजवाद हे एकदा अंतिम ध्येय म्हणून मान्य केले म्हणजे मार्गाचा प्रश्न, साधनविचार हा गौण समजला जाणे अपरिहार्य आहे. अंतिम साध्याकडे नेणारे सारेच मार्ग, सारीच साधने इष्ट समजली पाहिजेत. 'शक्य तो' लोकशाहीच्या मार्गाने समाजवाद स्थापन करावयाचा अशा अर्थाची विधाने समाजवादी लेखनात जी वेळोवेळी आढळतात, त्यांचे खरे मर्म हेच आहे. साम्यवादाची भूमिका यापेक्षा मूलभूत अर्थाने फारशी भिन्न आहे असे नाही. अर्थात, त्या भूमिकेत लोकशाही आणि समाजवाद यांचा समन्वय कोठेच येत नाही हे निराळे सांगण्याची गरज नाही.

## समाजवादी विचारांतील सैलपणा

आर्थिक प्रश्नाकडे पाहण्याच्या व तो सोडविण्याच्या समाजवादी मार्गातील अडचणी व धोका सोव्हिएट रशियाच्या अनुभवावरून स्पष्ट होतात. प्रस्तुत धोक्याची समाजवादास पूर्ण जाणीव असून त्यामुळे या बाबतीत सोव्हिएट रशियावर टीका समाजवादाने केली आहे असे म्हटले जाईल. परंतु येथे टीका सोव्हिएट रशियावर की मार्क्सवादावर, हा खरा प्रश्न आहे. रशियावरील टीका आज निरनिराळ्या दृष्टिकोनांतून होत आहे, त्याचप्रमाणे मार्क्सवादाचेही अनेक टीकाकार आहेत. यामुळे समाजवादी टीकेचे स्वरूप स्पष्ट होणे जरूर आहे. सामान्यतः समाजवादाची प्रवृत्ती वर्गयुद्धांतील हिंसात्मक साधनांचा उपयोग सोडल्यास मार्क्सवाद मान्य करण्याकडे, परंतु रशियातील त्याचा आविष्कार आणि त्यात मिसळलेली राष्ट्रवादी प्रवृत्ति व तिचे अन्य राष्ट्रांवर होणारे परिणाम हे अनिष्ट, त्याज्य आहेत असे म्हणण्याकडे आहे. या भूमिकेमुळे रशियन राष्ट्रवादाच्या इतरत्र होणाऱ्या परिणामांपासून बचाव होणे शक्य आहे; परंतु रशियातील समाजरचनेच्या प्रयोगाचा अनुभव व त्यातील दोष यांची पुनरावृत्ती टाळता येणार नाही. भांडवलशाही अर्थ-व्यवस्थेची कार्ल मार्क्सने केलेली समीक्षा समाजवाद मान्य करतो. राज्य, धर्म, नीती, कायदा, कला, विज्ञान इत्यादीविषयक विचार हे वर्गनिष्ठतेचे द्योतक आहेत, त्यांना स्वतंत्र अस्तित्व नसून वर्गकलहावर आधारलेल्या भांडवलशाही समाज-व्यवस्थेतील उत्पादनपद्धतीचीच ती प्रतिबिंबे आहेत असे समाजवाद मानतो, राज्य हे आर्थिक जीवनात पिळवणूक करणाऱ्या वर्गाच्या हातातील पिळल्या जाणाऱ्या वर्गाला ताब्यात ठेवण्याचे, दडपून टाकण्याचे एक जुलुमाचे साधन आहे असे समाजवाद समजतो आणि प्रस्थापित समाजव्यवस्थेत बदल घडवून आणण्यासाठी वर्गयुद्ध हाच एकमेव मार्ग होय अशी निष्ठा बाळगतो. असे जर असेल, तर समाजवादाच्या सामाजिक बदल घडवून आणण्याच्या प्रयोगापासून रशियातील अनिष्ट वाटणारा अनुभव दूर ठेवता येणार नाही. वर्गयुद्धाच्या योगाने सामाजिक बदल घडवून आणणे ही कल्पना लोकशाहीशी विसंगत आहे. राज्य हे वरिष्ठ वर्गाच्या हातातील जुलुमाचे साधन ही व्याख्या लोकशाहीत वसू शकत नाही. या दोन्ही गोष्टी टाळावयाच्या म्हणजे मार्क्सवादाची भांडवलशाही अर्थव्यवस्थेची समीक्षा आणि त्यातील वैचारिक सृष्टीला उत्पादनपद्धतीच्या प्रतिबिंबाचे दिले जाणारे वर्गनिष्ठ स्वरूप ही मान्य करता यावयाची नाहीत. समाजवादी विचारात या बाबतीत बराच वैचारिक सैलपणा आढळून येतो. तो नाहीसा होऊन मार्क्सवादाविषयीची भूमिका स्पष्ट होणे अत्यंत आवश्यक आहे. मार्क्सवाद मान्य करून साम्यवादी म्हणून निश्चित स्वरूपात असलेल्या विचार-सरणीतील आपणास न आवडणाऱ्या प्रमेयांपासून सुटका करून घेता यावी यासाठी मार्क्स व एंगेल्स यांच्या लेखनांत इकडे-तिकडे एखादे-दुसरे पत्र, वाक्य वा उद्‌गार शोधीत बसल्यानेही कार्यभाग साधणार नाही. मार्क्सवादाची मूलभूत भूमिका स्पष्ट आहे. तिच्यातील सामाजिक जीवनासंबंधीची काही प्रमेये वर स्थूलमानाने मांडली आहेत. त्यांच्यामागे इतिहासाची एक विशिष्ट उपपत्ति असून ती उपपत्ती एका विशिष्ट विश्वविषयक तत्त्वज्ञानातून निघते, असा मार्क्सवादाचा सिद्धांत आहे. यांतील कोणताही एखादा विशिष्ट भाग इतरांची समीक्षा केल्यावाचून टाकता येत नाही. हे सारे सिद्धांत परस्परांशी निगडित, परस्परावलंबी असून त्या सर्वांचे मिळून जीवनाचे एक संपूर्ण तत्त्वज्ञान बनते.

## हृदयपालट व्यक्तीचाच. वर्गाला हृदय नाही!

मार्क्सवादाची समीक्षा न करता तो सर्वस्वी मान्य करून त्यातील वर्गयुद्धाच्या तंत्रातील हिंसेचा भाग काढून त्याऐवजी त्यात अहिंसात्मक प्रतिकाराची म्हणजे सत्याग्रहाची कल्पना घालून मार्क्सवादात इष्ट तो फरक करण्याचा प्रयत्न समाजवादी विचारांत आढळतो. वर्गयुद्ध अहिंसात्मक प्रतिकाराच्या म्हणजे

अनुक्रमणिका

सत्याग्रहाच्या मार्गाने केले म्हणजे मार्क्सवादात आक्षेपार्ह असे काही राहत नाही. उलट, मार्क्सवाद हा त्या योगाने लोकशाहीशी सुसंगत होतो. असा या सुधारणेचा अर्थ सांगण्यात येतो. या ठिकाणी गांधीवादातील सत्याग्रहाच्या तंत्राचा विस्ताराने विचार करता येणार नाही तसा तो करण्याची गरजही नाही. एकच महत्त्वाचा मुद्दा स्पष्ट करणे जरूर आहे व तो म्हणजे सत्याग्रह व वर्गयुद्ध या कल्पना परस्परविरोधी असल्याने त्या एकत्र आणता येणार नाहीत हा होय. सत्याग्रहाची वैचारिक बैठक भारतीय अध्यात्मवादाची आहे. त्याच्या मुळाशी आध्यात्मिक अर्थाने का होईना परंतु व्यक्तिनिष्ठताच आहे. व्यक्तीच्या सत्प्रवृत्तींना आवाहन देणे. हृदयपालट व्यक्तीचा होऊ शकतो; वर्गाला हृदय असत नाही. वर्गाविरुद्ध वा पद्धतीविरुद्ध सत्याग्रह हा केवळ प्रतीकात्मक स्वरूपातच संभवतो. त्या योगाने त्या पद्धतीत मूलभूत फरक घडून येणे संभवत नाही. वर्गकलहामागील वैचारिक भूमिका मान्य केली म्हणजे सत्याग्रहाचे तंत्र त्याच्या मुळाशी असलेल्या तात्त्विक बैठकीपासून अलग केल्यावाचून त्याचा वर्गकलहासाठी अवलंब करता येत नाही. आणि अशा रीतीने ते अलग केले म्हणजे त्याचा अवलंब हा विशिष्ट परिस्थितीत अवलंबावयाच्या धोरणाचा फार तर एक भाग होऊ शकेल; त्याला तात्त्विक स्वरूप येऊ शकणार नाही. आणि परिस्थित्यनुसार धोरणात बदल करणे अपरिहार्य ठरते, हे उघड आहे. तात्पर्य, सत्याग्रहाच्या तंत्राचा अवलंब हा मार्क्सवादात सुधारणा घडवून आणू शकत नाही; मार्क्सवाद व गांधीवाद यांचा त्यायोगे समन्वयही होऊ शकत नाही. फक्त 'शक्य तो शांततेच्या मार्गाने' या साम्यवादी धोरण वाक्यार्थाचा तो एक स्पष्टसा भाग होऊ शकतो इतकेच! यावर वर्ग हा व्यक्तींचाच बनलेला असल्यामुळे व्यक्तीच्या प्रतिकाराचे जे साधन होऊ शकते ते वर्गाच्या प्रतिकारार्थही उपयोगात आणता येईल असा युक्तिवाद केला जाईल. परंतु या युक्तिवादात मार्क्सवादातील व समाजवादातील समूहाविषयीची समुदायप्रधान वा सावयवत्वाची कल्पना दृष्टीआड केली जाते. म्हणून हा दृष्टिकोन समाजवादाशी मूलतः विसंगत आहे.

## मार्क्सवादातील दोष

आर्थिक प्रश्न सोडविण्याच्या समाजवादी मार्गातील अडचणी व धोके यांची अशा रीतीने स्थूल स्वरूपांत मांडणी केल्यानंतर, आता लोकशाहीस मान्यता देण्याच्या परिणामांचा थोडक्यात विचार करू. लोकशाहीस मान्यता दिली म्हणजे मार्क्सवादाची प्रेरणा फार तर मान्य करता येईल; परंतु त्या विचारसरणीची मात्र समीक्षाच करवी लागेल. दारिद्र्य, विषमता सामाजिक अन्याय यांविरुद्ध उभारणाऱ्या मार्क्सवादाची मूळ प्रेरणा नैतिक आहे यात शंका नाही. परंतु त्या प्रेरणेने प्रवृत्त झाल्यानंतर मार्क्सवादात शिरलेला पहिला महत्त्वाचा दोष म्हणजे मानवामानवांत त्याने केलेली विभागणी हा होय. या विभागणीवर वर्गयुद्धाच्या कल्पनेची उभारणी झाली आहे. व्यक्तीबद्दल व्यक्ती म्हणून आदर हा त्या विभागणीत बसू शकत नाही. म्हणून वर्गयुद्धाची कल्पना टाकून देणे आवश्यक ठरते. येथे दोन गटांतील वा वर्गांतील हितविरोधाचा 'वस्तु' (fact) म्हणून विचार अभिप्रेत नसून, समाजरचना बदलण्याच्या कार्याचे वर्गयुद्ध हे साधन म्हणून अभिप्रेत आहे, हे ध्यानात ठेवले पाहिजे. त्याचप्रमाणे लोकशाहीस मान्यता द्यावयाची म्हणजे राज्याच्या स्वरूपाबद्दल मार्क्सवादी विचार हाही सोडावा लागतो. तो विचार अराज्यवादाशी जुळणारा आहे, लोकशाहीशी नव्हे. राज्य हे जुलमाचे साधन आहे, राज्याचे अस्तित्व आहे तोवर मानवी स्वातंत्र्य अस्तित्वात येऊ शकत नाही. जेथे स्वातंत्र्य आहे तेथे राज्य असू शकणार नाही - ही मार्क्सवादाची विचारपद्धती आहे. ती मान्य केल्यास लोकशाहीस मान्यता देता येत नाही. मार्क्सवादातील या दोन गोष्टी त्याज्य म्हणून टाकताना वैचारिक क्षेत्रासंबंधीचा मार्क्सवादी दृष्टिकोनही टाकावा लागतो आणि भांडवलशाहीच्या मार्क्सवादी टीकेची समीक्षा करणे अपरिहार्य बनते. भांडवलशाही अर्थव्यवस्थेवरील मार्क्सवादी टीका ही मूलतः तात्त्विक (Metaphysical) भूमिकेवरून केलेली आहे, शास्त्रीय (Scientific) भूमिकेवरून नव्हे, हे लक्षात घेणे जरूर आहे. या टीकेमुळे विरोधविकासाच्या तात्त्विक भूमिकेत भांडवलशाही अर्थव्यवस्था बसविली गेली आणि उत्पादन साधनांवरील खाजगी मालकी हा त्या अर्थव्यवस्थेतील एकमेव दोष ठरला. परंतु हे दोषदर्शन एकांगी तात्त्विक दृष्टिकोनाचे द्योतक आहे, वस्तुनिष्ठ शास्त्रीय दृष्टिकोनाचे द्योतक नव्हे! 'उत्पादनसाधनांवरील खाजगी मालकी' असे म्हटल्याने या प्रश्नाचे स्वरूप स्पष्ट वा सुलभ होते असे नाही. प्रस्तुत लेखासाठी वापरण्यात येणारा कागद आणि टाकदेखील उत्पादन साधनेच आहेत. शिवाय, या बाबतीत आणखीही एक प्रश्न शिल्लक राहतोच. व्यक्तीची श्रमशक्ती आणि विचारशक्ती ही देखील उत्पादनाचीच साधने आहेत. त्यांवरील खाजगी मालकी नाहीशी करणे हे सर्वंकष स्वरूपाच्या हुकुमशाहीवाचून अशक्य आहे. परंतु उत्पादनसाधनांवरील खाजगी मालकी सरसहा नाहीशी करावयाची म्हणजे हा मार्ग अपरिहार्य आहे. लोकशाहीस मान्यता देणाराला मात्र तो स्वीकारणे अशक्य आहे. तात्पर्य, खाजगी

मालकी नष्ट करण्याचा, सरसहा राष्ट्रीयीकरण करण्याचा समाजवादी विचार हा लोकशाहीशी सुसंगत विचार नाही.

आर्थिक क्षेत्रातील विकेंद्रीकरण हे राष्ट्रीयीकरणाशी सुसंगत होऊ शकत नाही. केवळ 'उत्पादनकार्यातील विकेंद्रीकरण' एवढाच अर्थ करणे योग्य होणार नाही. तसा अर्थ केल्यास साम्यवादी अर्थव्यवस्था ही देखील विकेंद्रीकरणावरच आधारलेली आहे असे म्हणावे लागेल. कोणत्याही अर्थव्यवस्थेत प्रत्यक्ष उत्पादन कार्याचे केंद्रीकरण काही विशिष्ट मर्यादांपलीकडे जाऊ शकत नाही. उत्पादनतंत्राचा विचार केल्यास या मर्यादा पुष्कळच अरुंद असतात. कित्येक बाबतीत दसपट मोठा कारखाना म्हणजे दसपट मोठी यंत्रे असलेला कारखाना नसून दहा यंत्रांचा कारखाना अशीच परिस्थिती आढळते. तात्पर्य, आर्थिक प्रश्न हा मूलतः तांत्रिक क्षेत्र बाजूस सोडले म्हणजे सत्तेचा प्रश्न आहे आणि अनेकांची सत्ता नाहीशी करून ती राज्याच्या हाती दिल्याने तो समाधानकारकपणे सुटेल अशी आशा बाळगणे व्यर्थ आहे.

### मार्क्सवादी टीकेतील अंतर्विरोध

या बाबतीत भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या मार्क्सवादी टीकेतील एक महत्त्वाचा आंतर्विरोध ध्यानात घेणे जरूर आहे. मार्क्सवादाच्या आर्थिक दृष्टिकोनाची उभारणी 'खाजगी मालमत्ता ही चोरी आहे' या कल्पनेवर झाली आहे, असा समज आहे. तो वरवर जरी योग्य वाटत असला, तरी त्याच्या मुळाशी त्या मालमत्तेवरील कोणाच्या तरी हक्कास नैतिक मान्यता देणे भाग आहे, हीच कल्पना आढळते. खाजगी मालकीचे नैतिकत्व मान्य केल्यावाचून शोषणाची कल्पनाच संभवत नाही. मानवामानवात विभागणी करणाऱ्या मार्क्सवादातही स्वतःच्या श्रमाने निर्माण केलेल्या संपत्तीवर श्रम करणाऱ्याचाच नैतिक हक्क आहे, हे सर्वव्यापी नीतितत्त्व आढळतेच. म्हणूनच मालकीच्या नैतिक अनिष्टतेऐवजी तिच्यात होणाऱ्या परिवर्तनाबाबतच्या ऐतिहासिक दृष्टिकोनावर मार्क्सवादाची उभारणी झाली आहे. मात्र या ऐतिहासिक दृष्टिकोनातून ज्या प्रकारचे खाजगी मालमत्तेचे परिवर्तन मार्क्सवाद प्रतिपादन करतो त्या परिवर्तनाच्या योगाने वरील सर्वव्यापी नीतितत्त्वास अधिक प्रमाणात बाध आल्यावाचून राहत नाही, हे आता अनुभवाने सिद्ध झाले आहे. म्हणून खाजगी मालमत्तेची संपूर्ण (absolute) अनिष्टता प्रतिपादन करणारा विचार त्याज्य ठरविताना मार्क्स-वादातील मूलभूत सर्वव्यापी नीतितत्त्वाला विरोध वा त्या नीतितत्त्वाचा त्याग लोकशाही करत नाही. फक्त मालमत्तेतील विशिष्ट स्वरूपाच्या परिवर्तनाचा मार्क्सवादातील व समाजवादातील आग्रह हा त्या नीतितत्त्वास अधिक बाधक असल्याने लोकशाही तो त्याज्य ठरवते, हे ध्यानात घेतले पाहिजे.

### राष्ट्रीयीकरणात तारतम्याची भूमिका आवश्यक

वैयक्तिक सत्तेस मुरड घालून वा ती नाहीशी करून राज्याच्या वा शासनसत्तेच्या ती हवाली करणे हे मानवी सांस्कृतिक विकासाचे एक महत्त्वाचे लक्षण आहे. असे केल्याने सत्तेचा उपयोग विशिष्ट नियमांनुसार होऊ लागतो व त्यायोगाने प्रत्येकाच्या स्वातंत्र्यविकासास साहाय्य होते. म्हणून राष्ट्रीयी-करणाबाबत अभावात्मक वा पूर्णतः विरोधी दृष्टिकोन स्वीकारणे चुकीचे होईल. वरील विवेचनात अशा तऱ्हेची भूमिका मुळीच अभिप्रेत नाही, हे निराळे सांगण्याची गरज नाही. राष्ट्रीयीकरण सरसहा स्वीकारणे जसे त्याज्य, तसेच त्यास सरसहा विरोध करणेही त्याज्यच म्हटले पाहिजे. खाजगी मालमत्ता नष्ट करण्याच्या वा राष्ट्रीयीकरणाच्या बाबतीतील लोकशाहीची ही भूमिका त्या मालमत्तेत ज्यांचे हितसंबंध गुंतले आहेत अशांच्या विचाराहून अगदी भिन्न आहे, हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. राष्ट्रीयीकरणाचा प्रश्न केवळआर्थिक प्रश्न नसून तो राजकीय आणि नैतिक प्रश्नही आहे. आणि त्याचा विचार व्यापक लोकशाही दृष्टिकोनातूनच करणे योग्य आहे. विशिष्ट क्षेत्रातील, उद्योगधंद्यांतील उत्पादनाची साधनें राज्याच्या मालकीची केल्याने त्याचा व्यापक अर्थाने सर्वांच्या स्वातंत्र्यावर काय परिणाम होईल, ते स्वातंत्र्य त्या योगाने वाढीस लागेल की मर्यादित केले जाईल. हेच या बाबतीतील योग्य गमक म्हणून मान्य करावे लागेल. ते लागू केल्यास काही क्षेत्रांत राष्ट्रीयीकरण निर्विवादपणे आवश्यक असल्याचे दिसून येईल, इतर काही क्षेत्रात ते निर्विवादपणे अनिष्ट असल्याचे दिसून आल्यावाचून राहणार नाही. राष्ट्रीयीकरणाची निर्विवादपणे आवश्यकता असणारे क्षेत्र सोडले म्हणजे अन्य क्षेत्रांत इतर मार्गांनी प्रश्न सुटतात की नाही, हे पाहणेच इष्ट होईल. खाजगी मालकी या संज्ञेत अनेक हक्कांचा अंतर्भाव होतो. या हक्कांना मुरड घालून तिच्या स्वरूपात बदल करता येतो हे ध्यानात घेतले म्हणजे अशा प्रकारच्या अन्य मार्गांची शक्यता स्पष्ट होईल. राष्ट्रीयीकरणाच्या बाबतीत अशा प्रकारची तारतम्याची भूमिकाच स्वीकारणे योग्य आहे.

वर उल्लेख केलेल्या गमकानुसार आवश्यक ठरणाऱ्या क्षेत्रांत राष्ट्रीयीकरण आणि उर्वरित आर्थिक जीवनात स्पर्धा वा राज्याची मालकी यांच्याऐवजी परस्पर सहकार्यावर आधारलेला आर्थिक प्रयत्न हाच लोकशाहीशी सुसंगत व तिला पोषक अशा

प्रकारचा आर्थिक प्रश्न सोडविण्याचा मार्ग होऊ शकेल असे वाटते. आणि या मार्गात आर्थिक विकेंद्रीकरणाचा विचारही वसू शकतो. लोकशाहीत आज आढळणारे सत्तेचे केंद्रीकरण नाहीसे करून, सत्तेच्या वितरणावर तिची उभारणी केली पाहिजे असे म्हणण्यात ज्याप्रमाणे केंद्रीय सत्ता वा निर्णय सर्वस्वी स्वीकारले जात नाहीत, त्याचप्रमाणे सहकार्यावर आधारलेल्या विकेंद्रित आर्थिक प्रयत्नावर भर देताना राष्ट्रीयीकरण सर्वस्वी नाकारण्याची गरज नाही. मात्र त्याचा सरसहा तात्त्विक पुरस्कार लोकशाहीत वसू शकणार नाही. राष्ट्रीयीकरणाच्या मर्यादा या लोकशाहीच्या मूल्यांतूनच निघाल्या पाहिजेत, हा त्याबाबतचा दृष्टिकोनच इष्ट होय.

### लोकशाहीची मूल्ये

उत्पादनसाधनांच्या खाजगी मालकीविषयीचा आपला तात्त्विक अनिर्बंध, सरसहा विरोध समाजवादाने सोडला तर त्याला मार्क्सवादाची संपूर्ण समीक्षा करणे आवश्यक होईल. वर्गयुद्धाची आवश्यकता त्यात राहणार नाही. वैचारिक क्षेत्र हे उत्पादनव्यवस्थेचे प्रतिबंधात्मक स्वरूप आहे हे मान्य करण्याची गरज त्यास राहणार नाही. राज्याला केवळ जुलुमाचे साधन म्हणून मान्य करावे लागणार नाही आणि असे झाल्यास समाजवाद हा एक सामाजिक कल्याणाचा (social welfare) आर्थिक किंवा कदाचित त्याहूनही अधिक व्यापक असा विचार बनेल. तो लोकशाहीशी सुसंगत असाही विचार होईल. मात्र त्याला 'समाजवाद' म्हणावे काय हाच काय तो प्रश्न शिल्लक राहील. वैचारिक गोंधळ व त्यातून जन्मणारे कृतिसंबंधीच्या अपेक्षांतील गैरसमज टाळण्यासाठी तो शब्द टाळणे अधिक इष्ट होय, असे म्हणावयास हरकत नाही.

भांडवलशाही अर्थव्यवस्थेत आर्थिक प्रश्न दिवसेंदिवस तीव्र स्वरूप धारण करीत आहे. साम्यवादी समाजरचनेच्या प्रयोगाने तो प्रश्न सोडविण्याच्या एका विशिष्ट मार्गातील धोका स्पष्ट केला आहे. खाजगी मालकी सरसहा नष्ट करण्याच्या सर्वस्वी नकारात्मक भूमिकेचे संभाव्य परिणाम हा त्या प्रयोगापासून मिळणारा बोध आहे; ते त्यातील जतन करण्यासारखे शाश्वतमूल्य नव्हे. सामाजिक न्याय, आर्थिक व सामाजिक समता ही ती मूल्ये आहेत. साम्यवादाच्या प्रयोगातून घ्यावयाच्या बोधालाच मूल्यांचे स्थान देणारा समाजवाद हा लोकशाहीस बाधक ठरल्यावाचून राहणार नाही. उलट मूल्यांचे जतन करून दैनंदिन जीवनात ती प्रत्येकास अधिकाधिक प्रमाणात अनुभवता येतील असे मार्ग शोधावयाचे म्हटल्यास लोकशाहीस पूरक व पोषक असा तो एक अत्यंत महत्त्वाचा विचार बनू शकेल; परंतु मग तो 'समाजवाद' राहणार नाही. म्हणून लोकशाही आणि समाजवाद एकत्र आणू पाहण्याच्या प्रयत्नातून वैचारिक गोंधळच संभवतो असे म्हणावे लागते. आर्थिक प्रश्न म्हणजे लोकशाही अधिक व्यापक व सखोल बनविण्याची एक संधी आहे. लोकशाहीस, आर्थिक प्रश्न सोडवू पाहणाऱ्या एखाद्या विशिष्ट मार्गाचे साधन बनवून त्यासाठी तिचा उपयोग करू पाहणे धोक्याचे व अनिष्ट होय. देशातील आजची परिस्थिती लक्षात घेतल्यास जितक्या लवकर ही जाणीव स्पष्ट व प्रभावी होईल तितके भावी काळाच्या दृष्टीने इष्ट होय असेच म्हटले पाहिजे.



### हृन्मंदिर मंगलसे

१

हृन्मंदिर मंगलसे पाहुनिया मी आले
स्नेहाचा कळस वरी ध्येयाचा ध्वज डोले
दीपमाळ जागविते भावांच्या मधुज्योती
दारींच्या वृक्षलता प्रीतीने पालविती
घंटारव भावधीर साद जिवा घालतसे
पाहुनिया मी आले हृन्मंदिर मंगलसे

२

हृदयीची पाजळली भावनिरांजन ज्योति
हृदयीची जागविली शतजन्मांतील प्रीति
शतजन्मांतील अतां शाप इथे सरतील
शतजन्मातील अतां ताप इथे निवतील
जीवन अभिषेकाया मन माझे आसवले
हृन्मंदिर मंगलसे पाहुनिया मी आले

३

दारातुनि आंत शिरे - मी कोठे? अंधारी
घुमते का मंदिर हे घुबडांच्या घूत्कारी
मूर्तिपुढे तडफडते कोणाचे बलिदान
मूर्ति कुठे? काळा हा एक खडा पाषाण
हे पिशाच्च बडवितसे, घंटेचे हो टोले
हृन्मंदिर मंगलसे पाहुनिया मी आले

**- देवदत्त दाभोलकर**

('I Have been through the gates' - Charlotte Mew)
भावानुवाद. पूर्वप्रसिद्धी नवभारत.







अनुक्रमणिका

# आमचे ध्येय - लोकशाही समाजवाद

डॉ. इंदुमती पारीख

(नवभारत फेब्रुवारी १९६७)

लोकशाही समाजवाद स्थापन करणे हे भारताचे अंतिम ध्येय असावे याबद्दल राष्ट्रात सर्वत्र एकमत झालेले दिसत आहे. लोकशाही व समाजवाद ही आधुनिक जगातील दोन महान जीवनमूल्ये आहेत. लोकशाहीचा पाया व्यक्तिस्वातंत्र्य असून समाजवादाचा पाया आर्थिक समानता आहे. या दोन्हीचा समन्वय करून आपले भावी जीवन उज्वल करावे असे वाटणे कोणत्याही समाजाच्या दृष्टीने अभिमानास्पद आहे. हे उदात्त ध्येय डोळ्यासमोर ठेवून त्या दिशेने वाटचाल करू लागणे समाजहिताच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. परंतु उत्तम ध्येय नुसतेच डोळ्यांसमोर ठेवून वा त्याविषयी एकसारख्या घोषणा करून समाज सुधारत नाही, त्याची प्रगती होत नाही. ते ध्येय गाठण्याचा खरा मार्ग शोधावा लागतो. सद्यःस्थितीचे शास्त्रीय विश्लेषण करून त्यातून तो योग्य मार्ग काढावा लागतो. आपली परिस्थिती काय आहे, ध्येयाकडे वाटचाल करण्यास काय तयारीची जरूर आहे, वाटेत अडचणी काय आहेत व त्यावर आपण कशी मात करू शकू याचा विचार करावयास पाहिजे. ध्येयाकडे जाण्यासाठी आपल्यात योग्य ते बदल घडवून आणण्याची तयारी पाहिजे, त्यासाठी योग्य ती परिस्थिती निर्माण करण्याची इच्छा व ताकद पाहिजे.

**समाजाची सध्याची परिस्थिती :**
**नव्या सामाजिक नेतृत्वाची गरज**

आपल्या समाजाची सध्याची परिस्थिती पाहिली म्हणजे वैफल्याची भावना बळावते. कदाचित सध्या दृष्टीस पडणारा गोंधळ बदलत्या परिस्थितीचे द्योतक असेल. तरुण पिढीला आपल्या वैगुण्याची जाणीव तीव्रतेने होऊन त्यातून काहीतरी करण्याची इच्छाही त्याच्या पाठीशी असेल. याच गोंधळातून नवा भारत जन्माला येणार असेल परंतु तशी आशादायी चिन्हे आजतरी दिसत नाहीत. परिस्थितीचे वास्तववादी विश्लेषण करून त्यावर उपाय सुचविणारा एकही प्रभावी विचारप्रवाह कोठे सापडत नाही. राजकीय पुढारी सत्तेच्या मागे लागलेले दिसत आहेत तर सामाजिक चळवळीस नेतृत्वच शिल्लक राहिलेले नाही. प्रत्येक प्रश्न राजकारणाच्या पातळीवर हाताळण्याची प्रथाच पडली आहे. 'आधी राजकारण मग समाजकारण' या लोकमान्य टिळकांच्या विचाराचा अतिरेक झालेला आहे. या विचारसरणीविरुद्ध उभा ठाकलेला एकही आगरकर आज पुढे येत नाही. म्हणूनच आशेचा एकही किरण दिसत नाही असे म्हणावे लागते.

भारताची बहुसंख्य दुःखे राजकीय नसून सामाजिक आहेत. याचा सर्वांनाच विसर पडलेला दिसत आहे. ब्रिटिश राजवटींत सर्व दुःखांचा राजकीय अर्थ लावण्याची जडलेली सवय सोडणे आज कठीण झाले आहे. 'स्वराज्य मिळू द्या सर्व काही बदलून जाईल' असे ठासून सांगणारे नेते आज हयात नाहीत. ज्या काहींनी भारतीय समाज बदलण्याची गरज, किती महत्त्वाची आहे हे सांगण्याचा प्रयत्न केला त्यांची राजकीय नेत्यांनी व समाजाने पर्वा केली नाही. आजचे राजकीय नेते तर त्याकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करीत आहेत असे वाटते. अनेक क्षेत्रात समाजाच्या कल्पना बदलणे जरूर आहे. रूढीप्रियता व अज्ञान यामुळे शतकानुशतके उराशी बाळगलेली जीवनमूल्ये कशी फोल आहेत हे दाखवून देणारे सडेतोड सामाजिक नेतृत्व आज भारताला पाहिजे आहे. सामाजिक परिवर्तनाखेरीज भारताचे पाऊल प्रगतीच्या मार्गावर पडणार नाही याची सर्वत्र जाणीव होणे जरूर आहे. असे झाले तरच लोकशाही समाजवादाच्या ध्येयास काही अर्थ येईल; तरच त्या ध्येयाकडे जाण्याचा मार्ग दृष्टिपथात येईल.

लोकशाही समाजवाद स्थापन करावयास निघालेल्या भारताजवळ ब्रिटिशांनी दिलेला लोकशाहीचा सांगाडाच फक्त शिल्लक आहे. ब्रिटिश परके होते. त्यांना आपली सत्ता टिकवावयाची होती म्हणून त्यांनी या सांगड्यात खरीखुरी लोकशाही भरली नाही. आणि व्यक्तिस्वातंत्र्याचे खरे मूल्य न समजल्यामुळे आजचे राज्यकर्तेही या सांगाड्यात अर्थ भरू शकत नाहीत. वर्षानुवर्षांच्या बंदिस्त वातावरणातून भारतीय समाज बाहेर पडू शकत नाही. आजचा भारतीय समाज वर्णाश्रमधर्मामुळे निर्माण झालेल्या जातीपोटजातींनी विभागलेला, अनेक ठिकाणी सरंजामशाही वातावरणात जगणारा, परंतु विसाव्या शतकातील भांडवलशाही






अनुक्रमणिका

अर्थव्यवस्थेत सापडलेला व प्रांतीयवादांनी शकले उडालेला संपूर्णपणे विस्कळित झालेला समाज आहे. धार्मिक कर्मकांडांनी संपूर्ण बांधला गेलेला हा समाज आधुनिक जगातील लोकशाही, समाजवाद व साम्यवाद यासारख्या तत्त्वांनीपण मोहित झाल्यासारखा दिसत आहे. थोडक्यात म्हणजे हजारो वर्षांपूर्वी अस्तित्वात आलेल्या समाजरचनेत कोठल्याही तऱ्हेचा बदल न करता विसाव्या शतकात यशस्वी होण्याची आशा बाळगणारा हा समाज आहे.

**भारतीयांवर घडलेली आक्रमणे : त्यांचे परिणाम**

या समाजावर उत्तरेकडून वेळोवेळी अनेक आक्रमणे झाली. कित्येक आक्रमकांना येथील समाजाने आत्मसात केले परंतु ग्रीकांच्या नंतरचे विजेते मात्र येथे आपली सामाजिक व धार्मिक पकड बसविण्यात यशस्वी झाले. इस्लामला थोडाबहुत प्रतिकार ठिकठिकाणी झाला. परंतु कोठल्याही प्रांतात सर्वच्या सर्व समाज या प्रतिकारात सामील झाला नाही. इस्लामी राज्यकर्त्यांनी काही हिंदूना जबरदस्तीने बाटवले असले तरी हिंदु समाजात असे अनेक गट होते की जे हिंदूच्या धार्मिक व सामाजिक त्रासास कंटाळले होते; म्हणूनच अनेक दृष्टीने येथील समाजाच्या मानाने मागासलेले असूनसुद्धा इस्लामी लोक येथे राज्य स्थापू शकले व अनेक शतके ते चालवू शकले. साहजिकच त्यांचा प्रभाव येथील सामाजिक व राजकीय जीवनावर पडला. अनेक भारतीयांना त्यातून धार्मिक समानता मिळाली, कर्मस्वातंत्र्य मिळाले, माणूस म्हणून जगण्याची संधी मिळाली. इस्लामचा प्रचार जोरात झाला.

या नंतरचे दुसरे मोठे आक्रमण समुद्राच्या मार्गाने आले. हा शत्रू अनेक दृष्टीने सुधारलेला, सुशिक्षित व हुशार! त्याने बळाचा विशेष वापर न करता येथील समाजाच्या फुटीर वृत्तीचा फायदा घेऊन आपली सत्ता स्थापन केली. त्यांचे धर्मगुरूही त्यांचेबरोबर आले. हा धर्मही जास्त उत्क्रांत, माणसा माणसांत भेद न करणारा! शिवाय या विजेत्यांचे पाठीशी झपाट्याने विकसित होणारी युरोपातील औद्योगिक संस्कृती व शास्त्रीय संशोधन! व त्यापेक्षाही महत्वाचे म्हणजे युरोपिअन पुनरूज्जीवनाच्या चळवळीने मुक्त केलेला धाडशी युरोपिअन माणूस! ब्रिटिशांच्या संपर्काने येथील सुशिक्षितांना सामाजिक परिवर्तनाची व स्वातंत्र्याची गरज वाटू लागली. अनेकदृष्ट्या विस्कळीत झालेले राष्ट्र एका राजकीय छत्राखाली आले. त्यातून राष्ट्रीय भावनाही वाढीला लागली. राज्यकर्त्यांनी आपल्या सोयीसाठी वहातुकीच्या साधनांचा व त्याकरता रस्त्यांचा सर्वत्र फैलाव केला. राष्ट्रातील सर्व प्रांतातील लोकांना इंग्रजी शिक्षण देण्यास सुरुवात करून प्रांताप्रांतातील भाषेचे अंतर सुशिक्षितांपुरते का होईना पण तोडले. त्याचा परिणाम एकतेची भावना निर्माण करण्यात व प्रांतातील दळणवळण वाढविण्यात झाला.

**भारतीयांच्या अध:पतनाची व हतबलतेची कारणे**

भारतीय वैदिक संस्कृती जगातील एक जुनी व प्रगल्भ संस्कृती मानली जाते. वेदकालीन भारत इतर जगाच्या मानाने सुशिक्षित, सुसंस्कृत व संपन्न होता. या गतकालाच्या वैभवावर जगण्याची धडपड आजही चालू आहे. आजही आमचे स्फूर्तिस्थान वेदकालच आहे. नंतरच्या इतिहासात काही प्रादेशिक स्फूर्तिस्थाने सापडतात. परंतु अखंड भारताला एकत्र आणण्यास ती पुरेशी नव्हती. अनेक परकीय आक्रमणांना बळी पडणारा भारत एकजिनसी नव्हता. परकीयांचे पारिपत्य करण्यासाठी येथला समाज एकदिलाने कधीच उभा राहिला नाही. उलट येणाऱ्या प्रत्येक परकीयाने येथील फुटीचा फायदा घेतला. येथील सर्वच्या सर्व जनतेला गुलाम केले. तरीही शतकानुशतके गुलामगिरीचा प्रतिकार करण्यासाठी एकसमयावच्छेदेकरून येथील जनतेने उठाव केला नाही. एकेकाळी विद्वत्तेचे व कर्तृत्वाचे शिखर गाठलेल्या या समाजात असा काय रोग घुसला की त्यामुळे तो संपूर्णपणे मागासलेला, अडाणी व दरिद्री बनला? अन्याय, दारिद्र्य व भ्रष्टाचार यात बुडत असताना समाजसुधारणेच्या लाटा येथे का उसळत नाहीत? परकीय सत्तेचा अस्त झाल्यावरही येथील कर्तृत्वास उधाण का येत नाही? प्रगतीचा मार्ग खुला असूनही त्यावरून वाटचाल करण्याची आम्हाला हिंमत का होत नाही ? अशा तऱ्हेचे अनेक प्रश्न मनाला सतावतात, त्यांची उत्तरे शोधण्यासाठी विचार करावयास लावतात.

**बंदिस्त वैचारिक जीवन व बंदिस्त कर्मस्वातंत्र्य !**

कोठल्याही प्रश्नाचा सांगोपांग विचार करण्याची आमची सवय शेकडो वर्षांपूर्वी नष्ट झाली आहे असे चटकन डोक्यात येते. परंतु या उत्तराने प्रश्न सुटत नाहीत. खरे कारण शोधलेच पाहिजे. परिस्थितीचे योग्य अवलोकन व आकलन करून चूक शोधून काढण्याची गरज आहे. त्या दृष्टीने विचार करता सध्याच्या परिस्थितीचे मूळ वर्णाश्रम धर्म, त्यातून निघालेला जातिभेद, धार्मिक कर्मकांडे व मोक्षप्राप्तीचा हिंदुधर्माने सांगितलेला मार्ग या सर्वात आहे असे म्हणावे लागते. हिंदुतत्त्वज्ञान फार गहन व उच्च आहे असे मानले जाते. या




तत्त्वज्ञानाचा विचार करण्याची ही जागा नाही व त्याचा ऊहापोह करण्याचा माझा अधिकारही नाही. एका सामान्य नागरिकाच्या दृष्टिकोनातून हे लिखाण केलेले आहे. एक गोष्ट मात्र खरी की या तत्त्वज्ञानाने भारतीय समाजास एकाबाजूस भूतकाळाशी कायमचे बांधले असून दुसरे बाजूस मरणोत्तर जीवनाशी निगडित केले आहे. ऐहिक जीवनाला त्यात फारसे महत्त्व नाही. त्यामुळे आमचे वैचारिक जीवन सर्वस्वी बंदिस्त झालेले आहे. त्यातच हिंदुधर्माने वर्णाश्रमधर्माचा स्वीकार करून हा बंदिवास पक्का करून टाकला. ज्यावेळी वर्णाश्रम धर्माची पकड या राष्ट्राच्या जीवनावर पक्की बसली त्या दिवशी या राष्ट्राच्या अधोगतीला सुरुवात झाली असे म्हणणे धाडसाचे असले तरी सत्य आहे. कारण कोठल्याही कायद्याने एखाद्या समाजातील माणसाचे कर्मस्वातंत्र्य हिरावून घेणे म्हणजेच त्याला बंदिस्त करणे होय. जन्माने वर्ण ठरला, त्यानंतर त्यानेच जात, पोटजात ठरली म्हणजेच धंदा व कार्यही ठरले. माणसाचे वैयक्तिक जीवन ठरून गेले, त्याची हालचाल नष्ट झाली, स्वातंत्र्य जन्मतःच बंदिस्त झाले. कर्तृत्वास बांध घातला गेला व प्रगती थांबली.

या बंदिस्त समाजरचनेचा परिणाम राष्ट्राच्या उन्नतीवर कायम स्वरूपाचा झाला. शिवाशिवीच्या कल्पनेमुळे दळणवळण वाढले नाही. मोठमोठे रस्ते व सार्वजनिक वहातुकीची साधने यांची गरज वाटली नाही. त्यातूनच स्वयंपूर्ण खेडे व त्याची स्वयंपूर्ण अर्थरचना उदयास आली. व्यापार उदीम वा मोठे उद्योगधंदे वाढण्याची शक्यता निर्माण झाली नाही. संकुचित दळणवळण व भाषाभिन्नतेमुळे प्रांतीयता निर्माण झाली. भौगोलिक सीमा उल्लंघणे जवळजवळ अशक्य झाल्यामुळे एक समाज दुसऱ्या समाजापासून अलग राहिला, वेगळा बनला. एकाच धर्माखाली असलेल्या भारतात ऐहिक जीवनात एकजिनसीपणा निर्माण झाला नाही. कारण तो निर्माण होण्यास रस्त्यांची, दळणवळणाच्या साधनांची, प्रवासात मुक्काम करता येईल व अन्नपाणी मिळू शकेल अशा जागांची गरज जरूर असते. सामुदायिक जीवन खेळीमेळीने जगता येईल असे वातावरण असावे लागते. समाजातील सर्व थरांना एकातून दुसऱ्यात जाण्याची मोकळीक असावी लागते, एकमेकांचा निकट संपर्क अपरिहार्य असतो. म्हणजेच रोटी बेटी व्यवहार समाजात अनिर्बंध चालू असावा लागतो. तरच तो समाज नात्यागोत्यांच्या, चालीरीतींच्या, खाण्यापिण्याच्या सर्व नात्यांनी एकत्र बांधला जातो. एकजिनसी होतो. एकेका प्रांतातील समाजसुद्धा अजून या अर्थाने एकजिनसी झालेला नाही. मग अखिल भारतीय समाजाबद्दल बोलणेच नको.

जातिभेदांमुळे येथे कोठलेही सामाजिक कार्य वाढू शकले नाही. कारण समाजाची व्याख्या जातीपुरती मर्यादित करण्यात आली. अजूनही अनेक ठिकाणी सार्वजनिक पाणीपुरवठा निर्माण झाला नाही. कारण प्रत्येक जातीचे पाणी वेगळे, शिवाशिवीने वैयक्तिक सेवेला मर्यादा घातली. ज्याला जरूर असेल त्याची निरपेक्ष सेवा करण्याची प्रथा पडली नाही. फक्त खालच्या थरातील लोकांनी वरच्या थरातील लोकांची सेवा करावयाची; नव्हे ती त्यांनी केलीच पाहिजे. वरच्या थरातील लोकांनी खालच्यांची सेवा करण्यात कमीपणा आहे म्हणून त्याचा विचारही करावयाचा नाही. त्यामुळे सार्वजनिक दवाखाने वा हॉस्पिटले येथे वाढू शकली नाहीत. विद्यादानसुद्धा ठरलेल्या लोकांनी ठरलेल्या लोकांनाच करावयाचे. त्यामुळे ब्रिटिशांनी चालू करीपर्यंत धर्म-जातीच्या पलीकडे जाणाऱ्या शाळा वा विश्वविद्यालये येथे निर्माण झाली नाहीत. थोडक्यात म्हणजे समाजाचा विचार करण्यास धर्माने आम्हाला शिकविले नाही. धर्मकृत्यात तर जातिभेदाची मर्यादा जास्तीत जास्त पाळली जाते. ब्राह्मणाच्या देवाची पूजा इतर कोणीही करू शकत नाही. धर्मकार्याकरतासुद्धा सर्व समाज एकत्र येऊ शकत नाही. धर्माने फोडलेला हा समाज एकजिनसी कसा करता येईल हा फार मोठा प्रश्न विसाव्या शतकातील भारतापुढे उभा आहे.

### अंधानुकरण सोडून ज्ञान आत्मसात करावयास हवे, तद्वत आचरण व्हावे

भारतीय मनावर धर्माचा पगडा फार आहे असे मोठ्या अभिमानाने आम्ही म्हणतो. या धर्माने भारतीय समाज कायमचा त्रिस्कळीत केला आहे हे कबूल करण्यास लागणारे मनोधैर्य आमचेजवळ नाही; मग त्या धर्मात सुधारणा करण्याची ताकद तरी आमचेत कोठून येणार? प्रत्येक धर्मात टिकावू मूल्ये असतातच. तशी ती हिंदुधर्मातही आहेत. परंतु त्याबरोबर किंबहुना त्या मूल्यांना नाहीसा करणारा फाफटपसारा इतर कोणत्याही धर्मापेक्षा आमच्या धर्मात जास्त आहे. कोठल्याही समाजाची प्रगती व्हावयाची असल्यास त्यात उत्क्रांती व्हावी लागते : जास्त प्रगल्भ व उन्नत मूल्ये व्यवहारात यावी लागतात. म्हणजे त्या समाजाचा धर्मसुद्धा उत्क्रांत होण्याची शक्ती हे जिवंतपणाचे लक्षण आहे. जिवंतपणाचे सर्वात महत्त्वाचे लक्षण म्हणजे आजूबाजूच्या वातावरणातून आपल्या भरणपोषणास व वाढीस लागणारी जीवनसत्त्वे आत्मसात करून आपल्या अंगातील चयापचयाच्या क्रियेमुळे निर्माण होणारी तत्त्वे विसर्जित करणे होय. चयापचयाच्या क्रियेपेक्षा वाढ होण्याच्या क्रियेस

जीवनसत्त्वांची जास्त गरज लागते. ही सत्त्वे आत्मसात करावयाची क्रिया प्रकर्षाने व्हावी लागते. निसर्गातील सजीव वस्तू याच नियमाने जगतात. घसट जास्त झाली, ती भरून न निघाली तर मृत्यू जवळ येतो. निसर्गाचा हा नियम मानव समाजास पण लागू पडतो. कारण हा समाज सजीव प्राण्यांचा बनलेला आहे. तो जिवंत राहण्यास व प्रगत होण्यासाठी ज्ञान आत्मसात करण्याची जरूर आहे. परंतु अंधानुकरणाने ज्ञान आत्मसात होत नाही; ते पचवावे लागते, त्याचे चर्वण व्हावे लागते, ते व्यवहारात आणावे लागते, ते वाढविण्याकरता सतत संशोधन करावे लागते, निसर्गनियमांचा अभ्यास करावा लागतो. या ज्ञानसाधनेच्या सहाय्यानेच समाज प्रगत होतात. नवे ज्ञान घेण्याची व ते पचवण्याची शक्ती क्षीण झाल्यास समाजाच्या अधोगतीस सुरुवात होते. तो नाशाप्रत जाण्यास सुरुवात होते. जिवंत वस्तूचा नाश होण्यास वेळ लागतो तसाच एकेकाळी प्रगल्भ असलेल्या समाजाचा नाश होण्यास पण वेळ लागतो. म्हणूनच अशा समाजास वाचवणे शक्य असते. आपल्या समाजाचे काय चुकत आहे व ती चूक कशी सुधारता येईल याचा विचार करणारी थोडीफार माणसे समाजात निघाली व त्यांनी आपली शक्ती व बुद्धी त्या कामी खर्च केली तर अजूनही वेळ गेली नाही असे वाटते. विस्कळीतपणाची जाणीव झालेल्या तरुण पिढीला योग्य नेतृत्व मिळाल्यास सर्वच्या सर्व समाज बदलून जाईल, नवी वाटचाल करू लागेल.

समाज सुधारणे म्हणजे मुख्यत: त्यातील माणसे सुधारणे, त्यांची वर्तणूक सुधारणे, त्यांचे एकमेकातील संबंध सुधारणे. म्हणजे सर्वप्रथम माणसे कशी सुधारतील याचा विचार व्हावयास पाहिजे. समाजाची पातळी त्यातील व्यक्तींच्या वैयक्तिक पातळीवरच अवलंबून असते. आजच्या परिस्थितीत सर्वात मनस्ताप देणारी गोष्ट कोणती असेल तर सर्व दृष्टीने निकृष्टावस्थेस गेलेली भारतीय माणसे! येथील दारिद्र्य हे सर्वांचे कारण म्हणून पुढे करण्याची आम्हाला सवय लागली आहे पण आम्ही दरिद्री का? आम्ही जास्त शिस्तबद्ध, जास्त कार्यक्षम व जास्त चांगले का नाही? परिस्थिती बदलण्याची, ती सुधारण्याची धडपड आम्ही का करत नाही? या प्रश्नांची उत्तरे पण आमच्या धार्मिक कल्पनांत सापडतात, असे मोठ्या खेदाने म्हणावे लागते.

**मोक्षकल्पनेतला स्वार्थ : व्यक्तिहित व समाजहित यांची सांगड घातली नाही**

सध्याचे जीवन भूतकाळाशी पूर्णपणे बांधले गेलेले आहे. गेल्या जन्मीची पापपुण्ये या जन्मावर सत्ता चालवतात. त्यातच कर्ताकरविता परमेश्वर! तेव्हा केल्या न केलेल्या सर्व कृत्यांची जबाबदारी त्याचीच. तो बुद्धी देतो त्याप्रमाणे आम्ही वागतो, त्यात आमचे काय चुकते ? तो ठेवतो त्याप्रमाणे आम्ही रहातो. विधिलिखित काही चुकत नाही तेव्हा परिस्थिती बदलण्याची जरूर काय? तशी जरूर असली तर परमेश्वर आम्हाला बुद्धी देईल. धर्मामध्ये कर्मकांडाचे स्तोम इतके आहे की त्यातून जन्मभर काय पण पिढ्यान्‌पिढ्या बाहेर येणे कठीण आहे. प्रत्येक पापाला उतारा आहे. अगदी खुनापासून सर्व पापांचे पारिपत्य करण्यास धर्मकाण्ड समर्थ आहे. एखादी पूजा, उपवास, यात्रा, देवदर्शन, गंगास्नान वगैरे वगैरे सोपे सुलभ उपाय पापमुक्त होण्यास उपलब्ध असताना पाप करण्याची भीती का वाटावी ? फारच कडक धार्मिकता अंगी आणून मोक्षप्राप्ती करता प्रयत्न करावयाचा असेल तर तोही मार्ग अतीव स्वार्थी आहे असे म्हणावे लागेल. 'सर्वसंगपरित्याग' केल्याने मोक्षाचा मार्ग खुला होतो. आपली बायको मुले, आप्तेष्ट या सर्वांची कोठल्याही तऱ्हेने व्यवस्था न करता सोडून चालू लागावे. आपल्यापुरता मोक्षाचा मार्ग आक्रमण्यास सुरुवात करावी. त्यात अंतिम मोठेपण आहे असेच म्हणावे लागते. जगाचे काहीही होवो मला मोक्ष मिळाला म्हणजे झाले, मी परमेश्वरापाशी जाईन बाकीचे जग बुडाले तरी हरकत नाही. स्वत:च्या कल्याणाकरता समाजातून उठून जाणाऱ्या व्यक्ती समाजाला वाट कशी दाखवू शकतील? समाजाचे नेतृत्व कसे करू शकतील? त्यांना समाजाची सुखदु:खे कशी समजू शकतील? मोक्ष मिळविण्याच्या या मार्गाने या समाजातील व्यक्तीला अत्यंत स्वार्थी बनवले आहे. समाजातील कर्तृत्ववान माणसाचे लक्ष स्वत:कडे केंद्रित करण्याचा हा राजमार्ग आहे. त्यात डावलण्याच्या प्रवृत्तीचा उगम आहे. मोक्ष मिळविण्याकरता समाजसेवा व दलितांची सेवा करण्याची या धर्मात जरूरी नाही. समाजाचा त्याग करणारा माणूसच या धर्मात मोठा होऊ शकतो. स्वत:च्या मोक्षप्राप्तीकरता दुसऱ्यांना दु:खात लोटून निघून जाण्यानेच कृतार्थ होता येते. हा धर्म व्यक्तिप्रधान आहे. त्यात एकएकट्या व्यक्तीचा विचार आहे. समुदायाने जगणाऱ्या माणसाला समाज बनवण्याची, मदत करण्याची त्यात ताकद नाही असे वाटू लागते.

जीवशास्त्रदृष्ट्या माणूस हा सामाजिक प्राणी आहे. समाजाशिवाय माणूस जाति (Species) टिकणार नाही, वाढणार नाही. त्यामुळे एका बाजूस वैयक्तिक मोक्ष मिळविण्याचा प्रयत्न व दुसरे बाजूस माणूस म्हणून जगण्याचा प्रयत्न या ओढाताणीत वरवर दिसायला माणसाचा विजय झाला, तो जिवंत राहिला. पण त्या विजयाने येथला माणूस






उंचावला नाही, तर तो अधोगतीला गेला. कारण त्याने मोक्ष मिळविण्याची आपली कल्पना बदलली नाही तर सामाजिक जीवनाला मुरड घातली, त्यावर बंधने लादली. ते बऱ्याच अंशाने निर्जीव केले. व्यक्तीचे हित व समाजाचे हित यांची सांगड घालणे आम्हाला जमले नाही. त्यामुळे समाजहित व व्यक्तीचे प्रगल्भत्व या दोन्हीसही आम्ही मुकलो. सर्वसंगपरित्यागाचे कोठल्याही सजीव प्राण्यास न पेलणारे तत्त्वज्ञान आम्ही स्वीकारले. ते अध्यात्मिकदृष्ट्या अत्यंत उच्च दर्जाचे आहे असे ठरवले; पण त्यात आम्ही माणूस आहोत हे विसरून गेलो. माणूस म्हणून जगण्यास नालायक ठरलो.

**न झेपणाऱ्या तत्त्वज्ञानातून काढलेल्या पळवाटा**

मुळातच तत्त्वज्ञान न झेपणारे असल्यामुळे त्यात पळवाटा शोधणे अपरिहार्य झाले. त्यातूनच सामान्य माणसाला जखडून टाकणारे कर्मकांड निर्माण झाले. सर्वसंगपरित्यागाचे ध्येय असलेला हिंदू माणूस कर्मकांडाने सर्व बाजूने बांधला गेला. सकाळपासून रात्रीपर्यंत केव्हा उठावे, कसे उठावे, कसे बसावे, काय खावे, कसे खावे, काय प्यावे, केव्हा झोपावे वगैरे सर्व गोष्टी धर्माने आम्हाला सांगून टाकल्या आहेत. त्यात चुका झाल्यास किंवा तसे करणे न जमल्यास त्यातून पळवाटा काढावयास पण सुचवून ठेवले आहे. अमूक गोष्ट अमूक वेळी अमूक पद्धतीने करता न आल्यास त्याबद्दल सोपा मार्ग कर्मकांडात सांगितलेला असतो. 'सर्वार्थे अक्षतां समर्पयामि' हा मंत्र फार उपयुक्त ठरत आला आहे. धार्मिक व्यवहारात पळवाटा काढण्यास शिकलेला हिंदू माणूस इतर व्यवहारात पळवाटा काढू लागल्यास आश्चर्य का वाटावे? सचोटीचा व्यवहार न जमला तर पळवाट काढावी. त्याने पाप लागेल अशी बोचणी मनाला लागली तर काहीतरी देवधर्म करून त्या पापातून मुक्त व्हावे. देवसुद्धा, पूजेअर्चेने, फळाफुलांनी वा सोन्यामोत्यांच्या दागिन्यांनी खुश होतात. मग व्यवहारातील देवांना तसे खुश केले तर काय बिघडते. देवाला आमिषे दाखवणारा, त्याच्या आराधनेतून पळवाटा काढणारा माणूस, कामातील कुचराई पचविण्यासाठी वरिष्ठांना लाच लुचपत देऊ लागल्यास नवल ते काय? त्यातच व्यक्तिनिरपेक्ष सेवा देण्याची वा घेण्याची पद्धती आमच्या समाजात नाही. त्यामुळे एखाद्याने आपले काम केले की त्याला मोबदला दिला पाहिजे तसा देण्यात वा घेण्यात काहीच पाप नाही. अशा वैचारिक पार्श्वभूमीवर भ्रष्टाचार माजल्यास नवल ते काय? किंबहुना त्यावरच येथील व्यवहार चालत आला आहे असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही. कारण एखादा माणूस सचोटीने कोठल्याही तऱ्हेने भ्रष्ट न होता जगू शकतो याची खात्री कुणालाच वाटत नाही. तसा तो जगला असे पटले तर तो महात्मा होऊ शकतो.

**लोकशाही समाजरचनेच्या दृष्टीने काय करावयास हवे?**

लोकशाही समाजवाद स्थापन करावयास निघालेल्या राष्ट्राची ही सद्यःपरिस्थिती! या पार्श्वभूमीवर लोकशाही समाजवाद स्थापन करणे कितपत व कसे शक्य आहे याचा विचार होणे जरूर आहे. भारतीय व्यक्तीचा जीवनाबद्दलचा दृष्टिकोन आमूलाग्र बदलणे जरूर आहे. त्यानंतरच तो स्वतःला व समाजाला कर्मकांडाच्या व जाती-पोट-जातींच्या बंधनातून मुक्त करू शकेल. एका बाजूला आधुनिक दळणवळणाची साधने, औद्योगीकरण व बाह्य जगाशी वाढता संपर्क या समाजास घुसळून काढीत आहे. मोठमोठ्या शहरातून रोटीव्यवहाराची बंधने तुटू लागली आहेत. काही ठिकाणी बेटीव्यवहारापर्यंत मजल जाऊ लागली आहे. परंतु अजूनही कर्मकांडातून व मोक्षाच्या धडपडीतून सुटका होण्याची चिन्हे दिसत नाहीत. त्यासाठी व्यक्ती मुक्त होणे जरूर आहे. जुनी जोखडे फेकून देण्याची तयारी व ताकद तिच्यात आली पाहिजे. अशा अनेक मुक्त व्यक्ती समाजात निर्माण झाल्या म्हणजेच समाजास डोळस व धाडशी नेतृत्व लाभेल. जुन्या परंपरेतील चांगले ते घेऊन नवे आत्मसात करण्याची शक्ती असलेले नेतृत्व निर्माण झाले तरच भारतीय समाजात लोकशाही मूळ धरील.

विसाव्या शतकात तंत्रविद्येचा जितक्या झपाट्याने विकास होत आहे तितका पूर्वी क्वचितच झाला असेल. अठराव्या व एकोणिसाव्या शतकात झालेल्या मूलभूत शास्त्रीय संशोधनाने युरोपिअन माणसाचा आत्मविश्वास वाढीला लागला. धर्मगुरूंचे जीवनावरील वर्चस्व कमी येऊन दैनंदिन जीवनात युरोपिअन माणूस बुद्धिवादी बनला. त्यातून औद्योगिक क्रांती व आधुनिक पाश्चात्य जगाचा उदय झाला. या शास्त्रीय संशोधनामागे वैचारिक क्रांती उभी होती. त्यातून युरोपिअन माणूस स्वतंत्र व्यक्ती म्हणून जगावयास शिकला. आमचे शास्त्रीय संशोधन शेकडो वर्षांपूर्वी थांबले. वैचारिक क्रांतीची आम्हाला गरजच वाटली नाही. पण त्यामुळे आम्ही व्यक्तिस्वातंत्र्याच्या एका मोठ्या चळवळीला मुकलो. समाजास शास्त्रीय संशोधनाने कधीच धक्के दिले नाहीत व त्यामुळे इथल्या समाजाच्या व विशेषतः व्यक्तीच्या धार्मिक कल्पना डिवचल्या गेल्या नाहीत. आम्हाला शास्त्राची ओळख यंत्रांकरवी झाली. त्यामागचे संशोधन फार उशिरा आमच्यातील काहींना समजू लागले.

त्यामुळे त्याचा आमच्या वैचारिक जीवनावर काहीही परिणाम झाला नाही. आमच्या जीवनावर थोडाफार परिणाम होणे मात्र अपरिहार्य होते. अधिकच सनातनी असलेला आमचा दृष्टिकोन यंत्राप्रमाणे साचेबंद होण्यासच मदत झाली असे मोठ्या खेदाने म्हणावे लागते. यंत्र आले ते समजण्याकरता शास्त्र आले पण त्याबरोबर शास्त्रीय दृष्टिकोन आला नाही. म्हणूनच औद्योगिक प्रगतीबरोबर व्यक्तीचा विकास झाला नाही. तर अनेकवेळा व्यक्ती अधोगतीस गेली. अगोदरच खालच्या पातळीवर असलेली व्यक्ती यंत्रवत् बनली. एका बाजूला पदार्थविज्ञान, रसायन, जीवशास्त्र यांचा अभ्यास करणारी माणसे आपल्या जीवनात दुटप्पी बनली. शास्त्रज्ञ म्हणून न्यूटन, डार्विन, आइनस्टाईनचे सिद्धान्त मानणारी माणसे ग्रहणानंतर समुद्रस्नान करणे, झाडपाल्यांची पूजा करून त्यांना देव मानणे, उपासतापासांनी देवाला प्रसन्न करण्याचा प्रयत्न करणे, तीर्थयात्रा करणे, अंगाला भस्म लावणे, जपजाप्य करणे यासारख्या कर्मकांडावर विश्वास ठेवून जीवनात त्याला प्राधान्य देताना दिसत आहेत; मग सामान्य माणसाची गोष्ट कशाला? याचा अर्थ एकच की शास्त्रांचा अभ्यास करणे वा तो समजणे म्हणजे शास्त्रीय दृष्टिकोन नव्हे. जीवनातील प्रत्येक गोष्ट बुद्धिवादाच्या निकषावर घासून पाहून मगच ती स्वीकारणे म्हणजे शास्त्रीय दृष्टिकोनाची कास धरणे होय.

यासाठी सामाजिक क्रांतीपेक्षाही जास्तीतजास्त जरूरी शैक्षणिक क्रांतीची आहे. लहान वयात होणारे संस्कार बदलणे अत्यंत जरूर आहे, पण ते सर्वात कठीण आहे. कारण योग्य दृष्टिकोनातून शिक्षण देणाऱ्या शिक्षकांचा आज जवळजवळ अभाव आहे. शिक्षणक्रम आखताना गेल्या वीस वर्षात तर जास्तीतजास्त भर जुन्या बुरसटलेल्या व टाकाऊ गोष्टींवर दिला जात आहे. तीच गोष्ट आकाशवाणीची! जुने सण त्यातील कर्मकांडे यांना फाजील महत्त्व सर्वत्र दिले जाते. या प्रभावी शैक्षणिक माध्यमाचा दुरूपयोग थांबवणे अत्यंत जरूर आहे. राज्ययंत्रणेच्या हातात आज आकाशवाणी हे एक फार मोठे शस्त्र आहे. त्याचा सदुपयोग केल्यास लोकशिक्षणाचा मार्ग सुकर होणार आहे. आकाशवाणीवर शास्त्रीय सत्ये सांगताना त्या मागची विचारसरणी सांगण्याची व त्याचा आपल्या जीवनावर कसा परिणाम होतो हे सांगण्याची प्रथा पाडली तर फार मोठे काम होणार आहे. हे माध्यम समाजाच्या सर्व थरापर्यंत पोचणारे आहे. म्हणूनच ते लोकशाहीचा पाया घालण्यास अत्यंत उपयुक्त ठरणार आहे.

विसाव्या शतकाचे सुरुवातीस टिळक-आगरकरवाद महाराष्ट्रात खूप गाजला. आधी राजकारण की आधी समाजकारण याचे उत्तर त्यावेळी राष्ट्राने 'राजकारण' असे देऊन टाकले. गेल्या पन्नास वर्षात राजकारणाचे नेतृत्व समाजाने स्वीकारले. स्वराज्य मिळाल्यानंतरच्या काळातही राजकीय पुढाऱ्यांचे नेतृत्व अबाधित राहिले. प्रत्येक प्रश्न राजकीय पातळीवरून हाताळण्याची कोशीस झाली. पण त्यातून समाजाचे खरे कल्याण झाले नाही. सामाजिक प्रश्न सुटले नाहीत. अनेक नव्या समस्या निर्माण झाल्या, जुन्या तशाच राहिल्या. या सर्वांचा सडेतोडपणे परामर्ष घेऊन त्यातून मार्ग दाखवणारा आगरकरांच्या सारखा समाजसुधारक शिक्षक आज भारताला पाहिजे आहे. राजकीय पुढाऱ्यांना न सुटणारे प्रश्न बुद्धिवादी शिक्षक सोडवू शकेल असा विश्वास वाटतो. कारण बुद्धिवादाच्या निकषावर सद्यःपरिस्थितीचा विचार करून त्यातून मार्ग काढण्याची स्वतंत्र वृत्ती राजकीय पुढाऱ्यात असणे अशक्य आहे आणि विसाव्या शतकात कोठल्याही व्यक्तीला शिक्षणाखेरीज तरणोपाय नाही. गोखले आगरकरांनी बुद्धिवाद प्रत्यक्ष जीवनात उतरविण्याचा प्रयत्न केला, त्यासाठी त्यांना विरोध सहन करावा लागला, अनेक संघर्ष करावे लागले. त्यासाठी लागणारे मनोधैर्य त्यांचेत होते म्हणूनच आजचा महाराष्ट्र सामाजिक दृष्टीने भारतातील सर्वात जास्त स्वतंत्र वृत्तीचा व बुद्धिवादी म्हणून ओळखला जातो.

लोकशाही समाजवाद हे उदात्त ध्येय गाठण्याची खडतर तपश्चर्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या मार्गावरूनच गेली पाहिजे हे निर्विवाद! आणि व्यक्ती जसजशी जास्त प्रगल्भ होत जाईल तसतशी ती जास्त मुक्त होत जाईल हे विसरता कामा नये. यासाठी व्यक्तीला प्रगल्भ होण्यासाठी लागणारे वातावरण जर आमचे नेते निर्माण करू शकले तरच लोकशाही समाजवादाच्या दिशेने पहिले पाऊल टाकले गेले असे म्हणावेसे वाटेल.



महात्मा गांधी आयलो रे
गोयांत आमच्या पायलो रे
लोहियान हाडलो बावटो ताजो
मडगांव शेहेरात लायलो रे

-बा० भ० बोरकर

अनुक्रमणिका

# समाजवाद पूर्णांशाने मृगजळ आहे!

प्रा. डॉ. रा. चिं. बडवे

(नवभारत जुलै ऑगस्ट १९५६)

नवभारताच्या जुलै ६५ च्या अंकात डॉ. मो. वि. पटवर्धन यांनी 'समाजवादाचे मृगजळ व भारत' या मथळ्याचा लेख लिहून विचारांना दिलेली चालना स्वागतार्ह आहे. कोणत्याही क्षेत्रात प्रत्यक्षानुभवांच्या मागोव्याने मूलभूत स्वरूपाचा विचार करण्याची कुवत आपल्या समाजात नहिवत असल्याने 'मूढः परप्रत्ययनेय बुद्धिः' या न्यायाने परकीयांची बौद्धिक गुलामगिरी उत्पन्न होणे स्वाभाविकच मानले पाहिजे. यामुळे अर्थातच स्वतंत्र विचार करणाऱ्यांची समाजात कदर होत नाही व त्यांना जरूर ते उत्तेजन मिळत नाही ही खेदाची गोष्ट होय.

## डॉ. पटवर्धनांनी केलेली उथळ चिकित्सा

बुद्धिप्रामाण्याच्या निकषावर घासून पहाता मार्क्सप्रणीत समाजवाद अशास्त्रीय व अशक्य ठरतो. हे श्री. पटवर्धनांनी स्पष्ट केलेच आहे. यालाच पूरक म्हणून मला असे म्हणावयाचे आहे की आर्थिक, सामाजिक, राजकीय इ. क्षेत्रातील विषमता संपूर्णपणे नष्ट करून वर्गविरहित व शासनविरहित समाज निर्माण करण्याचे समाजवादी ध्येय मानसशास्त्रीय दृष्टीनेही मृगजळवतच आहे. विषमता (असमानता) हा निसर्गाचाच मूलभूत स्वरूपाचा नियम आहे. कोणत्याही दोन व्यक्तीत, अगदी जुळ्या भावंडातही, शारीरिक वा मानसिक शक्तींबाबत संपूर्ण समानता कधीही दिसून येत नाही व एकंदर मानवी समाजाचा विचार केला तर माणसामाणसामध्ये असमानतेचे प्रमाण मोठ्या प्रमाणावर दिसून येते. याच्या बुडाशीही निसर्गाची विषमता हेच मुख्य कारण होय. विषमता मानवी समाजपुरतीच मर्यादित आहे असेही नाही. सर्व सजीव सृष्टीला तिने व्यापले आहे. पशुपक्षी व वनस्पतींमध्येही ती तितक्याच प्रकर्षाने दिसून येते. म्हणूनच तर गाय, घोडा, पोपट, कुत्रा इ. प्राणी अथवा तांदूळ, गहू, फळे इ. विकत घेताना त्या त्या वस्तु चांगल्या दर्जाच्या वा जातीच्या आहेत किंवा नाहीत हे पारखून घेण्याची आपण कोशीस करतो. माणूस ही निसर्गाचीच निर्मिती असल्याने तो निसर्गाच्या या मूलभूत नियमाचा भंग करू शकेल अशी स्थिती सध्या तरी नाही. विज्ञानाच्या घोडदौडीत भविष्यकाळात काय होईल ते कोणी सांगावे? म्हणून नवीन जन्मास येणाऱ्या प्रत्येक अपत्यात जन्मजात गुणांच्या बाबतीत सारखेपणा आणण्याची गुरूकिल्ली जोपर्यंत मनुष्याला प्राप्त झाली नाही तोपर्यंत समाजात कोणत्या ना कोणत्या स्वरूपात विषमता ही रहाणारच हे पूर्णपणे लक्षात घेऊनच त्याने आपापली ध्येये निश्चित करणे जरूर आहे. याकडे दुर्लक्ष करून ठरविलेली ध्येये मृगजळवत ठरली ती नवल नाही. हे सर्व मान्य केल्यानंतर मात्र मला असे मुद्दाम स्पष्ट करावेसे वाटते की विषमतेविषयीची ही चिकित्सा अगदीच वरवरच्या स्वरूपाची आहे. त्यात मूलभूत मुद्याकडे दुर्लक्ष झालेले आहे. श्री. डॉ. पटवर्धन यांचाही लेख या दोषापासून मुक्त नाही. त्यात नीरक्षीर विवेकाची प्रचीती येत नाही व म्हणूनच त्यांनी काढलेले निष्कर्ष स्वीकारताना सावधगिरीची जरूर आहे. कसे तेच या लेखाद्वारे पहावयाचे आहे.

काही विषमता समाजनिर्मितच आहे व ती नष्ट करण्याचे प्रयत्न 'मृगजळ' नव्हेत.

प्रश्न हा आहे की विचारवंत माणसे या उघड दिसणाऱ्या वास्तवतेकडे पाठ फिरवून कल्पनारम्य वाटणारी ध्येये निश्चित करण्यास व ती साध्य करण्यासाठी जिवाचा होम करण्यास कशी काय प्रवृत्त होतात व अशा ध्येयांच्या मागे इतरेजन का धाव घेतात? सामान्य जनापुरते तरी याचे उत्तर असे संभवते की निसर्ग अथवा वास्तववादी जग मनुष्याला कोणत्याही ध्येयाच्या बाबतीत निरपवाद आनंद अथवा समाधान देण्याच्या कामात नेहमीच कुचराई करीत असल्याने निदान कल्पनासाम्राज्यात तरी ती साध्य असल्याचा आनंद लुटावा ही माणसाची सामान्य वृत्ती असते. यामुळेच प्रत्यक्षतः साध्य-असाध्य विचार करण्याच्या भानगडीत तो सहसा पडत नाही. न जाणो, सुखद वाटणारे एखादे ध्येय असाध्य ठरले तर त्या ध्येयाभोवती मानसिक गुंजारव करून मिळणाऱ्या आनंदासही पारखे होण्याची वेळ यायची. बहुसंख्य लोकांना असा विचार करण्याची तर कुवतच नसते. हेही एक कारण असण्याचा संभव आहे. यामुळेच अर्थहीन ध्येये सामान्य लोकांसमोर ठेवून तद्द्वारा स्वार्थ साधण्याची संधी स्वार्थसाधूंना मिळू शकते हे लक्षात घेता आपली समस्या अशी उरते की विचारवंत व बुद्धिमान लोकांचे काय? मार्क्सपुरता विचार करता प्रश्न उत्पन्न होतो की मानवजातीच्या समोर असाध्य ध्येये ठेवून








अनुक्रमणिका

त्यासाठी चंदनाप्रमाणे झिजून जीवनाचे एका अर्थाने हौतात्म्य पत्करणाऱ्या या महान विभूतीचे क्रांतिकारक विचार व कार्य निरूपयोगी व निष्फळच समजावयाचे की काय? त्याच्यायोगे मानवजातीच्या जीवनाला अधिकाधिक समृद्धता प्राप्त होण्याची शक्यता बिलकुल नाही असेच समजून आपण आपले व्यवहार चालू ठेवावयाचे की काय ? माझ्या दृष्टीने तरी या प्रश्नांची उत्तरे ठामपणे 'नाही' अशी आहेत. कसे ते आता पाहू.

'सामाजिक विषमता' हा शब्दप्रयोग अनेक वेळा अनेकजण करीत असताना कित्येक पुढारी या शब्दाच्या भांडवलावरच आपले पुढारीपण टिकविण्याचा प्रयत्न करीत असल्याचेही आढळून येते. परंतु या शब्दांची फोड करून त्याचा अर्थ निश्चित करण्याचा प्रयत्न फारसा होत असल्याचे दिसून येत नाही व त्यामुळेच तत्संबंधीच्या विचारात गोंधळ माजतो. म्हणून विषमतेचे पूर्ण स्वरूप काय आहे हे प्रथम स्पष्टपणे लक्षात घेणे आवश्यक आहे. आपण सुरुवातीला पाहिल्याप्रमाणे विषमता हा नैसर्गिक नियम असला तरी समाजात सर्वत्र व तीव्र स्वरूपात दिसून येणारी विषमता पण सर्वस्वी निसर्गनिर्मित आहे की काय याचाही विचार व्हावयास हवा. तो करता असे आढळून येते की ही विषमता काही अंशी निसर्गनिर्मित व काही अंशी मानव अथवा समाजनिर्मित आहे. उदा. निरनिराळ्या व्यक्तिगत दिसून येणारी नाकाची ठेवण, कातडीचा रंग, शरीराची ठेवण, बुद्धी, भावनाविवशता, कल्पनाशक्ती, स्मृतिशक्ती इ. बाबतीतील विषमता नैसर्गिक आहे व त्यामुळे व्यक्तीच्या जीवनात पडणारे फरक हेही स्वाभाविकपणेच नैसर्गिक होत. खरे पहाता ही विषमता नसून असमानता आहे असे म्हणणे अधिक युक्त होइल. या असमानतेची धार मानवी प्रयत्नांनी थोडीफार बोथट करणे शक्य असले तरी ती मूलतः अपरिवर्तनीय होय यात शंका नाही. परंतु समाजात दिसून येणारी सर्वच विषमता या निसर्गनिर्मित असमानतेतूनच जन्म पावते हे मान्य करणे कठीण आहे. उदाहरणार्थ, जन्मजात जातिभेदावर आधारलेली उच्चनीचता अथवा स्पृश्यास्पृश्यता जवळजवळ सारखेच शारीरिक व मानसिक गुण असलेल्या व्यक्तीपैकी काही उच्चपदावर व काही नीच पदावर, सारखेच श्रम करण्याची कुवत असलेल्या व करणाऱ्या व्यक्तींच्या उत्पन्नातील डोळ्यावर येण्याइतकी मोठी तफावत, केवळ बापजाद्यांच्या संपन्नतेमुळे अथवा असंपन्नतेमुळे संततीच्या जीवनात उत्पन्न होणारी विषमता, सत्तेचा मद, वशिलेबाजी, शासकीय भ्रष्टाचार, काळाबाजार, सत्यासत्याची क्षिती झुगारून देण्याची हिंमत इ. मुळे उत्पन्न होणारी विषमता, हे किंवा असेच अनेक प्रकार निसर्गनिर्मित आहेत असे समजणे म्हणजे समाजाच्या विकृत अवस्थेवर पडदा टाकून स्वतःची व इतरांची वंचना करणेच होय. या प्रकारची विषमता हे समाजाचे अपत्य आहे. (मग समाजाला त्याची जाणीव असो वा नसो) व समाजाने मनात आणले तर ती नष्ट करणे अगदी शक्य आहे. जो समाज कृत्रिम विषमता उत्पन्न करू शकतो तोच ती नष्टही करू शकेल याबद्दल संशय घेण्यास कोणतेही योग्य कारण दिसत नाही. नैसर्गिक भिन्नत्वामुळे उत्पन्न होणारी विषमता व समाजाची मानवकृत रचना व नियम यामुळे उत्पन्न होणारी विषमता मूलतःच भिन्न असल्याने डोळ्यावर कातडे ओढून दोन्हींची गल्लत करणे काही काळ कदाचित शक्य झाले तरी अनंतकाळपर्यंत ते शक्य होईल हा विचार पूर्णतः भ्रामक होय. समाजाच्या ज्या भागास विषमतेची आच लागते तो भाग केव्हाना केव्हा तरी बंड करून उठल्याशिवाय रहाणार नाही. अशी बंडे मोडून काढण्यात प्रस्थापित हितसंबंधी यांना काही काळ यश आल्याचे भासले तरी ते यश चिरस्वरूपी ठरण्याची सुतराम शक्यता नाही. नव्हे तसे होणे हेच मनुष्यस्वभावाचा विचार करता, अनैसर्गिक ठरेल. या दृष्टिकोनातून विचार करता समाजनिर्मित विषमता नष्ट करण्याचे ध्येय पुढे ठेवून ते साध्य करण्यासाठी बद्ध परिकर होणे म्हणजे मृगजळाच्या मागे लागणे नसून तो फक्त हक्कसंरक्षणाच्या व अन्यायप्रतिकाराच्या नैसर्गिक वृत्तीचा आविष्कार होय हे या त्रोटक विवेचनावरून स्पष्ट होईल. स्वतःच्या रक्ताचे पाणी करून दलित व पीडित समाजाला समतेची शिंकवण देणारे मार्क्ससारखे द्रष्टे खरे पहाता माणसातील अन्याय-प्रतिकाराच्या या वृत्तीला चेतवीत असतात. सामान्य जनता विचारी दैववादी व गतानुगतिक असते. पिढ्यान् पिढ्या पीडित अवस्थेत काढल्याने त्या स्थितीलाच नैसर्गिक मानण्याची तिची वृत्ती बनते. स्वतःच्या हक्कांची व ते पायदळी तुडविणाऱ्या समाजकृत अन्यायांची जाणीवही तिला बहुधा नसते मग प्रतिकाराची तर गोष्टच सोडा. काही व्यक्तींना जाणीव झालीच तरी ते अन्याय दूर कसे करून घ्यावेत हे त्यांच्या लक्षात येत नाही. इतरांची साथ मिळेल की नाही हीही शंका मनात असते. साहजिकपणेच अन्याय पिढ्यान्‌पिढ्या चालू राहतात. परंतु अशा समाजात एखादा मार्क्स अथवा आंबेडकरांसारखा तेजस्वी तारा उगवला तर तो आपल्या विचारसरणीने व कर्तृत्वाने समाजनिर्मित विषमतारूपी अन्यायास तीव्रतेने व पोटतिडकीने वाचा फोडतो, इतकेच नव्हे तर तो नष्ट करण्यासाठी समाजाच्या डोळ्यात चरचरित अंजन घालून त्यात स्वहक्क संपादनार्थ संघटित करण्याचे कार्य आपल्या शिरावर घेतो, त्यासाठी कोणतेही कष्ट वा त्याग करण्याचे बाकी ठेवीत नाही. हे अंजन




म्हणजेच समता अथवा अशाच एखाद्या उच्च ध्येयाची शिकवण होय. हे ध्येय जितके उच्च तितके अंजन अधिक चरचरीत बनते व समाजही मोठ्या प्रमाणात संघटित बनतो. अशा उच्च ध्येयात अनेकवेळा असाध्य अशा घटकांची सरमिसळ होत असली तरी त्यामुळे मूळ कार्याचे महत्त्व कमी होत नाही अथवा त्याला बाधाही येण्याचे कारण नाही. कालौघात असाध्य भाग बाजूला पडेल व 'साध्य' भागाचा मार्ग समाज चोखाळू लागेल. म्हणून असाध्य भागाची मृगजळ म्हणून बोळवण करणे अगदी रास्त असले तरी या सुक्यावरोबर साध्याचे ओलेही जाळून टाकण्याचा प्रयत्न व्यर्थ होय. यामुळेच मार्क्सच्या विचारसरणीतील पूर्ण समानता, शासनविरहित समाज, शोषणहीन समाज वगैरे भाग मृगजळवत असला तरी त्यामुळे त्यामागील दृष्टिकोनच चुकीचा अतएव ताज्य आहे असे म्हणणे कोणत्याही परिस्थितीत समर्थनीय ठरणार नाही व ते कालक्रमात टिकणारही नाही.

**मार्क्सनंतर समाजात झालेली स्थित्यंतरे**

मार्क्सनंतर मार्क्सवादाच्या आश्रयाने व मागोव्याने समाजात जी स्थित्यंतरे झाली व अजूनही होत आहेत त्याकडे नुसती ओझरती नजर टाकली तरी याची सत्यता प्रतीत होऊ शकेल. औद्योगिक क्रांतीच्या सुरवातीच्या नावात समाज पूर्णांशाने भांडवलशाही प्रधान होता. कारखाने तर भांडवलदारांच्या खाजगी मालकीचे होतेच. शिवाय कारखानदारांवर कोणाचेही कसल्याही प्रकारचे नियंत्रण नव्हते; इतकेच नव्हे तर असे नियंत्रण असणे हे तत्कालीन अर्थशास्त्रीय सिद्धातांच्या विरुद्ध होते. मजुरांचा पगार व तो नियमित मिळण्याची खात्री, त्यांची कामावरील सुरक्षितता व कामाची शाश्वती, त्यांना मिळणारी रजा, अधिकाऱ्यांची त्यांच्याशी होणारी वर्तणूक, वृद्धापकाळातील निर्वाहाची सोय, कामाचे तास इत्यादि सर्वच बाबतीत त्यांची स्थिती अतिशय दयनीय होती. त्यांना काहीही हक्क नव्हते, ते पूर्ण दास्यत्वाचे जिणे जगत होते. त्यांच्या जीवनाची जणू किंमतच नव्हती. 'मुकी बिचारी कुणी हाका' हेच त्यांचे नशीब होते. लहानथोर हा भेद करण्याचीही प्रथा नव्हती. अगदी कोवळ्या कोवळ्या मुलांनाही गुराढोरांप्रमाणे कामास जुंपले जाई व वागणूकही तशीच मिळे. थोडक्यात म्हणजे कामकऱ्यांचे सर्वांगीण जीवन भांडवलवाल्यांच्या निव्वळ मर्जीवर अवलंबून असते. याच काळात मार्क्सने 'जादा नफ्याचा सिद्धांत' मांडून भांडवलशाहीचे सत्यस्वरूप उघडकीस आणले व मजुरांवर होणाऱ्या अन्यायास फारच प्रभावीपणाने वाचा फोडली, इतकेच नव्हे तर हा अन्याय दूर करून घेण्यासाठी जगातील सर्व मजुरांना एकत्र येण्याची हाक दिली. 'जगातील मजुरांनो, संघटित व्हा. बेड्या (बंधने) शिवाय तुमच्याजवळून हिरावून घेण्यासारखे काहीही नाही परंतु जिंकण्यास मात्र तुम्हास सर्व जग मोकळे आहे.' हे मार्क्सचे उद्‌गार आजही मजुरांना रोमांचित करण्याइतके प्रभावी आहेत. मार्क्सने घातलेल्या कामगार चळवळीच्या या पायाचेच पुढे जगड्व्याळ वृक्षात रूपांतर झाले. भांडवलशाहीवर समाजाची व सरकारची एका मागून एक नियंत्रणे येऊ लागली व उपयुक्त बाबतीत कामगारांची स्थिती झपाट्याने सुधारू लागली. या सुधारणेचा अंतिम पल्ला अजून गाठला गेला नाही तरी त्या दिशेने वाटचाल मात्र निश्चितपणे चालू आहे. मार्क्सला अभिप्रेत असलेला पल्ला बहुधा केव्हाच गाठला जाणार नाही. हे सत्य असले तरी सुधारणेच्या प्रगतीबद्दल संशय घेणे कोणासही शक्य नाही. असाध्य भाग हळूहळू बाजूला पडत आहे. उदाहरणार्थ, शासनसंस्था विरून जाईल, अथवा सर्वांना सारखाच पगार कधी काळी मिळेल असे गंभीरपणे मानणारे अपवादरूपच असतील. परंतु पगारातील विषमता कमी केली पाहिजे, प्रत्येकाला काम मिळण्याचा हक्क आहे. वगैरे सिद्धांत सर्वमान्य झाले असून परिस्थितीच्या अनुकूलतेप्रमाणे हळूहळू कार्यवाहीत येत आहेत हे विसरून जाण्यात काय अर्थ आहे ? तात्पर्य असे की मार्क्सवादाने भांडवलशाहीच्या स्वरूपात मानवतेच्या दृष्टीकोनातून क्रांति घडवून आणली आहे. हे मोकळेपणाने मान्य करणेच प्रामाणिकपणाचे व वस्तुस्थितीस धरून होईल.

वरील विवेचन मान्य करणारांपैकीही अनेकजण कदाचित अशी पृच्छा करण्यास प्रवृत्त होतील की उघड उघड असाध्य असणारे ध्येय दलित जनतेसमोर ठेवण्यात मार्क्सने जनतेची दिशाभूल करण्याव्यतिरिक्त अन्य कोणता पुरूषार्थ साधला ? याचे उत्तर पुढीलप्रमाणे देता येईल. जनतेची दिशाभूल करण्याचा विचार मार्क्सच्या मनात असू शकेल हे सूज्ञ बुद्धीस पटणार नाही. समानता, शोषण व शासनविरहित समाजाची निर्मिती ही शक्य कोटीतील बाब आहे असे त्याला खरोखरीच वाटत असणे मुळीच असंभवनीय नाही. परंतु याहीपेक्षा महत्त्वाचे कारण हे असावे की समाज ढवळून काढण्यासाठी मिळमिळीत ध्येयवाक्यापेक्षा असाध्य का होईना परंतु आकर्षक, तीव्र व सनसनाटी ध्येयवाक्ये अधिक परिणामकारक होतात हे लक्षात घेऊन मार्क्सने अशा ध्येयाचा पुरस्कार केला असणे शक्य आहे. अशा स्थितीत ध्येयवाक्यांच्या वाच्यार्थाकडे लक्ष द्यावयाचे नसून लक्ष्यार्थावर शक्ती केंद्रित करावयाची असते हेच विवेकीपणाचे लक्षण होय. मार्क्सने वर्तवलेली अनेक भविष्ये खोटी ठरली आहेत. उदाहरणार्थ दिवसेंदिवस भांडवलवाले अधिकाधिक

श्रीमंत व मजूर अधिकाधिक गरीब होत जातील, अथवा जगातील भांडवलवाले मजुरांविरुद्ध एकत्र येतील वगैरे. परंतु यायोगे मार्क्सवादाच्या मूलभूत महत्त्वाला धक्का पोचत नाही.

### इतर चुकीच्या कल्पना

पिळवणुकीसंबंधीच्या विवेचनातही डॉ. पटवर्धनांचा असाच गोंधळ उडालेला दिसतो. पिळवणुकीद्वाराच समाजात संपत्ती उत्पन्न होते हे म्हणणे वाच्यार्थाने खरेच आहे. परंतु महत्त्वाचा मुद्दा हा आहे की पिळवणूक कोणी, कोणत्या हेतूने व किती प्रमाणात केल्यास ती अनिष्ट मानायची हा विवेक न करता "सव घोडे वारा टक्के" अशा विवेचनातून काहीच निष्पन्न होणार नाही. सरकार अनेकविध कर बसविते हाही पिळवणुकीचा प्रकार होय व त्याचा अवलंब करणे कट्टर व पूर्णतः समाजवादी सरकारलाही चुकत नाही. परंतु या पिळवणुकीचा हेतू सामाजिक न्याय प्रस्थापित करून समाज समृद्ध करणे हा असतो म्हणून त्यात आक्षेपार्ह तर काही नाहीच उलट ते स्वागतार्हच होय. कारण पिळवणुकीच्या प्रमाणात समाजाची समृद्धी वृद्धिंगत होण्याची शक्यता त्यात असते. अशा प्रकाराला पिळवणूक म्हणणे म्हणजे त्या शब्दाच्या अर्थाची विटंवना करणेच होय. ही पिळवणूक नसून समाजाच्या समृद्धीसाठी व्यक्तीने हातभार लावणे आहे. मार्क्सच्या काळी किंवा हल्लीही भांडवलवाले मजुरांची जी पिळवणूक करतात ती समाजाच्या हितासाठी नसून स्वतःचा नफा वाढविण्यासाठी असते. हीच खऱ्या अर्थाने पिळवणूक होय व मार्क्सने उठविलेले रान तिच्याविरुद्ध होते. पूर्वी या पिळवणुकीला काही मर्यादाच नसे. निदान जिवंत रहाण्यास जरूर एवढी मजुरी न दिल्यास सोन्याची अंडी देणा-या कोंबडीसच ठार मारल्यासारखे होऊन कारखानेच बंद पडतील या भीतीने त्यासाठी अत्यावश्यक इतकी कमीतकमी मजुरी देऊन जास्तीतजास्त नफा खाण्याकडे भांडवलदारांचा कल असे व ते त्याचा पुरेपूर फायदा उठवीत असत. मार्क्सप्रणीत चळवळीमुळे आता नफ्यावर बंधने आली. किमान मुजरीबावत नियम होऊ लागले इतकेच नव्हे तर भांडवलदारांच्या नफ्यात मजुरांचीही भागीदारी आहे हे तत्त्व वाढत्या प्रमाणात मान्य होऊ लागले आहे. कारखान्यांच्या व्यवस्थापनात मजुरांना भागीदारी देण्याचे तत्त्वही हळूहळू उदय पावत आहे. हे सर्व लक्षात घेता मार्क्सवादाने मानवता, हक्कांची जाणीव व सामाजिक न्याय या दिशेने मानवजातीची प्रगती घडवून आणण्याच्या कार्यात फारच मोठा वाटा उचलला आहे व पुढेही तो उचलीत राहील याबद्दल शंका रहात नाही. म्हणूनच भारताने समाजवादाचा पुरस्कार करण्यात गैर काही आहे असे समजण्यास कोणतेही संयुक्तिक कारण दिसत नाही. जो भाग मूलतः अशक्य, अव्यवहार्य अथवा आपल्या पारंपारिक संस्कृति-मूल्यांशी विरोधी आहे त्याचाही स्वीकार केलाच पाहिजे अशी सक्ती कोणाही आपणावर करू शकत नाही. आपण समाजवाद स्वीकारला तोही स्वेच्छेने. दुस-यांच्या भीड अथवा वजनाने नव्हे. परंतु डॉ. साहेबांच्या लेखाचा कल 'खाइर्न तर तुपाशी नाहीतर उपाशी' असा आहेसे वाटते ते योग्य नव्हे.

### समाजवाद अपरिहार्य गरज

मानवता, सामाजिक न्याय व हक्काची जाणीव इतक्यापुरता तर समाजवाद स्वीकारण्यास काहीच हरकत नाही; नव्हे ती काळाची अपरिहार्य अशी गरज आहे. भारताच्या बावतीत खेदाची गोष्ट अशी आहे की समाजवादाचा पुरस्कार करणाऱ्या पक्षात, विशेषतः राज्यकर्त्या पक्षात सर्वच गोष्टीत विचारांचा गोंधळ व उथळपणा फार मोठ्या प्रमाणात असल्याने समाजवादाचा निश्चित कोणता अर्थ आपणास अभिप्रेत आहे हे स्पष्ट करण्याची तसदी ते घेत नाहीत. मग संदिग्धतेच्या आश्रयाने आपल्या पक्षाचे निवडणुकीतील स्वार्थ साधणे या हेतूने हे घडत असो अथवा देशाचे हित कशात आहे याबद्दल मुलभूत स्वरूपाचा विचार करण्याची त्यांची कुवतच मर्यादित असल्याने घडत असो. कारण कोणतेही असले तरी देशाच्या दृष्टाने ते दुर्दैवच आहे. डॉ. पटवर्धनांच्या लेखातील अनेक मुद्यांशी माझे मतभेद असले तरी अशा लेखामुळे विचार मंथन होऊन आपण नक्की केलेल्या राजकीय ध्येयांचा नेमका कोणता अर्थ आपल्याला अभिप्रेत आहे या संबंधीच्या विचारांना हळूहळू मूर्त स्वरूप येत जाईल असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. म्हणूनच स्वतंत्र बुद्धीने लिहिलेल्या अशा लेखाचे स्वागत.



लोकशाहीत दोष नाहीत असे नाही.
परंतु इतर कोणत्याही राज्यपद्धतीत असणाऱ्या दोषांपेक्षा ते कमी आहेत.

\- विन्स्टन चर्चिल

# भारतीय समाजवादी विचारप्रवाहांचे भवितव्य

प्रा. हिं. ए. चव्हाण

"But a free society entering into the possession of the common heritage must seek in free association and in the free federation of groups a new organisation appropriate to the new economic phase of histroy"

- Peter Kropotkin ("Mutual Aid")

युरोपात फ्रान्स व इटाली आणि आशियात भारत व जपान या विरोध स्वातंत्र्यावर अधिष्ठित असलेल्या संसदीय लोकशाहीच्या राष्ट्रात समाजवादाच्या प्रयोगाला नव्या दिशा लाभण्याची फार शक्यता आहे.

आपल्या देशात समाजवादाचे भवितव्य काय हे ठरविण्यापूर्वी भारतीय लोकशाही चळवळीच्या इतिहासाची थोडी पार्श्वभूमी लक्षात घेऊन आणि स्वातंत्र्यप्राप्तीनंतरची समाजवादी विचारांच्या चळवळीची उत्क्रांती नजरेसमोर ठेवून पुढील कालखंडात ही चळवळ कोणत्या दिशेने जाऊ शकते याची चाहूल घ्यायची आहे.

### (१) विचारांची मंद गती

लोकशाही समाजपद्धतीची ज्याला तोंडओळखही नव्हती असा आपला देश ज्या काळात ब्रिटिश साम्राज्यशाहीने अंकित केला त्या काळात पाश्चात्त्य देशात मानवतावादी विचारांनी दोन दिशांनी महत्त्वाची पावले टाकायला सुरुवात केली होती आणि दुसरी विज्ञाननिष्ठ समाजवादाची. लोकशाही आणि समाजवाद या विचारसरणीतील संघर्ष आणि सलोखा यांचे स्वरूप ठरविण्यात पाश्चिमात्य विचारविश्व ज्या काळात गुंतले होते त्या काळात भारतीय मन मध्ययुगीन मूल्यांच्या प्रदीर्घ निद्रेतून बाहेर पडायचेच होते. ब्रिटिश सत्तेच्या आगमनानंतर भारतीय बुद्धीला विज्ञाननिष्ठा, उदारमतवाद, व्यक्तिस्वातंत्र्य व लोकशाही यांचे मंद गतीने दर्शन घडत होते, त्याच शतकात पाश्चात्त्य बुद्धी ही समाजवादी मानवतावादाच्या दिशेन भरधाव व निर्णायक पाऊले टाकीत होती. पाश्चात्यांच्या मानाने भारतीयांना या विचारांचे दर्शन जवळजवळ एक शतकाच्या उशिराने घडले. भारतीयांना समाजवादी विचारांची ओळख होण्याचा कालखंड १९२० नंतरचा आहे. १९२० ते १९४७ या कालखंडात आपल्या प्रगत बुद्धिवंतांचे विचार राष्ट्रवाद, राष्ट्रीय मुक्ती, लोकशाही आणि समाजवाद यांची सुसंगती शोधण्याच्या कामात गुंतले होते. या विचारप्रक्रियेच्या अर्धवट विकासावस्थेतच आपल्या राजकीय स्वातंत्र्याचा उदय झाला. स्वातंत्र्याने आपल्याला असावध व अनिर्णित अवस्थेतच गाठले.

### २) परंपरावाद आणि फॅसिझम

इ. स. १९२० नंतर ब्रिटिश साम्राज्यशाहीविरोधी राष्ट्रीय चळवळीत गांधीवाद व समाजवाद हे दोन प्रवाह परस्परांशी झुंज घेत तर कधी समन्वय साधीत पुढे सरकू लागलेले दिसतात. इ. स. १९२० पूर्वीच्या राष्ट्रीय आंदोलनाला भारतीय परंपरानिष्ठ पुनरुत्थानवादी विचारमूल्यांची मुख्यतः बैठक लाभलेली होती. त्याचवेळी दुसऱ्या बाजूला उदारमतवादी लोकशाही मूल्यांचा ध्वजही उभारला जात होता. भारतीय पार्श्वभूमीवरील पुनरुज्जीवननिष्ठ सुधारणावाद आणि पाश्चिमात्य आदर्शाचा व्यक्तिस्वातंत्र्यनिष्ठ सुधारणावाद यांची जोड उदारमतवादी लोकशाही विचारमूल्यांना देण्याचे प्रयत्न करणारा विचारवंतांचा प्रवाह त्या काळातील प्रगतिशील प्रवाह असून, भारतीय सरंजामशाहीस पूरक असा परंपरानिष्ठ पुनरुत्थानवादी विचारप्रवाह हा (भारतीय स्वातंत्र्यसंघर्षातील त्याची एक भूमिका वगळल्यास) प्रतिगामी होता. आपल्या राष्ट्रवादाचा विकास प्रारंभापासून असाच विरोधपूर्ण परिसरातून प्रवास करतो आहे.

इ. स. १९२० नंतरच्या राष्ट्रीय चळवळीवर महात्मा गांधी व जवाहरलाल नेहरू यांचे नेतृत्व प्रस्थापित झाल्यानंतर भारतीय परंपरानिष्ठ प्रतिगामी प्रवाह राष्ट्रीय चळवळीपासून दूर फेकला गेला. आणि भारतीय स्वातंत्र्यसंग्रामातील त्याची काहीशी पुरोगामी असलेली पूर्वीची भूमिकाही संपुष्टात आली. राष्ट्रीय चळवळीत तो अल्पसा उरलेला कुठे कुठे दिसला तरी त्याचे स्वरूप आता बदललेले होते. त्याला नवीन प्रवाहाशी तडजोड साधावी लागत होती. एकंदर राष्ट्रीय चळवळीत त्याला कुठलेही निर्णायक महत्त्व उरलेले नव्हते. टिळकांच्या नेतृत्वांती हा प्रवाह जवळजवळ इतिहासजमा व्हायच्या क्रमास लागला होता. पण तो दुसरीकडे वेगळ्या स्वरूपात प्रकट झाला.

अनुक्रमणिका

सावरकरांचा हिंदुत्वनिष्ठ सुधारकधर्तीचा राष्ट्रवाद आणि डॉ. हेडगेवार प्रणित रा. स्व. संघाचा फॅसिस्ट आदर्शाचा हिंदुराष्ट्रवाद हे धार्मिक अथवा जातीय प्रवृत्तीच्या राष्ट्रवादाचे विचारप्रवाह जुन्या परंपरानिष्ठ पुनरुत्थानवादी विचारप्रवाहांचे नवे वारसदार होते. हे प्रवाह इ. स. १९४७ पर्यंत म्हणजे स्वातंत्र्योदयापर्यंतही राष्ट्रीय चळवळीच्या विरोधातच वाढले. भारतीय मध्यमयुगीन घडणीच्या सरंजामी व मध्यमवर्गीय मनावर त्यांचा प्रभाव वाढत गेला. स्वातंत्र्योत्तर काळात ऐहिकतावादी लोकशाही, व्यक्तिस्वातंत्र्य व समाजवाद यांच्या विरोधी विचारांचा प्रवाह मुख्यतः जनसंघाच्या स्वरूपात पुढे आला. मुक्तस्पर्धापूर्ण स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारा 'स्वतंत्र पक्ष' मात्र राष्ट्रीय चळवळीतून स्वातंत्र्योत्तर काळात वेगळा झालेला प्रवाह असून त्याला ऐहिकतानिष्ठ राष्ट्रवादाचे व उदारमतवादी लोकशाहीचे अधिष्ठान आहे. तरीही या दोन उजव्या प्रवाहात समाजवाद विरोधाचे मोठेच साम्य असल्यामुळे त्यांची पुढील कालक्रमात एकवटण्याची शक्यता आहे.

### ३) राष्ट्रवादाचे नवे वळण

इ. स. १९२० ते १९४७ या कालखंडातील राष्ट्रीय चळवळीतील नव्या नेतृत्वाने त्या पूर्वीच्या कालखंडातील (इ. स. १८८५ ते १९२०) - (१) भारतीय पार्श्वभूमीवरील पुनरुज्जीवन-निष्ठ सुधारणावाद आणि (२) पाश्चिमात्य आदर्शाचा व्यक्तिस्वातंत्र्यनिष्ठ सुधारणावाद हे दोन्ही प्रगतिशील विचार स्पष्टपणे स्वीकारले आणि संपन्न केले. म. गांधी व नेहरू या दोघांनीही आपल्या राष्ट्रवादाचे हे प्रथम कालखंडातील विचारसूत्र अचूकपणे पकडून ठेवले. त्याशिवाय त्यांनी आपल्या राष्ट्र-वादाला आणखी नवा आशय दिला. म. गांधींनी अराजकवादी, विकेंद्रित अर्थव्यवस्थेवर आधारलेला, अपरिग्रहप्रवृत्तीचा, विश्वमानवाची समता अभिप्रेत असणारा, पिळवणूकशून्य समाज आदर्श म्हणून समोर ठेवला. म. गांधींच्या या आदर्श अराजकवादाने आपल्या राष्ट्रवादाला आपल्या परीने संपन्न केले आणि समाजवादाच्या जवळपास आणून बसविले. पण या विचारसरणीत एक मोठेच वैगुण्य होते. तिला विज्ञाननिष्ठेचे अधिष्ठान नव्हते. अध्यात्मिक वळणाचा मानवतावाद हाच तिचा पाया होता. भारतीय अध्यात्मिक विचारसरणीची अशास्त्रीय व निवृत्तिवादी जीवनदृष्टी म. गांधींच्या श्रमनिष्ठ कर्मवादालाही मुक्त ठेवू शकली नाही. ही उणीव नेहरूंच्या विचारात नव्हती. पाश्चात्यांची विज्ञाननिष्ठा, ऐहिकताप्रीती, लोकशाही, व्यक्ति-स्वातंत्र्य आणि समाजवाद ही अत्याधुनिक जीवनमूल्ये नेहरू ज्या विचारप्रवाहाचे नेते होते त्या विचारप्रवाहात प्रतिष्ठा पावली होती. आपल्या राष्ट्रवादाचे शंभर टक्के लोकशाहीकरण नेहरूंनी केले आणि त्याला समाजवादाभिमुख बनविण्याचा प्रयत्नही मुख्यतः त्यांनीच केला. भांडवलदार हे जनतेचे खजिनदार असावेत, ही म. गांधींची कल्पना ज्यावेळी वर्गसंघर्षाची धार बोथट करीत होती, त्याचवेळी राष्ट्रीय चळवळीने या संघर्षात श्रमिकनिष्ठा बाळगावी अशी विचारसरणी नेहरूप्रवाहाकडून प्रतिपादली जात होती. समाजवादी शक्ती तशाच इतर जहाल राष्ट्रवादी शक्तीही मुख्यतः नेहरूंभोवती गोळा होऊन राष्ट्रीय चळवळीत कार्यप्रवण झालेल्या होत्या.

पण स्वातंत्र्यानंतर नेहरूंनी आपल्या समाजवादाला मुरड घातली व वेगळेच वळण दिले. एकाच वेळी भांडवलशाही व समाजवादी अर्थरचनेची सांगड घालण्याचा प्रयत्न करून पाहिला. हा प्रयोग कितपत यशस्वी झाला व कितपत अयशस्वी झाला, हे अजून ठरायचे आहे. नेहरूंनी ज्या काळात भारतीय समाजरचनेची घडण करण्याचे कार्य हाती घेतले तो काळ समाजवादी विचारक्षेत्रात जागतिक पातळीवर वृद्धीचा पण अरिष्टाचा काळ होता. कम्युनिस्टप्रणीत समाजवादातील पक्षस्वातंत्र्याधिष्ठित संसदीय लोकशाहीचा अभाव आणि पक्षीय हुकुमशाहीची विकृती टाळून समाजवाद प्रस्थापित करू पाहणारी वेगळी समाजवादी शक्ती जगभर वाढलेली होती पण प्रत्यक्षात तिला कुठेही सत्ता हस्तगत करून प्रयोग करण्याचे सामर्थ्य प्राप्त होऊ शकले नाही. उलट समाजवादासाठी राष्ट्रीयीकरणाची अथवा सामाजिकीकरणाची आवश्यकता उरली नाही, असा ब्रिटनचा समाजवादी विचारांचा मजूरपक्ष सांगू लागला होता. मागासलेल्या अर्थव्यवस्थेच्या देशात समाजवाद आणता येत नाही, औद्योगिक सुसंपन्नता ही समाजवादासाठी पूर्वअट आहे, हा पाश्चात्त्य समाजवादी तत्त्वज्ञांचा इशारा नेहरू मुळीच विसरू शकले नाहीत. समाजवादी विचारांचे बलवान प्रवाह - कॉंग्रेस समाजवादी व साम्यवादी पक्ष - राष्ट्रीय पक्षातून केव्हाच बाहेर पडून आपले बळ स्वतंत्रपणे वाढवू लागले होते. अशावेळी नेहरूंनी भारताच्या आर्थिक विकासासाठी एक संमिश्र अर्थ-व्यवस्थेचा प्रयोग करून पाहिला. या प्रयोगात 'गरीब अधिक गरीब आणि श्रीमंत अधिक श्रीमंत' झाल्याचे अनपेक्षित चित्र शेवटी शेवटी नेहरूंना दिसू लागले आणि एका बेचैन वैफल्यातच नेहरूंनी आपल्या आयुष्याचा प्रवास समाप्त केला. समाजवादी विचारांचा व प्रात्यक्षिकाचा एक कालखंड नेहरूंच्या जीवनास्ताबरोबरच संपुष्टात आला.






अनुक्रमणिका

### ४) गांधींजींचा दूरदर्शीपणा

पं. नेहरूंनी चालविलेल्या आर्थिक धोरणात व कार्यक्रमात लालबहादूर शास्त्री व इंदिरा गांधी यांनी बदल केला नाही. साधारणतः विकासाची तीच दिशा स्वीकारूनही, नियोजनाची तीच चौकट कायम ठेवूनही नेहरूंनंतर झालेल्या पहिल्याच सार्वत्रिक निवडणुकीत नेहरूंच्या काँग्रेस पक्षाची अर्धी शक्ती कमी झाली, अर्धी सत्ता ढासळून पडली. नेहरूंनाही कदाचित काँग्रेसचा हा पराभव रोखता आला असता काय, हा प्रश्नच आहे. कारण स्वातंत्र्योत्तर काळात झालेल्या भारताच्या चार सार्वत्रिक निवडणुकीत क्रमशः काँग्रेसची शक्ती ढासळत चालली आहे असे दिसते. या सार्वत्रिक निवडणुकीत (१९६७) जवळजवळ अर्ध्या राज्यात काँग्रेसच्या हातून सत्ता विरोधकांकडे गेली; आणि मध्यवर्ती सत्ताही हातातून जाताजाताच वाचली. हाच क्रम पुढे थोडा जरी सरकला तरी पुढल्या एकदोन निवडणुकीतच कॉंग्रेसचे अधिराज्य संपुष्टात येण्याची शक्यता आहे. इ. स. १८८५ मध्ये स्थापन झालेला हा बलशाली कॉंग्रेस पक्ष इ. स. १९८५ पूर्वीच - म्हणजे शंभरी गाठण्यापूर्वीच अकार्यक्षम होऊन आपले जीवनकार्य अपयशाचा निश्वास टाकून संपविणार, हा राजकीय पक्षांच्या वाट्यास येणारा दैवदुर्विलासच होय!

कॉंग्रेस पक्ष आणि राष्ट्रीय चळवळ हे समानार्थी शब्द नसले तरी त्यात फार मोठे साम्य आहे. कॉंग्रेस म्हणजे राष्ट्रीय चळवळीचे माध्यम, राष्ट्रीय चळवळ ही आपल्या देशातील भिन्न विचारप्रवाहाचे प्रतिनिधित्व करणारी एक विशाल शक्ती होती. वैचारिक संघर्षातूनही राष्ट्रैक्य साधून या चळवळीने जगातील सर्वात मोठ्या गुलाम देशाचे सगळ्यात मोठ्या साम्राज्यशाही पासून दास्यविमोचन केले, हे ऐतिहासिक महत्त्वाचे पवित्र कार्य होय. हे कार्य संपताच, म्हणजे इ. स. १९४७ साली काँग्रेस पक्ष विसर्जित करावा, ही म. गांधींची भूमिका फार दूरदर्शीपणाची होती. म. गांधींच्या विचारांना शास्त्रीय विचारपद्धतीची बैठक नसूनही म. गांधी अत्यंत दूरदर्शी नेते होते, द्रष्टेच होते. प्रचंड साम्राज्यशाही सत्तेशी नवीन प्रकारची झुंज देऊन स्वातंत्र्यप्राप्तीचे मंगलकार्य करणारा महान पक्ष म्हणून काँग्रेसला जनतेच्या हृदयसिंहासनावर जे स्थान होते ते पुसले जाऊ नये म्हणून पक्षविसर्जनाशिवाय दुसरा पर्याय म. गांधींना दिसला नाही. विविध प्रवाहांचा, हितसंबंधी व्यक्तींचा आणि गटांचा हा पक्ष सत्तेवर बराच काळ राहिला तर भ्रष्ट होईल आणि कालांतराने तो जनतेच्या मनातून उतरेल हे गांधींनी हेरले होते. काँग्रेस ही वेगवेगळ्या विचारप्रवाहांची संघटना असून भिन्न विचारप्रवाहांची एकता ही तिची जशी शक्ती तसाच हा तिचा दुबळेपणा होता. कारण कालक्रमात विचारांचे ध्रुवीकरण होणारच. वेगवेगळे प्रमुख प्रवाह भिन्न झाल्यावर मग कॉंग्रेस ती काय उरावी? त्यापेक्षा ज्या कार्यासाठी मुख्यतः काँग्रेसची स्थापना झाली होती ते स्वातंत्र्यप्राप्तीचे कार्य साध्य होताच तिचे विसर्जन होऊन तिच्यातून वेगवेगळे प्रवाह पक्ष म्हणून संघटित होणे इष्ट ठरले असते. कॉंग्रेसमध्ये स्वातंत्र्यप्राप्तीच्या वेळी तीन प्रवाह स्पष्ट होते. १) समाजवादी विचारांचा डावा प्रवाह २) मुक्त भांडवलशाहीचा पुरस्कर्ता उजवा प्रवाह ३) गांधीवादीपद्धतीने समाजकल्याण अथवा साम्ययोग साधू पाहणारांचा आणि उदारमतवादी लोकशाहीवाद्यांचा मध्यमार्गी प्रवाह. साधारणतः हे तीन राजकीय प्रवाह काँग्रेसच्या उदरातून बाहेर पडले असते व आपल्या देशात शक्तींचे ध्रुवीकरण जलद घडले असते. या तीन राष्ट्रीय प्रवाहाला तत्समान प्रवृत्तीचे झरे येऊन मिळाले असते. संसदीय लोकशाही अधिक प्रभावी, गतिमान, फलदायी आणि आकर्षक झाली असती. गेल्या दोन दशकात राजकीय सत्तेच्या क्षेत्रात आढळणारा एकसुरीपणा तर केव्हाच संपला असता.

### ५) पक्षविसर्जनाची अभिनव कल्पना

आणखी एक दुसरी शक्यता होती.

म. गांधी हे आदर्श समाजरचनेसाठी अराजक पद्धतीचा स्वीकार करणारे पौर्वात्य जगातील एकमेव विचारवंत होते. अंतिम समाजनिर्मितीच्या बाबतीत कार्ल मार्क्सही शासनशून्य अराजकाचा पुरस्कर्ता होता. याबाबतीत कदाचित ते दोघेही अव्यवहार्य स्वप्नरंजनवादी असतील. पण त्यांच्या या विचारात काही सत्याचे कणही आढळतात. राज्य, शासन, पक्ष इ. समूहसंघटना शेवटी वर्चस्ववादी होतात व मानवाच्या सर्वांगीण व्यक्तिविकासाला मारक ठरतात, या सत्याची त्यांना दूरदर्शी जाणीव झालेली होती, म्हणूनच अंतिम आदर्शाच्या दृष्टीने ते अराजकवादी विचाराकडे झुकले होते. मार्क्सला हे कार्य श्रमिकांचा मजबूत पक्ष बांधून करायचे होते. गांधींना साध्य व साधन यांची सुसंगती संमत होती. समूहवादी साधनातून विकेंद्रित व व्यक्तिविकासपूरक समाजरचना घडविता येणार नाही, याची त्यांना जाणीव झालेली असावी. याच संदर्भात त्यांनी कॉंग्रेस पक्षविसर्जनाची कठोर कल्पना व्यक्त केली असावी.

आणखी एक श्रेष्ठ विचारवंत आपल्या देशात अशाच निर्णयापर्यंत याच कालक्रमात येऊन पोचला होता. पक्ष हे हुकुमशाहीचे शेवटी साधन होते, हे साधन व साध्य यात अनिष्ट विसंगती निर्माण होते आणि शेवटी हे साधनच इतके भ्रष्ट होते की त्याचीच एक नवी गुलामगिरी मानवाच्या मानेवर बसते, हे विचार

जागतिक प्रमाणावर पक्षपद्धतीच्या अनुभवातून अनेक विचारवंतांच्या विचारकक्षेत येऊ लागले होते. आपल्या देशात या विचारकक्षेपर्यंत सुसंगतपणे प्रथम पोचण्याचा मान एम्. एन्. रॉय यांचा आहे. त्यांनी हा विचार प्रत्यक्षात आणण्यासाठी स्वतःच्या नेतृत्त्वाचा नवमानवतावादी पक्ष विसर्जितही केला. रॉय यांच्या विचारांची बैठक काटेकोरपणे शास्त्रीय होती. म. गांधींना झालेली पक्षविसर्जनाची जाणीव ही वेगळ्याच सहजप्रवृत्तीतून संभवली. विकेंद्रित अर्थरचनेला व राजकीय प्रयोगाला सर्वंकष पक्ष मारक ठरतात हे विकेंद्रीकरणावर आत्यंतिक भर देणाऱ्या गांधीजींना सहजप्रवृत्तीने कळले असावे; यात अगदी अशक्य असे काही नाही. पण आपला हा निर्णय काँग्रेस पक्षावर लादण्याइतकी अथवा पक्षाकडून हा निर्णय मंजूर करून घेण्याइतकी सुस्पष्टता व सुनिश्चितता त्यांच्या विचाराला येऊ न शकल्यामुळे त्यांचे ते विचार आता केवळ संशोधकाच्या अवधानापुरतेच मर्यादित ठरले आहेत.

म. गांधींच्या म्हणण्याप्रमाणे काँग्रेस पक्षाचे विसर्जन झाले असते तर काँग्रेसमध्ये वर उल्लेखिलेले प्रवाह पक्षरूप धारण करण्यापेक्षा प्रवाहरूप राहून व्यक्तिमाध्यमातून ठिकठिकाणी वर आले असते. आणि कुणी सांगावे कदाचित अपक्षीय लोकशाहीच्या एका आदर्श प्रयोगाला येथे प्रारंभ झाला असता.

पण हे घडले नाही. आणि आता हे घडण्याचा क्रम फार पुढे लोटला गेला आहे. या क्रमाचा विकासही आता वेगळ्या स्वरूपाचा रहाणार आहे. आज तो क्रम सुनिश्चितपणे व सुस्पष्टपणे दृष्टिपथात येत नाही. आज जे दृष्टिपथात येऊ शकते ते भारतातील विचारशक्तींचे पक्षमाध्यमातून ध्रुवीकरण. हे ध्रुवीकरण साध्य झाल्यावर पक्षपद्धतीच्या विसर्जनाचा क्रम सुरू होऊ शकेल काय, हे पाहण्यासारखे आहे.

### ६) डावे व उजवे यांची सत्तास्पर्धा

इ. स. १९६७ च्या सार्वत्रिक निवडणुकीतून सत्तासंक्रमणाचा प्रश्न आज आपल्या विचारवंतांपुढे स्पष्टपणे आलेला असून त्याचे त्वरित उत्तर शोधण्याची गरज निर्माण झाली आहे.

काँग्रेस विलयाच्या क्रमात असताना सत्तास्पर्धेच्या आखाड्यात उजवे आणि डावे विचारप्रवाह समोर येत आहेत. चवथ्या सार्वत्रिक निवडणुकीचे निकाल लक्षात घेता डाव्यांची शक्ती वाढली आहे; यात शंका उरत नाही. मात्र त्याचबरोबर देशाच्या ज्या भागात सरंजामशाहीचे अवशेष शिल्लक आहेत त्या भागात जनसंघासारखा फॅसिस्ट प्रवृत्तीचा प्रतिगामी पक्ष पुढे येत आहे. भांडवलदार व सरंजामदार यांच्या पाठिंब्यावर वाढणारा मुक्तस्पर्धावादी स्वतंत्र पक्ष काही विभागात वाढला आहे. दोघांची मिळून जी शक्ती तयार होते ती आणि काँग्रेसमधील आत्यंतिक उजव्या प्रवृत्तीची एक शक्ती मिळून एक राष्ट्रव्यापी उजवी शक्ती आक्रमकपणे पुढे येऊ पहात आहे. या शक्तीतून भांडवलशाहीला स्वैर स्वातंत्र्य देणाऱ्या औपचारिक लोकशाहीचा तसाच फॅसिझमचा उदय होऊ शकतो. येथील विभागलेल्या डाव्या शक्तीचा बिमोड करण्यात ही उजवी शक्ती यशस्वी झाल्यास राष्ट्रीय चळवळीतून (आणि मानवतावादी वैचारिक मंथनातून) जी एक समाजवादाभिमुख, जनतानिष्ठ आणि प्रगतिशील विचारसरणी आपल्याला लाभली तिला प्रचंड धक्का बसेल आणि भारताचे भवितव्य अनेक दशकांसाठी काळेकुट्ट होईल.

हा धोका लक्षात घेऊन जागृतपणे पाऊले टाकता आल्यास भारतातील समाजवादी विचारसरणीचे भवितव्य अजूनही उज्ज्वल आहे. तिची शक्ती प्रचंड आहे. भारतीय जनामनाची तिने तत्त्वतः पकड घेतली आहे. तिच्यात काही नवप्रयोगाची क्षमताही आहे.

### ७) संयुक्त शक्तीचे केंद्र व पक्षविसर्जन

भारतीय स्वातंत्र्याचा लढा ही मानवाच्या स्वातंत्र्य-संग्रामातील एक प्रचंड घटना होती. जागतिक साम्राज्यशाहीच्या अंताची ती सुरुवात होती. या स्वातंत्र्यलढ्यातून साकार झालेली समाजवादी व लोकशाहीनिष्ठ विचारसरणीची घडण हीसुद्धा अत्यंत सामर्थ्यशाली आहे. ती निरनिराळ्या समाजवादी विचारातील चांगल्या गोष्टींचा समन्वय साधून एक नवा समाजवादी आदर्श प्रस्थापित करू शकते.

आपल्या देशात समाजवादी विचारवंतांचे अनेक विभाग वैचारिकदृष्ट्या थोड्याफार फरकाने कार्यक्षम आहेत. त्यांची संयुक्तपणे जी शक्ती तयार होते ती या देशात डोके वर काढू लागलेल्या उजव्या प्रतिगामी शक्तीला सहज शह देऊ शकते. येथील उजव्या प्रतिगामी शक्तीतील जनसंघासारख्या फॅसिस्ट शक्तीचा धोका टाळण्यासाठी केवळ समाजवादी संयुक्त आघाडीची विकेंद्रित सत्ता हाच एकमेव मार्ग आहे.

समाजवादी शक्तींच्या एकजुटीत मुख्यतः आड येणारा मुद्दा म्हणजे साम्यवादी पक्षासंबंधीचा. या देशातील समाजवादी शक्तींपैकी जवळजवळ अर्धी समाजवादी शक्ती साम्यवादी पक्षाभोवती केंद्रित झालेली आहे. अर्धी अथवा त्यापेक्षा थोडी जास्तच शक्ती संयुक्त समाजवादी व इतर लहानमोठे समाजवादी



अनुक्रमणिका

पक्ष यांच्याभोवती गोळा झालेली आहे. लोकशाहीतील समाजवादी व कम्युनिस्ट समाजवादी प्रवाह आणि पक्ष एकवटल्यास, आणि ते आपल्या राष्ट्रीय चळवळीच्या पुरोगामी परंपरेशी सांगड घालू शकल्यास ते एक नवा इतिहास घडवू शकतात आणि भारताच्या भवितव्याचे नवे शिल्प साकार करू शकतात. देशाचे औद्योगीकरण, पिळवणूकशून्य अर्थरचना,- विज्ञाननिष्ठ समाज व संस्कृती यांची घडण, व्यक्तिस्वातंत्र्याला व लोकशाही जीवनमूल्यांना पूरक ठरणारी समाज सुव्यवस्था, शुद्धाचारी समाजजीवन, विकेंद्रित समाजरचना इत्यादि निर्मितिक्षम कार्यक्रमावर आधारलेली एक संयुक्त समाजवादी आघाडी आपल्या देशाचे संपूर्ण चित्रच बदलून टाकू शकते. भारतात समाजवादी विचारांचे संश्लेषण घडण्याची सुवर्णसंधी आहे.

पण साम्यवाद्यांशी लोकशाही व समाजवाद यावर एकाच वेळी निष्ठा ठेवणारे यांनी एकता साधावी काय हाच मुख्य प्रश्न आहे, त्याशिवाय या देशात सध्यातरी दुसरा पर्याय नाही, असे प्रस्तुत लेखकाचे मत आहे. त्याची प्रमुख कारणे अशी आहेत-

१) ही एकता प्रस्थापित न झाल्यास या देशात एकतर केवळ फॅसिझम नाहीतर केवळ साम्यवाद प्रस्थापित होण्याची शक्यता आहे. केवळ फॅसिझम प्रस्थापित होणे ही महाभयंकर गोष्ट आहे, यात शंकाच नाही. पण केवळ साम्यवादाच्या हाती सत्ता जाणे म्हणजेही मोठे नुकसान आहे. साम्यवादाने भांडवलशाहीची चौकट मोडून समाजवाद आणला तरीही केवळ साम्यवादी पक्ष संसदीय लोकशाही व व्यक्तिस्वातंत्र्य या श्रेष्ठ जीवनमूल्यांना नष्ट करतील अथवा विकृत एकांगी स्वरूप देतील, निदान तसा संभव तरी राहील. कारण जागतिक साम्यवादाने अजून पक्षीय हुकुमशाहीच्या कल्पनेचा त्याग केलेला दिसत नाही. केवळ साम्यवाद्यांच्या हाती संपूर्ण सत्तांतर होणे टाळण्यासाठी तुल्यबल समाजवादी शक्तींच्या संयुक्त आघाडीची गरज आहे.

२) आज काही वर्षांत जागतिक प्रमाणावर ज्या घटना घडल्या अथवा घडत आहेत त्यांचा परिणाम म्हणून जगात इतरत्र तसाच भारतीय साम्यवाद्यातही आजवरच्या त्यांच्या पक्षीय हुकुमशाहीच्या सिद्धांताला अनुकूल नसलेला उदारमतवादी प्रवाह वाढत आहे. हा प्रवाह समाजवादी एकीकरणात आणखी वाढू शकतो. साम्यवाद्यांची शंभर टक्के विज्ञाननिष्ठा, समाजवादावरील लढाऊ श्रद्धा आणि सुसंघटना या गोष्टी लक्षात घेता या देशात शुद्ध समाजवादाची स्थापना करणे साम्यवादी शक्तीला वगळून जवळजवळ अशक्य आहे. समाजवादाला साम्यवाद लोकशाहीकडे व उदारमतवादाकडे वळविता आल्यास तो त्याचा विजय आहे.

३) साम्यवादी व समाजवादी यांच्या एकतेत समाजवादी शक्ती अर्ध्या प्रमाणात अथवा अर्ध्यापेक्षाही अधिक प्रमाणात सामर्थ्य दाखवू शकल्या तर साम्यवादाला समाजवादी प्रवाहावर आक्रमण करून गिळंकृत करणे शक्य होणार नाही. उलट अशा संयुक्त समाजवादी आघाडीचे नेतृत्त्व समाजवाद्यांना आपल्या हातात ठेवता येणे शक्य आहे व आवश्यकही आहे. आपल्या शक्तीमुळे ते साम्यवादाला लोकशाही मूल्यांकडे ओढून आणू शकतील. कारण आज लोकशाही समाजवादाला तत्त्वतः जगभर प्रतिष्ठा प्राप्त झाली असून तो एक आदर्श जीवनमार्ग म्हणून विचारवंतांच्या मनाची पकड फार वेगाने घेत आहे. म्हणून अस्सल समाजवादाला साम्यवादाची भीती बाळगण्याचे आज कारण उरले नाही.

४) वेगवेगळ्या समाजवादी विचारप्रवाहाच्या एकतेतून जे समाजवादी केंद्र निर्माण होईल ते एकपक्षीय वर्चस्वापासून भिन्न राहील. दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे असल्या संयुक्त केंद्रात पक्षवर्चस्व मर्यादित झाल्यामुळे पक्षीय सर्वंकष सत्तेचा धोका टळेल. संयुक्त संघटनेतील पक्षाचे स्वरूप परिणामतः विचारप्रवाह म्हणूनच राहील. व्यवहारात पक्षपणाच नष्ट होईल.

५) याची पुढील अवस्था पक्षविसर्जनाचा क्रम साधण्याची राहील. समाजवादी समाजरचनेच्या प्रस्थापनेनंतर, एक प्रमुख उद्दिष्ट संपल्यावर, या पक्षांना आत्मविसर्जनाचा मार्ग पत्करावा लागेल. विचारवंतांनी जनमनाची त्यादृष्टीने तोवर तयारी केली पाहिजे. अपक्षीय लोकशाहीची स्थापना, अनेक पक्षीय संयुक्त सत्तेतून (जनआंदोलनाला वैज्ञानिक व व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचाराची जोड लाभल्यास) पुढील क्रमात होण्याची शक्यता आहे, एवढेच एक विचारसूत्र येथे मांडले जाऊ शकते. यावर आणखी विचार व्हायला पाहिजे. सध्या एवढेच सांगता येईल, की भारतीय समाजवादी विचारप्रवाहांचे भवितव्य आज या विचारसरणीतील भिन्न प्रवाहांना व त्या प्रवाहातील भिन्नभिन्न चांगल्या गुणवैशिष्ट्यांना एकत्र आणण्याच्या प्रक्रियेत घडणार आहे. समाजवादाच्या विविध प्रवाहांनी एकत्र येण्याची ऐतिहासिक गरज भारतीय परिसरानेच आज निर्माण केली आहे. संसदीय लोकशाहीच्या माध्यमातून समाजवादी विकेंद्रित लोकशाहीच्या स्थापनेसाठी काळाचे हे आव्हान आपण स्वीकारले पाहिजे.



अनुक्रमणिका

# भारताच्या आर्थिक समस्या व लोकशाहीचा विकास

प्रा. देवदत्त दाभोलकर

(नवभारत ऑगस्ट-सप्टेंबर १९५२)

आज अखिल आशियाचा आर्थिक प्रश्न हाच भारताचाही आर्थिक प्रश्न आहे. 'भाकरीचा प्रश्न' हा तो प्रश्न होय. वाढत्या लोकसंख्येचे प्रमाण गृहीत धरून जनतेला सुखसोयींचे किमान आवश्यक जीवनमान कसे उपलब्ध करून द्यावे, असे या प्रश्नाचे स्वरूप अधिक विशद करता येईल. हा प्रश्न सोडविला गेलाच पाहिजे असा आशियातील जनतेचा आग्रह आहे. तो लोकशाही मार्गांनेच सोडविला जावा असा आशियांतील भारताशिवाय इतर राष्ट्रांचा कटाक्ष नाही. कोणत्याही मार्गाने तो सुटला की त्यांना पुरेसे आहे. साम्यवादी हुकुमशाहीच्या मार्गाने तो सोडविण्याच्या मार्गालाही नवचीनसारखी राष्ट्रं लागलेली आहेत. आज आशियाखंडात लोकशाहीविषयी काहीसे अगत्य हे एका भारतालाच वाटत आहे. हे अगत्य कसे वाढवता येईल याचा विचार करताना, या अगत्याचे मूलस्वरूप नीट समजावून घेणे आवश्यक आहे.

लोकशाही हा शब्द अनेकदा अनेक अर्थांनी वापरण्यात येतो. विचार, आचार, उच्चार, संघटन यांचे स्वातंत्र्य, व्यक्ति-विकासाला पोषक होईल असे व्यक्तिस्वातंत्र्याचे मनमोकळे वातावरण व सार्वत्रिक सहिष्णुता यांचा समावेश लोकशाहीच्या कल्पनेत अपरिहार्यपणे आवश्यक असला पाहिजे असे मला वाटते. असे वातावरण जेथे नसेल तेथे लोकशाहीचे अस्तित्व शोधताना केवळ सोयीस्कर अशीच लोकशाहीची व्याख्या करावी लागेल! आजच्या हुकुमशाहीला उद्याच्या संभाव्य लोकशाहीचा दिलासा द्यावा लागेल! 'लोकांची लोकशाही' (People's Democracy) या द्विरुक्त नामाभिधानाने सजणाऱ्या राष्ट्रात आज लोकशाही अस्तित्वात नाही, असेच यामुळे आपल्याला समजले पाहिजे.

## ब्रिटिश अधिराज्याचा परिणाम

आपल्याला अभिप्रेत असलेल्या लोकशाहीत व्यक्ति-स्वातंत्र्याच्या मोकळ्या वातावरणाला आद्य महत्वाचे स्थान आहे. थोडक्यात म्हणजे ब्रिटिश लोकशाहीचा आदर्श आपल्या नजरेसमोर असतो, असे आपल्याला सांगता येईल. लोकशाही विकासक्रमाचा अखेरचा टप्पा ब्रिटिश लोकशाहीनेही आजच गाठलेला आहे असे नाही. परंतु आजवरची तिची प्रगती हीही आदर्श व विलोभनीय आहे यात शंका नाही. अशा लोकशाहीविषयी भारताला वाटणारे अगत्य हे पूर्वीपासून भारतीय जीवनातच स्वाभाविकपणे मुरलेले आहे असे मात्र म्हणता येणार नाही. प्राचीन भारतातील गणराज्यांचे स्वरूप हा संशोधनाचा विषय आहे. अलीकडच्या काळातील ग्रामपंचायती या देखील आपला कोणताही लोकशाही वारसा मागे न ठेवता आज नामशेष झालेल्या आहेत. भारतातील आजची लोकशाहीच्या कल्पनांची वाढ ब्रिटिश अधिराज्याचा परिणाम आहे. जर्मनीसारखे इतर कोणतेही राष्ट्र आपल्यावर राज्य करीत असते, तर लोकशाही कल्पनांचा प्रसार आपल्या देशात झाला नसता. किंबहुना भारत देश सदैव स्वतंत्र राहता तरीही लोकशाही कल्पनांचा विकास आपल्यात किती झाला असता, याविषयीही शंकाच आहे. किंबहुना झाला नसता असे मानले तर तेच ऐतिहासिक वस्तुस्थितीला अधिक धरून होईल. भारतात लोकशाहीची वाढ पुढील तीन गोष्टींमुळे झाली.

१) ब्रिटिश शिक्षणपद्धतीतून शिक्षण घेतलेल्या व इंग्लिश विद्यापीठांतून विद्यार्जन केलेल्या मध्यमवर्गाला व पुढारी वर्गाला लोकशाही कल्पनांची ओळख झाली व लोकशाही पद्धतीविषयी आस्था वाटू लागली. २) भारतात ब्रिटिशांचा संबंध आल्यापासून तो शेवटी अधिकारसंक्रमण होईपर्यंत ब्रिटिश पद्धतीच्याच राज्यसंस्था ब्रिटिश लोकांनी साहजिकपणेच अस्तित्वात आणल्या. ३) ब्रिटिश राज्यसत्तेविरुद्ध भांडवलदार व जनता यांनी मिळून जो लढा दिला तो जनतेला लोकशाही सामर्थ्याची जाणीव उत्पन्न करून देण्यास उपयोगी ठरला.

आज परकीयांनी घातलेल्या या पायावर आपली लोकशाही उभी आहे. पंडित जवाहरलाल नेहरू यांची वैयक्तिक प्रकृति खानदानी असहिष्णु उमरावाची असली, तरी त्यांची प्रज्ञावंत निष्ठा लोकशाहीला वाहिलेली आहे. हा भारतीय लोकशाहीचा आजचा मोठा आधार आहे. लोकशाहीविषयी जिव्हाळा वाटणारे अनेक मध्यमवर्गीय लोकही आज देशात आहेत. परंतु सर्वसामान्य जनतेत आज लोकशाही वृत्तीने जीव धरलेला आहे, असे म्हणता येणार नाही. भाकरीचा प्रश्न अन्य

मार्गाने सुटू शकतच नाही असे वाटल्यास जनता साम्यवादी हुकुमशाहीकडे वळणार नाही, अशी ग्वाही आज कोणीही देऊ शकणार नाही. लोकशाहीविषयी ज्यांना ज्यांना म्हणून आस्था वाटते त्यांनी त्यांनी जनतेच्या जीवनमानाचा प्रश्न सोडविण्याची कसोशी केली पाहिजे. ज्या अवधीत आपल्याला हे कार्य पुरे करावयाचे आहे तो अवधीही थोडा आहे. तिसरे महायुद्ध झाले, तर सर्वच आटोपले! त्या झंझावातात भारतीय लोकशाही तग धरू शकेल असे आज तरी तिच्याठिकाणी सामर्थ्य दिसत नाही. परंतु युद्ध झाले नाही तरीही आपले आर्थिक प्रश्न लोकशाही मार्गाने आपण पुढील दहा-वीस वर्षांत सोडवू शकलो तरच काही आशा आहे.

**वाढते जीवनमान कसे टिकेल ?**

आपले जीवनमान उत्तरोत्तर निश्चितपणे वाढत आहे असा प्रत्यय प्रत्येक सामान्य मनुष्याला आला, तर लोकशाही प्रयोगाला त्याचा विरोध राहणार नाही. हळू हळू लोकशाही मूल्यांविषयी त्याला आस्थाही वाटू लागेल. परंतु हे करावयाचे असल्यास काही गोष्टी निश्चितपणे मान्य करूनच पुढील धोरण आखले पाहिजे. त्या गोष्टी अशा :

१) ज्या पुढील वीस वर्षांच्या काळात आपल्याला ही आर्थिक प्रगती साधावयाची आहे, त्या अवधीत आपल्या लोकसंख्येच्या वाढीचे प्रमाण आज आहे तेच राहील. कदाचित जननसंख्येचे प्रमाण तेच राहून मृत्यूचे प्रमाण कमी झाल्यामुळे वाढीचे प्रमाण अधिकही होण्याचा संभव आहे. एक किमान जीवनमान जनतेला उपलब्ध करून दिले व ते खाली जाता कामा नये असे प्रत्येकाला आग्रहपूर्वक वाटू लागले की, संततिनियमनाचा स्वाभाविकपणेच प्रसार होऊन जननसंख्या खाली जाऊ लागेल. परंतु ही गोष्ट पुढील वीस-एक वर्षांत घडून येईल अशी यत्किंचितही आशा नाही.

२) वाढत्या लोकसंख्येला तोंड देऊन जीवनमान चढते ठेवावयाचे असल्यास शक्य त्या सर्व मार्गांनी राष्ट्राचे उत्पन्न झपाट्याने वाढविले पाहिजे. हे मार्ग लोकशाहीला मारक असता कामा नयेत ही गोष्ट उघड आहे. परंतु केवळ तात्त्विक विचारांनी काही मार्ग लोकशाहीला विरोधी होतील म्हणून ते मागे न घेता, आधुनिक अर्थयंत्रणा लोकशाही मार्गाने पुरेपूर कशी राबविता येईल याविषयी आपण प्रयोगशील राहिले पाहिजे. उत्पादनवाढीआड लोकशाही येणार असेल तर लोक तिला बाजूला सारून टाकल्याखेरीज राहणार नाहीत, हे आपण आज आशियाखंडात एक सिद्ध प्रमेय म्हणून मानावयास हरकत नाही. भारतही या गोष्टीला अपवाद होण्याचा संभव नाही. आधुनिक अर्थयंत्रणा व लोकशाही यांचा समन्वय आपण कितपत घालू शकतो यावरच भारतीय लोकशाहीचे बरेचसे भवितव्य अवलंबून आहे.

३) उत्पादनवाढीच्या प्रयत्नांत जनतेतील कोणत्याही मोठ्या समूहावर संपूर्ण बेकारीचा वा त्याचे जीवनमान खाली जाण्याचा प्रसंग येणार नाही अशी दक्षता घेणे आवश्यक आहे. अशी आर्थिक हलाखी निर्माण झाली की, लोकशाहीला विरोध आलाच. म्हणून यंत्रोत्पादन करीत असताना पूर्वीच्या मजुरांवर व लहान उद्योगधंद्यावर त्याचा होणारा परिणाम कसोशीने अभ्यासावा लागेल. यासाठीही कोणतेही तात्त्विक सिद्धांत मांडण्याऐवजी प्रत्येक प्रश्नाचा स्वतंत्रपणे सर्वांगांनी विचार करणे हाच एक व्यावहारिक उपायआहे.

४) हुकुमशाही योजना असो की लोकशाही योजना असो, जनतेत योजनेविषयी पुरेसा उत्साह निर्माण करता आला तरच ती पार पाडता येते. लोकशाहीत तर अशा उत्साहावरच अधिक भर द्यावा लागतो. हा उत्साह कसा निर्माण करावा हा अर्थशास्त्राच्या कक्षेबाहेरील प्रश्न आहे. परंतु तो सोडविल्याखेरीज आपली काहीच प्रगती होणार नाही हे निश्चित. आज असा उत्साह कोठेही दिसत नाही, हेही तितकेच खरे आहे. परंतु जी जनता १९३०-३२ व ४२ साली सहजपणे उत्साहाने प्रेरित होऊ शकली, ती आज योग्य नेतृत्व मिळाल्यास पुन्हा उत्साहाने कार्यास लागणार नाही असे म्हणवत नाही.

**द्रव्यसाहाय्याबरोबर वर्चस्वही येईल का ?**

या आर्थिक अभ्युदयाच्या प्रयत्नात अंतर्गत प्रयत्नांना व अंतर्गत परिवर्तनाला जसे स्थान आहे, तसेच परकीय मदतीलाही आहे. ही मदत पुरेशा प्रमाणात मिळाली तर आपले कार्य पुष्कळच सुकर होईल. ही मदत देण्यासारख्या परिस्थितीत आज अमेरिका व रशिया ही दोनच राष्ट्रे आहेत. ब्रिटिश लोकशाही पद्धतीविषयी अगत्य वाटणाऱ्या राष्ट्राला या दोघांपैकी कोणाकडून मदत स्वीकारावी या विषयी संदेह पडण्याचे कारण नाही. म्हणून अमेरिकेच्या या संभाव्य मदतीविषयीही थोडेसे अधिक विवेचन या ठिकाणी करणे युक्त होईल.

दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेची उत्पादनशक्ती प्रचंड प्रमाणात वाढली. युद्धपूर्वकालाशी तुलना करता ही उत्पादनशक्ती जवळ जवळ दुपटीने वाढली, असे म्हणावयास हरकत नाही. या काळात जगाला आर्थिक मदतीची गरज होती व आर्थिक मदत करावयाची शक्तीही अमेरिकेजवळ होती. अब्जावधि









डॉलर्स अशा रीतीने अमेरिकेने युरोपखंडात ओतले. युरोपला दिलेल्या या मदतीमागे राजकीय सूत्रे होती व आजही अमेरिका मदत देताना, रशियाला विरोध करण्यास त्या त्या राष्ट्रांचा किती उपयोग होईल याचा अंदाज बांधूनच मदत देत असते. यामुळे अमेरिकेच्या भांडवली मदतीला राजकीय अर्थ निश्चितपणे असतो. परंतु राजकीय दृष्टीने भारताने दोन गोष्टी स्पष्टपणे ओळखावयास पाहिजेत. पहिली अशी की, आजच्या परिस्थितीत आपल्याला अभिप्रेत असलेल्या लोकशाहीविषयी आग्रह धरणे म्हणजे जागतिक महायुद्धाच्या काळात रशियाविरोधी धोरण स्वीकारावे लागणे हे समीकरण अपरिहार्यच आहे. अर्थात तोपर्यंत जागतिक युद्ध होऊ नये म्हणून अल्पशक्तीप्रमाणे झटावे व शक्य तितके न्याय्य व तटस्थ धोरण राखण्याचा प्रयत्न करावा. दुसरी गोष्ट अशी की, आशिया खंडात आज अमेरिकेला त्यातल्या त्यात भारताचाच आधार व धीर वाटत आहे. भारतावर गैरवाजवी राजकीय दडपण आणून भारतीय जनतेला विरोधी बनविण्याची आजच्या जागतिक परिस्थितीत अमेरिकेला हिंमत होणार नाही. त्यामुळे राजकीय वर्चस्वाची भीती आपल्याला बाळगावयास नको.

हे जसे राजकीय वर्चस्वाविषयी झाले, तसेच आर्थिक वर्चस्वाविषयीही म्हणता येईल. आंतरराष्ट्रीय भांडवल गुंतवणुकीच्या पाठीमागे असणाऱ्या आर्थिक साम्राज्यशाहीचे स्वरूपही युद्धकालानंतर पार बदलले आहे. आज युद्धानंतरही परदेशात असे मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतवून असलेले राष्ट्र म्हणजे अमेरिकाच होय. जर्मनी, जपान, इटली यांच्या आर्थिक सामर्थ्याचा युद्धकालात अंत झाला. इंग्लडलाही युद्धकालात भांडवलाची बरीच पदरमोड करावी लागली. आज यापुढेही इतरत्र मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतवू शकेल असे राष्ट्रही अमेरिका हेच आहे. परंतु आपल्या एकूण अंतर्गत संपत्तीच्या व उत्पन्नाच्या मानाने अमेरिकेला या भांडवलाची विशेष खिजगणती नाही. खाजगी भांडवलदारांना अमेरिकेतच भरपूर प्रमाणात नफा मिळत आहे. धोका पत्करून बाहेर भांडवल गुंतविण्यास ते उत्सुक नाहीत. आज अप्रगत राष्ट्रांना अमेरिकेचे सरकार किंवा अमेरिकेच्या आधारावर चाललेल्या आंतरराष्ट्रीय बँकेसारख्या संस्था यांनीच काही भांडवली मदत केली तरच ती शक्य आहे. या गुंतवणुकीमागे आर्थिक वर्चस्वाची प्रेरणा व खाजगी नफ्याची इच्छा असण्याचे कारण नाही. राजकीय भूमिकेचे विवरण वर आपण केलेच आहे. या बदललेल्या परिस्थितीत युद्धपूर्वकालीन ग्रह कायम ठेवूनच आपण अद्याप परकीय भांडवलाकडे पाहत आहोत. राजकीय व आर्थिक क्षेत्रातही दुसऱ्या महायुद्धामुळे घडून आलेल्या प्रचंड घडामोडींचे यथार्थ आकलन अमेरिका व इतर राष्ट्रे या उभयतांना जितके अधिक लवकर होईल तितके लोकशाही राष्ट्रांचे परस्परसहकार्य लवकर वाढीला लागेल.

अमेरिकेची आर्थिक शक्ती अमाप असली तरी भारताची आर्थिक गरज त्याहूनही अमाप आहे. ही सर्व गरज अमेरिकेकडून भागणार नाही व भागली तरी ते इष्टही पण नव्हे. लोकांत कार्यकारी उत्साह व स्वयंप्रेरणा जर निर्माण झाली नाहीत तर आर्थिक समृद्धी होऊनही लोकशाहीच्या दृष्टीने ती विफल आहे. ही मदत आटली की आर्थिक समृद्धीही ओसरल्याखेरीज राहणार नाही. आज भारतातील खेडेगावातून सरकारी व शहरी मदतीच्या बाबतीत हाच अनुभव येत आहे. दान स्वीकारण्यालाही एक प्रकारची पात्रता अंगी यावी लागते. मदतीचा पुरेपुर फायदा घेता येईल यासाठी आपली भूमिका तयार करण्याचे आपले कर्तव्य आपण केले पाहिजे.

अमेरिकेच्या आधारावर चालणाऱ्या या विकासक्रमात एक मोठा धोका मात्र सदैव राहील. किंबहुना अमेरिकेची भांडवली मदत घेतली नाही, तरी या धोक्यापासून आपल्याला अलिप्त राहता येणार नाही. तो धोका म्हणजे आर्थिक मंदीचा. या मंदीविषयी अचूक भविष्य वर्तविण्याचे शास्त्र अद्याप अर्थशास्त्राने बसविलेले नाही. अमेरिकेत आर्थिक मंदी आली की, तिचे परिणाम अमेरिकेशी आर्थिक संबंध असणाऱ्या सर्व राष्ट्रांवर हे होणारच. भारताचे व्यापारी संबंध अमेरिकेशी आहेतच व अमेरिकेशी संबंध असणाऱ्या इतर अनेक राष्ट्रांशीही आहेत. यामुळे मंदीचा आघात अनिवार्यपणे आपल्यापर्यंत येऊन पोहोचल्याशिवाय राहणार नाही. आजकाल मंदी हे हुकुमशाहीला आवाहन आहे. परंतु याही बाबतीत आशावादी (किंवा केवळ दैववादि म्हणावे हवे तर) राहण्यापलीकडे आपल्या हाती अन्य काहीही नाही.

**क्रांतिकारक क्रियाशीलतेची आवश्यकता**

आर्थिक अभ्युदयाच्या अंतर्गत प्रयत्नाविषयी विचार करता, शेती व उद्योगधंदे हे दोन ठळक विभाग नजरेसमोर येतात. शेतीतील उत्पादनवाढीसाठी शेतजमिनीच्या हक्कासंबंधी व वाटणीसंबंधी जे परिवर्तन आवश्यक होते ते भारतात हळूहळू पूर्ण होत आहे. हे परिवर्तन लोकशाही मार्गाने व शांततेने आपण पूर्ण करीत आहो ही उत्साहजनक गोष्ट आहे. परंतु भांडवलशाहीच्या विकासकालात सरंजामशाही अधिकाधिक कमकुवत होत चाललेली असते. राष्ट्राच्या उत्पादनांत हे सरंजामदार भर घालीत नसतात व उत्पादन थांबविण्याचीही त्यांना शक्ती नसते. अगदी







अनुक्रमणिका

जिवावरच बेतले. (रशियन क्रांतीत अशरक्षः हेच घडले) किंवा उपजीविकेचा कोणताहि आधारच उरू दिला नाही, तरच हा वर्ग प्रतिक्रांतिकारक होऊन प्रत्यक्ष विरोधाला उद्युक्त होण्याचा संभव असतो. या लोकांना जमिनीच्या किंमती देऊन त्यांच्याकडून त्यांच्या जमिनी काढून घेण्यात लोकशाहीचे काही विशेष सामर्थ्य प्रकट झाले आहे असे म्हणता येणार नाही. ही पुनर्रचना याही पुढे नेऊन शेतीचे उत्पादन वाढविणे व शेतकरी अधिक सुखी करणे यातच लोकशाहीची खरी कसोटी आहे. शेतीच्या उत्पादनाच्या दृष्टीने सहकारी शेतीचे प्रयोग आवश्यक आहेत. या प्रयत्नांतून उत्पादन तर वाढेलच, परंतु लोकशाहीची चिरेबंद बांधणीही होऊ शकेल. सहकारातूनच खरी लोकशाही वृत्ती लोकांच्या मनात रुजेल, वाढेल. यासाठी वरपासून खालपर्यंत चालू असलेल्या सर्व यंत्रणेत फरक व्हावयास पाहिजे. आज अधिकाऱ्यात उत्साह नाही, शेतकऱ्यांना विश्वास वाटत नाही व बहुतेक योजना केवळ कागदोपत्रीच यशस्वी होतात. आणि या सर्व गोष्टी आपण इतक्या गृहीत धरून चालावयास शिकलो आहोत की 'यदल्यमपि तद् बहु' म्हणून आत्मसंतोष व आत्मगौरव करण्याची आपली वृत्ति वाढत आहे. कागदोपत्री ज्या आर्थिक साहाय्याचे आकडे दिसतात त्यातील बहुतेक मुख्य फायदा गावोगावच्या प्रमुख मंडळींनीच मिळविलेला असतो. सरकारी योजना आपल्यापर्यंत येऊन पोहोचत नाहीत व पोहोचल्या तर हितकारक होण्यापेक्षा अनेकदा त्या जाचकच होतात, अशी भावना शेतकऱ्यांमध्ये वाढीस लागणे इष्ट नव्हे. शेतीसुधारणेच्या सरकारी योजनांचा इतिहास डोळसपणे पाहणाऱ्या लोकांच्या दृष्टोत्पत्तीला अशा अनेक गोष्टी येतील. राज्ययंत्राच्या जुन्या चाकांना विकासक्रमाचा आपल्याला अभिप्रेत असणारा वेग कितपत मानवेल ही शंकाच आहे. परंतु अशा वेळी तत्परतेने यंत्रात योग्य तो बदल करण्याची जबाबदारी लोकशाहीने ओळखली पाहिजे. क्रांतिकारक क्रियाशीलता आपण दाखविली नाही तर विविध सरकारी समित्या, जिल्हा सुधारणा मंडळे, सर्वोदय केंद्रे, किंबहुना परकीय मदतीने सुरू होणाऱ्या विभाग विकास योजना (कम्युनिटी प्रॉजेक्ट्स्) यातून शेवटी एका आत्मवंचनेखेरीज दुसरे काही उपलब्ध होणार नाही. पैसा व सामाजिक कार्यकर्ते बाहेरून पुरवले की रस्ते, शाळा, विहिरी, दवाखाने बांधून होतात हे खरे. परंतु असे कार्यही आपण लहान लहान विभागात काम करीत आहोत तोवरच शक्य असते. दुर्दैवाने आज पुरेशी माणसेही नाहीत! खरी क्रांती जनतेला कार्यप्रवण करण्यात आहे. सहकार्य, सततोद्योग व स्वावलंबन या तत्त्वांवर खेडूत जनतेला आपणाला जागृत करता आले तर, आर्थिक विकास व लोकशाही वृत्तीची वाढ या दोन्ही गोष्टी साधू शकतील. ही दृष्टी व त्याला आवश्यक तो उरक असणारे नेतृत्त्व आज भारतात दिसत नाही असेच म्हणणे भाग आहे.

**नदी नियंत्रण योजना**

निरनिराळ्या नदीनियंत्रणाच्या योजना याही शेती व लोकशाही या दोहोंनाही उपकारक ठरण्यासारख्या आहेत. या योजनांनी पूर थांबतील, आवर्षणाची भीती वाचेल, वाहतुकीचे जलमार्ग खुले होतील व वीजपुरवठा मुबलक प्रमाणात खेळू शकेल. अशा योजना जनतेच्या प्रत्यक्ष दृष्टीसमोर हिरीरीने पुऱ्या केल्या गेल्या तर ही गोष्टही तिला चेतना देण्यास पुरेशी आहे. नीटपणे या योजना राबविल्या तर आर्थिक दृष्टीने अंती त्या स्वयंपूर्णही ठरतील. अशा योजनांनी लोकशाहीला कोणताही धक्का पोहोचत नाही. उलट तिला बळकटीच आणता येते, असा अमेरिकन 'टी.व्ही.ए.' या नदी-नियंत्रण-योजनेचा अनुभव आहे. केंद्रीकरण व लोकशाही यांचा अपरिहार्यपणे विरोधच आहे असे मानणाऱ्यांनी टी.व्ही.ए.च्या उदाहरणाचा विचार करावा. लोकांना उदासीन निष्क्रियतेतून जागे करणे हा टी.व्ही.ए.च्याही कार्याचा एक प्रमुख भाग होता. लोकशाही मार्गानेच टी.व्ही.ए. चालू राहिली पाहिजे असा अमेरिकन सरकारचा आदेश होता. या दोन्हीही गोष्टी टी.व्ही.ए.ने साध्य करून दाखविल्या. मूलभूत निर्णय मध्यवर्ती मंडळ घेत असे. विकासयोजनांचे स्थूल स्वरूप आखीत असे. परंतु प्रत्येक ठिकाणी त्या योजना कोणत्या रीतीने कार्यवाहीत आणाव्यात याची जबाबदारी स्थानिक कार्यकर्त्यांवर व स्थानिक लोकांवर टाकलेली असे. वरून मार्गदर्शन मिळे, परंतु दडपण नसे. 'नियोजनाचे केंद्रीकरण परंतु योजनांचे विकेंद्रीकरण' असे आपल्याला या पद्धतीचे वर्णन करता येईल. नियोजन करतानाही लोकमताला योग्य तो वाव दिला, तर अर्थात् त्यातही लोकशाही आणता येईल.

अशा ज्या नदी-योजना आवश्यक आहेत, त्यामुळे भारतीय लोकशाहीला भिजविणारा आर्थिक प्रश्न सुटावयास मदत होईल. लोकजीवनाशी संबंध असणारा लोकशाहीचा एक महान प्रयोगही लोकांच्या नजरेसमोर प्रत्यक्षात येईल. अशा योजनांसाठी पोट बांधून व कमरा कसून काम करण्यासाठी जनतेला आवाहनही करता येईल. कारण प्रचंड प्रमाणावरील कार्य प्रत्यक्ष डोळ्यांसमोर आपल्या श्रमाने उभे केले जात आहे ह्यात एक अवर्णनीय आनंद असतो. अशावेळी या गोष्टी मागे ठेवून दारूबंदीसारख्या योजनांचा हट्टाग्रह धरणे म्हणजे आजच्या परिस्थितीत कालानुक्रमात कोणत्या गोष्टीला किती महत्त्व दिले पाहिजे हे आपल्याला कळत नाही, असेच दाखविण्यासारखे आहे.

**महायंत्रोत्पादन आणि लहान उद्योगधंदे**

जनतेच्या कोणत्याही विभागावर बेकारीचा प्रसंग न येणे वा त्याचे जीवनमान अधिकच खाली न घटणे हे लोकशाहीच्या स्थिरतेच्या दृष्टीने आवश्यक आहे. हे आपण लेखाच्या सुरुवातीलाच पाहिले आहे. या दृष्टीने भारताच्या अर्थव्यवस्थेत घरगुती व लहानलहान उद्योगधंद्यांना स्थान आहे. मनुष्यबळ अधिक व भांडवल कमी अशी परिस्थिती असल्यामुळेही, उत्पादनवाढीसाठी या उद्योगधंद्यांवर आपल्याला विसंबलेच पाहिजे. परंतु हीच परिस्थिती कायमचा आदर्श म्हणून आपण पुढे ठेवावयास नको. महायंत्रोत्पादन लोकशाहीला अपरिहार्यपणे मारकच होते अशी भूमिका घेण्यात आपण इतिहासाच्या अपुऱ्या साक्षीवर विश्वास ठेवीत असतो. उत्पादन व्यवस्थेत आवश्यक ती फेररचना केली तर लोकशाही नियंत्रणाखालीही महा-यंत्रोत्पादन शक्य व्हावे, किंबहुना अखेर ते तसे झाले तरच लोकशाही टिकू शकेल. अधिक उत्पादनाची साधने व पद्धती हाताशी असताना लोकशाहीला त्या विघातक होतील या भीतीने त्यांना दडपून टाकण्याचा प्रयत्न केल्यास, ती लोकशाहीलाच अंती मारक होतील. लोकशाही व महायंत्रोत्पादन यांचा समन्वय कसा साधावा याविषयीचे प्रयोग करणे हे आपले कर्तव्य आहे. ज्या काळात महात्माजींनी ग्रामोद्योगावर भर दिला, त्या काळात महायंत्रोत्पादनाच्या बाबतीत आपल्या सर्व नाड्या परकीय सत्तेने आखडल्या होत्या. गरीब जनतेला काहीतरी पूरक आर्थिक आधार मिळवून देणे आवश्यक होते. या व्यावहारिक वस्तुस्थितीमुळे गांधीजींचे मार्गदर्शन आर्थिकदृष्ट्या योग्य असेच होते. परंतु त्याचे तात्त्विक वा अध्यात्मिक समर्थन आपण मान्य करता कामा नये. गांधीजींचे समाजाच्या आर्थिक बाजूचे दर्शन हे स्थितिप्रधान होते. आर्थिक विकासक्रम पुरेसा गतिमान होऊन पुरेशी साधने आपल्या हाती येईपर्यंत, आणखी काही काळ गांधीजींची उपाययोजना आपल्याला स्वीकारावीही लागेल. परंतु आपले अंतिम ध्येय तेच आहे असे तत्त्व प्रतिपादन करणे हे हितावह नाही असे मला वाटते. अखेरचे प्राप्तव्य म्हणून विविध महायंत्रोत्पादन, सर्वांच्या समविकासासाठी उत्पादित संपत्तीचे समविभाजन व उत्तरोत्तर वाढती आर्थिक समृद्धी इत्यादि चित्रेच आपण आज जनतेपुढे रंगविली पाहिजेत व कालांतराने ती सत्यत्वात आणण्यासाठी झटले पाहिजे. समविकासाच्या या वर्धिष्णु गतीतच जातिभेद, प्रांतीय वितुष्ट यांची लोकशाहीच्या आड येणारी किल्मिषेही वाहून जातील. परंतु त्यासाठी वर्धिष्णु गतीबरोबर समविकासाविषयीचा आग्रह मात्र कटाक्षाने कायम राखला पाहिजे. नाहीतर हे विरोध कमी होण्याऐवजी वाढीला मात्र लागतील.

**भांडवलशाहीचा नायनाट की नियंत्रण ?**

महायंत्रोत्पादन आज बहुतांशी खाजगी भांडवलदारांच्या हाती आहे. काही भाग प्रत्यक्ष सरकारनेही आपल्या हाती घेतला आहे. खाजगी भांडवलदारांचे शासनसंस्थेशी संबंध कसे राहतील हे परिस्थितीवर व त्या दोघांच्या परस्पर सामर्थ्यावर अवलंबून राहील. जमीनदार, सरंजामदार या वर्गासारखा हा वर्ग शासनसंस्थेला सहजपणे बाजूला टाकता येत नाही. कारण, राष्ट्राच्या उत्पादनव्यवस्थेत हा महत्त्वाचा पुढाकाराचा भाग घेत असतो. प्रौढ मतदान व लोकशाही राज्यशासन असले तरीही अनेक मार्गांनी सत्तेची खरी सूत्रे या वर्गाला आपल्या हाती ठेवता येतात. आपल्या संरक्षणासाठी लोकशाही उलथून टाकून हुकुमशाही स्थापन करण्याचा प्रयत्न करणे किंवा परकीय विरोधी सत्तेशी संगनमत करून आपल्या शासनसंस्थेवर दडपण आणणे अशीही कारस्थाने हा वर्ग करू शकतो. परंतु याउलट, समाजवादी नसणाऱ्या राष्ट्रातील सरकारांनीही या वर्गावर आपल्याला इष्ट असे दडपण ठेवल्याची उदाहरणे आहेत. साम्यवादापेक्षा नाझी परवडले, याच विचाराने जर्मन भांडवलदार त्यांचा पाठपुरावा करीत. हिटलर संपूर्णपणे भांडवलदारांचा गुलाम होता असे विधान करणे वस्तुस्थितीला धरून होणार नाही. राजकारणाच्या पाठीमागे अनेक वेगवेगळे प्रवाह असतात. त्यातील आर्थिक प्रवाह हा सर्वप्रमुख असला, तरी केवळ तोच सर्वनियामक असतो, असे मात्र नव्हे. म्हणूनच भारतीय भांडवलदारांविषयी धोरण ठरविताना व त्यांच्या वर्तनाने लोकशाहीला अपाय होऊ नये असा विचार करताना संभाव्य परिस्थितीचा विचार करावयास हवा. जर्मन भांडवलदारांना जे साम्यवादाचे भय त्यांच्या राष्ट्रापुरते वाटत असे, ते आज जगातील सर्व भांडवलदारांना आपापल्या राष्ट्रांविषयी वाटत आहे. इतर भांडवलशाही राष्ट्रांतील भांडवलदारांकडून आपल्या सरकारच्या विरुद्ध मदत मिळविण्याची अपेक्षा करावी, तर असे राष्ट्र आज एक अमेरिका हेच आहे. अमेरिकेच्या अर्थसत्तेला व राज्यसत्तेला परदेशातील भांडवलदारांना हाती धरण्यापेक्षा परदेशातील राज्यसत्तेचाच पाठिंबा मिळविणे हे कितीतरी अधिक अगत्याचे झाले आहे. ही राज्यसत्ता त्या देशातील अर्थसत्तेची अंकित झाली असेल, परंतु तिने अपरिहार्यपणे तसे अंकित झालेच पाहिजे ही तात्त्विक भूमिका आजवर अनेकांनी मांडलेली असली, तरी व्यवहारात अनेकदा तिचा प्रत्यय येत नाही. लोकशाहीविषयी आस्था वाटणारे देशातील नेतृत्व जर पुरेसे जागरूक असेल तर

अनुक्रमणिका






खाजगी भांडवलशाहीचा अंत केल्याखेरीजही भांडवलदारांवर योग्य ते नियंत्रण ठेवणे शासनसंस्थेला जड जाऊ नये. खाजगी भांडवलशाहीचा तत्काळ अंत करण्याचा विचार करणे, म्हणजे आवश्यक उत्पादनात खीळ घालणे, एक प्रतिक्रांतिकारकांचा वर्ग निर्माण करणे व हिंसक वृत्तीतून हुकुमशाहीला आवाहन करणे एवढेच आज साधू शकेल. आजच्या परिस्थितीत आपल्या अर्थव्यवस्थेत भांडवलदारांचे बरेच महत्त्व आहे हे नाकारता येत नाही. परंतु आपल्या आर्थिक विकासाची गतिमान क्रांतिशीलता विसरून आपण त्यांच्या आजच्या या महत्त्वाचा अकारण बाऊ करून ठेवतो. आजच्या अर्थव्यवस्थेतील भांडवलदाराचे स्थान उद्याच्या अर्थव्यवस्थेत त्यांना राहणार नाही. आपले नियोजन केवळ अंकगणितातील बेरीज-वजाबाकीचे एक साधेसे उदाहरण न राहता, ज्या वेळी त्यातून नवनेतृत्त्वाचे व नवकर्तृत्त्वाचे तेज आढळू लागेल त्याचवेळी ही गोष्ट शक्य होईल. भारताचा आर्थिक विकास ज्यावेळी पूर्ण होईल त्यावेळी आजचा भांडवलशाही विकास हा त्याचा एक लहान अंश असेल. हा पुढील विकास खाजगी भांडवलदारांच्या हाती न राहता सामाजिक नियंत्रणाखाली यावा ही काळजी जर आपण घेतली, तर काही काळाने खाजगी भांडवलशाही हे सामाजिक अर्थरचनेच्या सागराने वेढलेले एक लहानसे बेट होईल. अशा नवरचनेसाठी आवश्यक ते सहाय्य आपण देणार नाही असे सांगण्याची शक्ती भारतीय भांडवलशाहीजवळ नाही. आज भांडवलशाहीच्या आक्रमणामुळे आपली लोकशाही दुबळी आहे असे म्हणण्यापेक्षा आपल्या लोकशाहीच्या दुबळेपणामुळे (आपल्यातील राजकीय कर्तृत्त्वाच्या अभावामुळे) आपली भांडवलशाही समर्थ भासत आहे, असे विधान करणे अधिक युक्त होईल. ज्या राष्ट्रात भांडवलशाही कितीतरी अधिक प्रबल व पूर्ण विकसित होती, त्या राष्ट्रांतील प्रश्नांचे स्वरूप वेगळे होते. आपला प्रश्न त्या दृष्टीने आज कितीतरी अधिक सोपा आहे. परंतु जसजशी आपण कालगत लावू तसतसा तो अधिकाधिक बिकट होत गेल्याशिवाय राहणार नाही. याउलट योग्य त्या मार्गाने आपण आपला आर्थिक विकास केला, तर ज्या निर्वेधपणे आपण आज सरंजामशाही जमीनदारीवर आघात करीत आहोत, त्याच आत्मविश्वासाने लोकशाही मार्गाने खाजगी भांडवलशाहीची अर्थसत्ता देखील आपल्याला ताब्यात घेता येईल.

### केंद्रीकृत नियोजन ; विकेंद्रीकृत योजना

आज आपले पुढील पाच वर्षांचे सरकार ठरलेले आहे. पुढील पाच वर्षात करावयाच्या आर्थिक नियोजनाचा आराखडाही आपल्यापुढे तयार आहे. पुढील विकासाच्या दृष्टीने आजचे सरकारी धोरण वा आजचे नियोजन ही समाधानकारक आहेत असे म्हणता येणार नाही. परंतु व्यावहारिक भूमिकेवरून पाहावयाचे तर या गोष्टी गृहीत धरूनच आज आपण आपले पाऊल धिमेपणाने उचलले पाहिजे. उद्याच्या पावलांची दिशा ठरविली पाहिजे. यापूर्वीच्या काळात न दिसलेल्या अशा दोन आशादायक गोष्टी गेल्या वर्षभरात आढळून येत आहेत. अमेरिकेचे भारताला आर्थिक मदत करण्याचे धोरण अधिक उदार होताना दिसत आहे. तसेच भूदानयज्ञ-चळवळीला आजवर मिळालेले यश उत्साहजनक आहे. अमेरिकेच्या मदतीमुळे लोकशाहीचा आर्थिक पाया मजबूत करावयास मदत होईल, भूदानयज्ञामुळे भूमिहीनांचा प्रश्न सुटावयास मदत होईल. परंतु याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे सहिष्णु क्रांतिवृत्तीनेही कार्य पार पाडता येते अशी लोकजागृती आपल्याला करता येईल. लोकशाहीचा आजचा खरा आधार तोच आहे. नदी-योजना, वीजपुरवठा, वाहतुकीचे मार्ग व साधने, सहकारी शेती, अन्नधान्य-स्वावलंबन, ह्यांचा पाया जरी आपण येत्या पाच वर्षात भक्कम केला तरी पुष्कळच कार्य केले असे होईल. आमच्या नियोजनात या गोष्टी असल्या तरी त्यामागे आवश्यक तो आग्रह, आवेश व प्रेरणा ही नाहीत. नियोजनात केलेल्या आखणीहूनही अधिक प्रमाणात वरील गोष्टींची पूर्ती व्हावयास हवी; परंतु केलेल्या आखणीइतकी तरी ती होऊ शकेल की नाही याची कोणास शंका आली तर तीही अस्थानी नाही. नियोजनाचे क्षेत्र तर आधीच खूप मर्यादित व निराशाजनक आहे. त्यापेक्षाही ही परिस्थिती अधिक निराशाजनक आहे.

यापुढे परकीय भांडवलाचा प्रवाह हा खाजगी मार्गाने फारच कमी येईल. खरा मुख्य प्रवाह अमेरिकेच्या सरकारकडून भारत सरकारकडे येणारा हाच राहणार. भारतात खाजगी भांडवलाला आखून दिलेल्या क्षेत्रासाठी पुरून शिल्लक उरणारे भारतातील भांडवलदारांच्या हातातील भांडवल आपल्या हाती घेण्याची राजकीय व आर्थिक दक्षता भारत सरकारने दाखविली पाहिजे. या परकीय व अंतर्गत भांडवलाच्या बळावर सरकारी नियंत्रणाखाली उद्योगधंदे वाढविणे आवश्यक आहे. नियोजनाचे केंद्रीकरण परंतु योजनांचे विकेंद्रीकरण याचा सूत्रावर ही रचना केली पाहिजे. वेगवेगळ्या उद्योगसंस्था (Industrial Corporations) आपापल्या विभागांविषयी संपूर्णपणे जबाबदार राहतील. उद्योगधंद्यात सहाय्यभूत होणारे कच्च्या मालांचे उत्पादक, मजूर यांच्या लोकशाही संघटनांनाही या संस्थांच्या कारभारात आपले म्हणणे मांडण्याचा हक्क असावा.

अनुक्रमणिका






अशा संस्था कार्यकारी झाल्या तर महायंत्रोत्पादन व लोकशाही वातावरण यांचा मेळ आपल्याला घालता येईल. अनुकूल वातावरण समाजात खेळते असावे म्हणून सहकारी तत्त्वांवर लहान लहान उद्योगधंद्यांची रचना तर करावी लागेलच; परंतु काही मोठे उद्योगधंदेही सहकारी पद्धतीने भांडवल उभारून चालविणे इष्ट होईल. मध्यमवर्गीय लोकांना यामुळे उत्पादनव्यवस्थेत प्रत्यक्ष सहकारी होता येईल. आजही कारखाना-कंपन्यांचे अनेक भागीदार मध्यमवर्गीय असतात. परंतु काही बलिष्ठ भांडवलदार नियंत्रणाची सूत्रे आपल्या हाती ठेवण्याची खबरदारी घेतात असे होण्याला वाव असू नये. बरेचसे भांडवल लहानलहान भागीदारांनी पुरवावे, काही मदत सरकारने करावी, नियंत्रण भागीदारांचे असावे आणि मार्गदर्शन सरकारकडून मिळावे. अशा संस्था यशस्वी करता आल्या, तर जनतेच्या मनातही आपल्या कर्तृत्वाविषयी विश्वास निर्माण होऊ शकेल. खासगी भांडवलाला दिलेल्या क्षेत्राखेरीज इतर सर्व क्षेत्र-सरकारी उद्योगसंस्था, सहकारी उद्योगसंस्था, सहकारी लहान उद्योगधंदे व सहकारी शेती - यांनी व्यापलेले असावे व या सर्वांतून लोकशाहीचा आग्रह प्रभावी झालेला असावा.

वरील सर्व विवेचनात अमेरिकेचे सहाय्य, भांडवलदारांचे स्थान, केंद्रीकरण याविषयी लिहिताना अत्यंत वादग्रस्त विधाने मी केली आहेत याची मला जाणीव आहे. या बाबतीत भावनेचे मतभेद असूं शकतील. विचारांचेही तीव्र मतभेद अनेक ठिकाणी आहेत. परंतु केवळ शुष्क चर्चेतील निष्कर्ष आज भारताला उपयोगी पडण्यासारखे नाहीत. जगावयाचें असेल तर आर्थिक क्षेत्रात प्रयोगशील राहण्याची तयारी भारतीय लोकशाहीने दाखविली पाहिजे. आपला आर्थिक विकास आपल्याला वेगाने अल्पकाळात साधता आला तरच भारतात खरी लोकशाही दृढमूल होण्याची काही आशा आहे. नाहीतर आजच्याच चिंताजनक परिस्थितीत दैवावर हवाला ठेवून निघतील तेवढे दिवस निभावून नेणे एवढेच आपल्या लोकशाहीला शक्य आहे. हे काळाचे आव्हान आहे. ते आपण स्वीकारले पाहिजे असा त्याचा आग्रह नाही. 'तू लोकशाही जगविलीच पाहिजेस' असा भारताला कोणी आदेश दिलेला नाही. लोकशाही तरली वा बुडली, तरी भारताचा प्रवाह अखंड पुढे चालूच राहील. परंतु ती तरलीच पाहिजे अशी जीवननिष्ठा असणारे अनेक लोक आज भारतात आहेत व त्यांनी काळाचे हे आव्हान डोळस आणि निर्भयवृत्तीने स्वीकारले पाहिजे.



### एक दृष्टिकोण

भांडवली लोकशाहीत मिळू शकणारे मर्यादित स्वातंत्र्य उपयोगाचे असते. त्यातून जनसंघटन करता येते. वर्गसंघटन करता येते. जाणिवा वृद्धिंगत करता येतात.

**उपलब्ध असलेल्या मार्गांनी आणि नसेल तर वेगळ्या मार्गांनी शोषणमुक्त समाजाकडे वाटचाल करू शकेल, अशी शासनसंस्था आणल्याखेरीज मार्ग नाही.** मार्क्सवाद, लेनिनवाद ही पोथी नाही. परिस्थितीच्या आकलनाचे आणि विश्लेषणाचे ते शास्त्र आहे. विश्लेपण ज्याचे त्यानेच करायचे आहे. आपले आपण केले पाहिजे, असेच करावे अशी मार्क्सवाद लेनिनवादाची शिकवण आहे.

**लेनिन सांगतो**

'जागतिक इतिहासाचा एकूण विकास सर्वसाधारण नियमांचे पालन करीत असला तरी विकासाच्या विशिष्ट काळात या विकासाच्या स्वरूपात व क्रमात काही खास वैशिष्ट्ये अभिव्यक्त होऊ शकतात ही गोष्ट त्यातून कोणत्याही प्रकारे बाद ठरविण्यात आलेली नाही, उलट ती गृहीत धरण्यात आली आहे.'

'सर्व राष्ट्रे समाजसत्ता वादाप्रत येऊन पोहोचतील ते अगदी अपरिहार्य आहे. पण सर्व राष्ट्रे एकाच प्रकारे ही गोष्ट साध्य करणार नाहीत. लोकशाहीच्या या ना त्या स्वरूपात, 'कामगार वर्गाच्या अधिसत्ते'च्या या ना त्या प्रकारात, स्थित्यंतराच्या निरनिराळ्या गतीत प्रत्येक राष्ट्र स्वतःची काहीतरी भर घालील. ऐतिहासिक भौतिकवादाच्या नावाखाली भावी काळाचा हा पैलू एकसुरी करड्या रंगात रंगवणे यांसारखे सैद्धांतिकदृष्ट्या अधिक प्राथमिक स्वरूपाचे किंवा व्यावहारिकदृष्ट्या अधिक हास्यास्पद दुसरे काही नसेल.'

**'ज्या देशात अधिकच प्रचंड लोकसंख्या आहे आणि अधिक मोठ्या प्रमाणावर सामाजिक परिस्थितीची विविधता आहे, त्या पौर्वात्य देशांती आगामी क्रांत्या रशियन क्रांतीपेक्षा अधिक निराळ्या प्रकारची गुणवैशिष्ट्ये प्रकट करतील** हे आमच्या युरोपियन गावंढळाच्या कधी स्वप्नातही येत नाही...'

**- गोविंद पानसरे**

(साधना १० ऑगस्ट २००२.)

अनुक्रमणिका

# समाजवादाचे मृगजळ व भारत

डॉ. मो. वि. पटवर्धन

(नवभारत - जुलै १९६५)

भारतास स्वातंत्र्य मिळून सतरा वर्षे झाली. तेव्हापासून आमची राजकीय गुलामगिरी जरी संपुष्टात आली असली तरीपण पाश्चिमात्यांची आम्हावरील बौद्धिक गुलामगिरी मात्र संपली आहे असे दिसत नाही. शास्त्रांच्या बाबतीत आज पाश्चिमात्य आमच्या मानाने फारच पुढारलेले असल्याने त्यांचे शास्त्रीय सिद्धांत आम्ही सत्य आहेत असे गृहीत धरल्यास त्यात चूक नाही. पण सामाजिक, धार्मिक, आर्थिक व राजकीय विषयांवरीलही त्यांचे सिद्धांत आम्ही त्यांच्या शास्त्रीय सिद्धांताप्रमाणेच वेदवाक्य समजतो. यावरून बौद्धिक बाबतीत आम्ही त्यांचे अद्यापी गुलामच आहोत हे सिद्ध होते.

जागतिक मतप्रणालीप्रमाणे लोकशाहीची मूलभूत तत्त्वे 'सर्व मानव समान आहेत, प्रजाप्रभुत्व, स्वातंत्र्य, समता व विश्वबंधुत्व ही ठरलेली आहेत. इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स इत्यादी पाश्चिमात्य राष्ट्रे ज्यावेळेस त्यांच्या देशात असलेली राज्यसंस्थाच खरी लोकशाही आहे असे प्रतिपादन करतात त्यावेळेस ती लोकशाही वर दिलेल्या मूलभूत तत्त्वावर आधारलेली असली पाहिजे असे आपण त्यावर स्वतंत्र विचार करून त्यावरील निष्कर्षाप्रमाणे त्या खऱ्याच लोकशाही आहेत किंवा नाही हे न ठरविता, कबूल करतो हे आमच्या बौद्धिक गुलामगिरीचेच द्योतक आहे.

समाजवादाचे बाबतीतही तीच परिस्थिती आहे. समाजवाद, साम्यवाद इत्यादि आर्थिक सामाजिक रचना या मार्क्सच्या तत्त्वज्ञानावर आधारलेल्या आहेत व त्यांची मूलभूत मुख्य तत्त्वे श्रमावर जगणाऱ्याा लोकांचे धनिक मालकांचे पिळवणुकीपासून संरक्षण करणे व समता प्रस्थापित करणे ही आहेत. ही तत्त्वे समाजात प्रत्यक्षात आणावयाची असल्यास मजुरांची सर्वाधिकारशाही (Dictetorship of the Proletariat) स्थापन करून तिच्यातर्फे १) सर्व उत्पादनसाधने राष्ट्राच्या मालकीची करून मजूरांची पिळवणूक थांबवणे २) राष्ट्रातील सर्व संपत्ती व उत्पादन सर्व जनतेत सारखी वाटणी करून राज्यशक्ती व धर्मसंस्था नाहीशी करून आर्थिक, राजकीय व धार्मिक असे कोणतेही विषम वर्ग नसलेला वर्गविरहित समाज (Classless Society) स्थापन करणे हा ध्येयमार्ग मार्क्सने सुचविलेला आहे.

किंबहुना ही ध्येये ज्या समाजाची नाहीत त्यांना आपणास समाजवादी म्हणून घेण्याचा अधिकारही पोहोचणार नाही. रशियातील कम्युनिझम व इंग्लंडमधील सोशियालिझम ही या तत्त्वज्ञानाची दोन विरुद्ध टोके असून रशियात समाजवाद जुलमाने व ताबडतोब प्रस्थापित करण्यात आला. इंग्लंडमध्ये वरील तत्त्वे लोकशाही कायद्याच्या मार्गाने अर्थात सावकाश प्रस्थापित करण्याचा तेथील मजूर पक्षाचा विचार आहे.

भारतातील काँग्रेसपक्ष ज्यावेळेस येथे लोकशाही समाजवाद प्रस्थापित करावयाचा आहे असे प्रतिपादन करतो पण त्याच वेळेस आम्ही येथे खाजगी मालकीसही मान्यता देऊ असे सांगतो त्यावेळेस त्यांनी समाजवादाच्या मूलभूत तत्त्वाचा विचारच केलेला नसावा असे म्हणणे भाग पडते. कारण श्रमिक घटकांची पिळवणूक जर संपूर्णपणे थांबवावयाची असेल तर उत्पादनसाधने खाजगी मालकीची कधीही असू नयेत हा मार्क्सचा मूलभूत सिद्धांत आहे.

ह्या प्रश्नाचा सर्वांगीण विचार करावयाचा झाल्यास पिळवणूक म्हणजे काय हे समजले पाहिजे. पिळवणुकीची कल्पना मार्क्सच्या 'जादा नफ्याच्या सिद्धांतावर' (Theory of surplus value) आधारलेली आहे. हा सिद्धांत थोडक्यात असा मांडता येईल; एखादा मालक ज्यावेळेस कोणत्याही वस्तूचे उत्पादन करतो त्यावेळेस त्याच्याजवळ असलेली संपत्ती तो उत्पादनसाधने, कच्चामाल व मजुरांच्या पगारावर खर्च करतो व ती उत्पादन केलेली वस्तू विकून आपली संपत्ती परत मिळवितो. अशी परत मिळालेली संपत्ती खर्च झालेल्या संपत्तीपेक्षा जास्त असते व या फरकासच नफा म्हणतात.

M (खर्चसंपत्ती) उत्पाद्य वस्तू - M' (परत मिळालेली संपत्ती)

M'(परत मिळा. संपत्ती) - M (खर्च झालेली संपत्ती) = फायदा अगर नफा

यातील उत्पाद्य वस्तूवर खर्च झालेल्या संपत्तीपैकी, उत्पादनसाधने व कच्चा माल यावर खर्च झालेल्या संपत्तीत फारसा फाक पडत नाही म्हणून त्यास स्थिर खर्च (Fixed) व

अनुक्रमणिका

कामगारांच्या मजुरीत मात्र मजुरी कमीजास्त झाल्यामुळे परक पडत असलेने त्यास बदलणारा खर्च (Variable) असे म्हणतात. कामगाराची मजुरी त्याने कारखान्यात केलेल्या दहा अगर बारा तासाच्या कामाकरता असते.

यातील मालकाने प्रथम स्थिर खर्चावर गुंतविलेली संपत्ती मजूर जे कारखान्यात काम करतो त्यातील पाच तासाच्या उत्पादनाच्या विक्रीपासूनच त्याला परत मिळते. मजूर जे राहिलेले पाच तास काम करीत राहतो त्यापासून उत्पादन झालेल्या वस्तूंच्या विक्रीमुळे मालकाला जी जास्त संपत्ती मिळते तोच त्याचा नफा होय. याचा अर्थ असा की मालकाला जो नफा मिळतो तो मजुरांच्या कामामुळेच उत्पन्न होतो व तो नफा मालक मजुरांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन आपल्याकडे ठेवतो व स्वतःच्या चैनीसाठी खर्च करतो. हा मालकाला मिळणारा नफा हीच मजुराची पिळवणूक होय. या नफ्यांच्या एकत्रीकरणानेच संपत्ती तयार होते. आज जगात जी सर्व संपत्ती दिसते ती अशा मजुरांच्या पिळवणुकीमुळेच उत्पन्न झाली. मालकास ही सर्व संपत्ती अन्यायाने आपणाजवळ ठेवता आली याचे कारण म्हणजे उत्पादनसाधने त्याच्या खाजगी मालकीची होती हे होय. ह्या खाजगी मालकीला मजुरापासून संरक्षण मिळावे म्हणून धनिक मालकांनी राज्ययंत्रणा उत्पन्न केली असा मार्क्सवाद्यांचा आरोप आहे. हे सर्व थांबवावयाचे असल्यास व मजुरांची पिळवणूक नाहीशी करावयाची असल्यास सर्व उत्पादनसाधने मजरांच्या मालकीची म्हणजेच राष्ट्राच्या मालकीची झाली पाहिजेत. अशी सर्व उत्पादनसाधने राष्ट्राच्या मालकीची झाली व राज्ययंत्रणा मजूरांच्या हातात आली तरच मजूरांची पिळवणूक थांबेल. थोडीसुद्धा कारखान्याची खासगी मालकी राहिली तर मजुरांच्या पिळवणुकीचा नायनाट होणार नाही. यावरून समाजवाद व खासगी मालकी यांचे सख्य विळ्याभोपळ्या एवढे आहे हे स्पष्ट होते.

तेव्हा कॉंग्रेस पक्षास देशातील मजूरवर्गाची पिळवणूक सर्वस्वी थांबवून समाजवाद प्रस्थापित करावयाचा असेल तर त्यात कारखाने व उत्पादनसाधने यांची खासगी मालकी ठेवता येणार नाही व खासगी मालकी ठेवावयाची असल्यास थोडक्या प्रमाणात का होईना प्रस्थापित समाज समाजवादी होणार नाही. यावरून कॉंग्रेस पक्ष ज्यावेळेस खासगी मालकी असलेली समाजवादी लोकशाही हिंदुस्थानात प्रस्थापित करावयाची आहे अशी घोषणा करतो त्यावेळेस तो समाजवादी तत्त्वज्ञानाचे अज्ञान तरी प्रदर्शित करतो किंवा तो अप्रामाणिक तरी असला पाहिजे असे वाटणे साहजिक आहे. तसेच मजुरांची सर्वाधिकारशाही प्रस्थापित होऊन सर्व उत्पादनसाधने राष्ट्राच्या मालकीची झाली की मजूरांची होणारी पिळवणूक थांबेल हे मार्क्सचे तत्त्वही रशिया चीन इत्यादी कम्युनिस्टिक राज्यपद्धतीकडे पाहता बरोबर नाही हे सिद्ध झालेले आहे. लोकशाहीमध्ये तत्त्वतः प्रत्येक समाजघटक जरी राजा असला तरी प्रत्यक्ष राज्यकारभाराचे सर्व अधिकार काही थोड्या लोकांच्याच हातात राहतात व नंतर या राज्यसंस्थेकडून मजूरांची पिळवणूक सुरू होते व तेथे राष्ट्रीय भांडवलशाही (State Capitalism) सुरू होते. या निवडून आलेल्या अधिकाऱ्यांनी राष्ट्रीय उत्पादन सर्व लोकात समप्रमाणात वाटून दिल्यास कोणाचीही पिळवणूक होणार नाही. पण लोकांचे उत्तन्नात विषमता आल्यास उत्पन्नाचा जास्तीचा भाग हा पिळवणूक या नामाभिधानास पात्र होईल. अशी पगारातील आत्यंतिक विषमता आज रशिया चीन आदी समाजवादी राष्ट्रात प्रचलित आहे. ही राष्ट्रीय पिळवणूक तेथे हल्ली चालू असलेने त्यास राष्ट्रीय भांडवलशाही म्हणणे जरूर आहे. या कम्युनिस्टिक राष्ट्रीय भांडवलशाही, सर्वाधिकारशाही स्वरूपाचा असलेने तेथील मजुरांच्या दृष्टीने राष्ट्रीय भांडवलशाही अत्यंत भयावह होते. लोकशाही भांडवलशाहीत धनिक अगर मजूर यांनी एकमेकांवर अन्याय केल्यास या दोघांना राज्यसंस्थेकडे तक्रार करून न्याय मिळवता येतो. लोकशाही राज्यसंस्था धनिक व मजूर यांचेवर अतिक्रमण करू लागल्यास या दोघांना एकत्रित येऊन राज्यसंस्था बदलता येते पण मजुरांच्या सर्वाधिकारशाहीत (Dictatorship of the proletariate) मालक व राज्यशक्ती एकत्र असलेने मजुरांना त्यांच्यावर झालेल्या अन्यायाचे परिमार्जन करून घेणे अशक्यप्राय असते. अशा समाजव्यवस्थेत मजूर हा परत गुलाम होतो.

आज मजूरांची पिळवणूक व सामाजिक विषमता या दृष्टीने रशिया, चीन, अमेरिका व इंग्लड यातील समाजात काहीही फरक नाही व यानंतरही केव्हा फरक पडेल असे दिसत नाही.

प्रत्येक राष्ट्रात उत्पन्न होणारी संपत्ती तेथे मालक मजूर ही संस्था असेतोपर्यंत मालकाकडून होणाऱ्या मजुरांच्या पिळवणुकीपासूनच उत्पन्न होते असा मार्क्सचा मूलभूत सिद्धांत आहे. आज पाश्चिमात्य राष्ट्रात खाजगी मालकी व रशिया, चीन आदी समाजवादी देशात राष्ट्रीय मालकी (State Capitalism) असलेने तेथे उत्पन्न होणारी सर्व संपत्ती मजुरांच्या पिळवणुकीवरच तयार झालेली आहे असा निष्कर्ष काढण्याशिवाय गत्यंतर नाही. यावरून असे म्हणता येईल की भांडवलशाही अगर समाजवादी लोकशाहीत मजुरांची






पिळवणूक थांबविणे अद्यापी कोणासही शक्य झालेले नाही व पुढे शक्य होईल असे दिसत नाही.

फक्त सर्वोदयवादी तत्त्वज्ञान प्रस्थापित झाले तर मात्र सर्वोदय समाजात पिळवणूक राहणार नाही. कारण त्या समाजात प्रत्येक मनुष्य आपणास लागणाऱ्या 'वस्तू आपण स्वतः उत्पादन करतो. पण या तत्त्वज्ञानावर उभारलेला समाज अत्यंत गरीब असेल व तो स्वसंरक्षणक्षम नसलेने थोड्याच वेळात परतंत्र व गुलाम होईल.

जेव्हा जिवंत, प्रभावी व स्वतंत्र समाज प्रस्थापित करावयाचा असेल तर तेथे श्रमविभागावर उत्पादन होणे जरूर आहे व अशी श्रमविभाग व्यवस्था ज्या समाजात आहे तेथे मजुरांची पिळवणूकही होणार. कारण त्याशिवाय संपत्ती तयार होणार नाही व संपत्तीशिवाय समाजाला जीवनमानात वाढ व स्वसंरक्षणव्यवस्था करता येणार नाही.

यावरून एक असा ठाम सिद्धांत मांडता येईल की कोणतीही सुधारलेली प्रभावी स्वतंत्र व समृद्ध समाजव्यवस्था प्रस्थापित करावयाची असेल तर मजुरांच्या पिळवणुकीवरच आधारलेली असेल. पिळवणूक केव्हाही थांबविता येणे शक्य नाही. त्याचे भयंकर परिणाम नाहीसे करावयाचे असतील तर सर्व राष्ट्राचे उत्पादन समाजाच्या सर्व घटकात समान प्रमाणात वाटले जाणे जरूर आहे. पण असे केल्यास उत्पादन वाढविण्यास लागणाऱ्या अंतःप्रेरणांचा (initiative) नाश होतो हे रशियाच्या उदाहरणावरून दिसून आले, रशियन राज्यक्रांती इ. स. १९१७ साली झाली त्यावेळेस वरील तत्त्वाप्रमाणे लेनिन ट्राट्स्कीसकट सर्व लोकांनी स्वार्थत्यागपूर्वक मजुराइतकाच पगार घ्यावयाचे ठरविले. पण यामुळे उत्पादनातील अंतःप्रेरणा नाहीशी झालेने धान्य व यांत्रिक उत्पादन यात इतकी आत्यंतिक घट आली की लेनिनला परत पगार कमीजास्त करून सांपत्तिक विषमता म्हणजेच मजुरांची पिळवणूक परत प्रस्थापित करावी लागली. तेव्हाच कोणताही पुढारलेला स्वतंत्र समाज मजुराचे पिळवणुकीशिवाय जगणे शक्य नाही असे दिसून आले.

यावरून मार्क्सचा मजुरांची पिळवणूक थांबवावयाची असल्यास, राष्ट्रातील सर्व उत्पादनसाधने राष्ट्राच्या मालकीची झाली तरच साध्य होईल हा समाजवादाचा मूलभूत प्रथम सिद्धांत प्रत्यक्षात आणणे अशक्य आहे असे सिद्ध झाले.

तसेच मार्क्सचा समाजवादाचा दुसरा मूलभूत सिद्धांत म्हणजे वर्ग विरहित समाजरचना प्रस्थापित करणे हाही वरील कारणामुळे अशक्य आहे हे स्पष्ट होते. शिवाय सर्व मालक (bourgeoise) नाहीसे करून फक्त मजुरांचा (Proletariate) एकच वर्ग असलेला वर्गविरहित समाज प्रस्थापित करणे हेही अशक्य आहे. मालक (bourgeoise) याची व्याख्या 'ज्याच्या जवळ उत्पादनसाधने आहेत किंवा उत्पादनसाधने विकत घेण्याइतकी संपत्ती आहे व जो दुसऱ्याच्या श्रमावर आपले जीवन व्यतीत करतो तो ' व मजूर (Proletariat) म्हणजे 'जो आपल्या श्रमावरच आपले जीवन चालवितो तों' अशी या दोन शब्दांची मार्क्सने व्याख्या केली आहे. म्हणजे मालक व मजूर यांच्यातील फरक ठरविण्याचे मार्क्सचे परिमाण त्यांच्या अंतर्गत योग्यतेवर ठरलेले नसून बाह्य गुणावर ठरलेले आहे. यामुळे एखादी व्यक्ती मालक व मजूर या दोन्ही व्याख्येत मोडण्याचा संभव आहे. एखादा मजूर गिरणीत काम करत असतो त्यावेळेस तो आपल्या श्रमावर जगत असलेने 'मजूर' (Proletariat) असतो पण तोच घरी आला म्हणजे दुस-याच्या श्रमावर जगणारा असलेने 'मालक' (bourgeoise) होतो. तसेच एखादा हुशार मांत्रिक मजूर (Skilled labour) कारखान्यात काम करीत असताना 'मजूर' किंवा (Proeltariat) असतो. पण आपल्या घरी नोकर चाकर ठेवून त्यांचेकडे घरकाम घेत असलेने तो मालक (Bourgeoise) होतो. यावरून एकच मनुष्य एकदा 'मालक' व एकदा 'मजूर' (Bourgeoise & Proletariate) होत असलेने त्यांना बिरबल व बादशहा या गोष्टीतील 'सासरा व जावई' यांना जसे निरनिराळे करणे अशक्य झाले त्याप्रमाणे मालक व मजूर यांना निरनिराळे करणे अशक्य आहे. यामुळे फक्त मजुरांची वर्ग विरहित समाजरचना प्रस्थापित करावयाचे वेळेस मालकांना मजुरांपासून निराळे करून मालकांना नाहीसे करावयाचे ठरेल त्यावेळेस त्यांना निरनिराळे करणे शक्य नसलेने, वर्ग विरहित समाजरचना ही प्रस्थापित करणे सर्वस्वी अशक्य आहे.

तसेच बूर्झ्वा-प्रोलेटेरियट, मालक-मजूर, श्रीमंत-गरीब या सामाजिक कल्पना कार्यमय समाजघटकांच्या असून त्यामधील दोघांचे अस्तित्त्व एका नाण्याच्या दोन बाजू (head and tail) प्रमाणे एकमेकांवर अवलंबून आहेत. मालक असला तरच मजूर व मजूर असला तरच मालक अस्तित्वात येतो. नाण्याचे हेडपासून टेल निराळे करणे जसे शक्य नाही व तसे कारणास्तव नाण्याचे मध्यंतरी विभाग केल्यास जसे हेड असलेल्या भागास टेल व टेल असलेल्या भागास हेड आपोआपच उत्पन्न होते त्याप्रमाणे मालक-मजूर, श्रीमंत-गरीब, बूर्झ्वा-प्रोलेटेरियट या सामाजिक घटकांचे आहे. त्यांना विभागणे शक्य नाही. पण जबरदस्तीने त्याचे दोन विभाग केल्यास त्या विभागलेल्या घटकास दुसरा निराळा विरुद्ध भाग आपोआप

उत्पन्न होतो. यामुळे या सामाजिक घटकांची विभागणी करणे अशक्य आहे. तसेच कोणतेही कार्य सुरू व्हायचे असल्यास समाजातील व्यक्तींचे याप्रमाणे वर्ग पडल्याशिवाय कार्यच सुरू होत नाही.

या सर्व विवेचनावरून असे निष्कर्ष निघतात की जगातील कोणताही सुधारलेला व जीवनमान उच्च असलेला समाज - समाजवादी अगर भांडवलशाही हा मजुरांची पिळवणूक झाल्याशिवाय अस्तित्वात राहू शकत नाही. तसेच मालक नसलेला असा फक्त मजुरांचाच बनलेला वर्गविरहित समाज (Classless Society) प्रस्थापित करणे हे संपूर्णपणे अशक्य आहे.

जगन्मान्य झालेला समाजवाद भारतात स्थापन करावयाचा झाल्यास तो शास्त्रीय मूलभूत तत्त्वावर आधारलेला आहे किंवा नाही हे ठरविणे अत्यंत जरूर आहे. पण बुद्धिप्रामाण्याच्या निकषावर त्याचे विवेचन केल्यास तो वरीलप्रमाणे अशास्त्रीय व अशक्य ठरतो. आज रशियासह सर्व जगात वर्गविरहित व मजुरांची पिळवणूक नसलेला असा एकही समाज अस्तित्त्वात नाही. तसेच सर्वोदयवाद्यांना हजारो ग्रामदाने मिळून व शिवाय भारताची राज्यशक्ती व संपत्तीचा पाठिंबा असूनसुद्धा एकाही ग्रामात वर्गविरहित समाजरचना अद्याप प्रस्थापित करता आलेली नाही. या सर्वावरून वर्गविरहित समाजरचना अशक्य या वरील विवेचनास पुष्टीच मिळते. तेव्हा या सर्व गोष्टींचा भारताच्या प्रजेने समाजवाद अंगीकार करणेचे अगोदर विचार करणे अत्यंत जरूर आहे. बुद्धिप्रामाण्याचा निकष मात्र भारताने समाजवादाचा-तो अशक्य असलेने - अंगीकार करू नये असाच आहे. सर्व समाजवाद्यांनी वरील आक्षेपाचे खंडन करणे जरूर आहे. तसे त्यांनी न केल्यास भारतीय प्रजेनेही समाजवादास नकार देणे क्रमप्राप्त ठरते.

पाश्चिमात्यांच्या बौद्धिक गुलामगिरीच्या दफनावर आधारलेल्या वरील विचारमंथनातून दोन निष्कर्ष निघतात. १) सामाजिक पिळवणूक बिलकुल नसलेला असा अत्यंत प्रगत व संपन्न समाज निर्माण करणे शक्य नाही. २) मार्क्सचा वर्गविरहित समाज अस्तित्वात येणे अशक्य आहे. हे दोन्ही निष्कर्ष अत्यंत आश्चर्यकारक व धक्का देणारे आहेत. आज भारतात समाजवाद प्रस्थापित झाला पाहिजे असे शेकडा ९९% लोकांचे व पक्षांचे मत आहे. पण समाजवादच जर मृगजळाप्रमाणे आभासात्मक असेल तर भारताचे समाजवाद प्रस्थापित करण्याकरिता केलेले सर्व श्रम फुकट जाणार आहेत. भारतातील बुद्धिवादी म्हणून अभिमान बाळगणाऱ्या विद्वानांनी "पाश्चिमात्य बाबावाक्यं प्रमाणम्" ही जाणीव टाकून देऊन स्वयंप्रज्ञेने वरील निष्कर्षांचा विचार करावा व ते निर्णय पटल्यास भारतात समाजवादास कायमची मूठमाती देण्याचा निश्चय करावा. त्याऐवजी भांडवलशाही कल्याणकारी लोकशाही आज प्रत्यक्षात आहे तिचा स्वीकार करावा अगर त्या मूल्याची बैठक व भारतीय तत्वज्ञान यावर आधारलेल्या नवीन समाज निर्मितीची खटपट करावी.



प्राचीन चीनमधील ही कथा आहे.

शिरच्छेदाची शिक्षा झालेल्या इसमाच्या शिरच्छेदाचे काम तो आपल्या तलवारीने आतिशय सफाईने करीत असे.

शिरच्छेदाची शिक्षा सरसहा अनेकांना दिली जात असे. त्यामुळे तो आपल्या कामात अगदीच तरबेज झाला.

आता एक नवा कैदी त्याच्यासमोर शिक्षेसाठी पाठमोरा उभा होता.

तलवार सफाईने फिरली.

शिरच्छेद झालेल्या माणसाला तर काही कळलेही नाही. मस्तक जागच्या जागीच होते.

मस्तक म्हणाले, 'भाऊ, तू शिरच्छेद कधी करणार ?'

शिरच्छेद करणारा म्हणाला, 'मित्रा, तू जरा वाकून तर पाहशील.'

**- देवदत्त दाभोलकर**

पूर्वप्रसिद्धी : नवभारत

# पंडितजींची समाजवादाची कल्पना

प्रा० अ० भि० शहा

(नवभारत नोव्हेंबर - डिसेंबर १९६४)

जवाहरलाल नेहरू आणि त्यांच्या पातळीवरील इतर नेते यांच्यामध्ये एक महत्त्वाचा फरक असा दिसून येतो की, आर्थिक प्रश्नावर पंडितजींची भूमिका नेमकी काय आहे हे सांगणे फार अवघड असे. गांधी, रूझवेल्ट, चर्चिल, स्टालिन, इत्यादींची मते त्या त्या वेळेपुरती स्पष्ट असावयाची आणि म्हणून त्यांच्या भूमिकेचा, पक्षातील त्यांच्या प्रच्छन्न विरोधकांना किंवा इतरांना स्वतःला अनुकूल असा विपर्यास करणे सहसा जमत नसे. याउलट पंडितजींच्या बाबतीत अनेकदा असे घडत असे की त्यांच्या वेगवेगळ्या विधानातून स्वतःला सोयीचे असेल तेवढे घेऊन काही लोक पंडितजींच्या नावाचा उपयोग करून घेऊ शकत होते. पंडितजींच्या समाजवादाच्या कल्पनेबाबत तर हे नेहमीच व्हावयाचे. कृष्ण मेनन ते मोरारजीभाई पर्यंतच्या सर्व काँग्रेसजनांना पंडितजींचा समाजवाद "मान्य" होता. एवढेच नव्हे तर गेली काही वर्षे कम्युनिस्ट आणि समाजवादी पक्षांच्या पंडितजींवरच्या टीकेचा मुख्य रोख त्यांच्या विचारांवर नसून त्यांच्या सरकारच्या आचारावर होता. याचा अर्थ असा की एकतर काँग्रेस, कम्युनिस्ट आणि समाजवादी या पक्षात समाजवादाच्या आर्थिक स्वरूपाबद्दल एकवाक्यता होती; किंवा या पक्षाचे नेतृत्त्व बव्हंशी अप्रामाणिक किंवा वैचारिकदृष्ट्या कमकुवत होते. हे विधान थोडे कडक वाटण्याचा संभव आहे. परंतु थोडा विचार केल्यास त्याची यथार्थता दिसून येईल. संपूर्ण राष्ट्रीयीकरण, जड उद्योगांच्या विकासास अग्रक्रम आणि हुकुमशाही, आर्थिक विषमता व आत्यंतिक आर्थिक शोषण या मार्गाने भांडवलनिर्मिती यांचा पुरस्कार करणारे कम्युनिस्ट; संपूर्ण नसले तरी बऱ्याच मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीयीकरण, शेती आणि सेव्य पदार्थांचे उत्पादन, आणि लोकशाही स्वातंत्र्य यांचा आग्रह धरणारे समाजवादी; आणि एकाचवेळी महालनवीस आणि विनोबा यांचे मार्गदर्शन घेणारे काँग्रेसजन - या सर्व लोकांना पंडित नेहरू यांची समाजवादाची कल्पना जर मूलतः मान्य असली तर कोठेतरी, कुणाचे तरी चुकत आहे असे म्हणणे भाग आहे. इतकेच नव्हे तर पंडितजींच्या या कल्पनेतसुद्धा कोठेतरी गोंधळ आणि अंतर्विरोध असला पाहिजे असा निष्कर्ष काढावा लागेल. या कारणास्तव पंडित नेहरू यांच्या समाजवादाच्या कल्पनेची चिकित्सा उद्बोधक ठरण्याचा संभव आहे.

**पंडितजींचे व्यक्तिमत्त्व**

परंतु हे काम हाती घेण्यापूर्वी एका गोष्टीची दखल घेणे आवश्यक आहे. ही गोष्ट म्हणजे पंडितजींचे व्यक्तिमत्त्व होय. हे व्यक्तिमत्त्व बहुरंगी आणि अंतर्विरोधांनी भरलेले होते. तसेच इतर कोठल्याही नेत्यास लाभली नाही तेवढी लोकप्रियता त्यांना मिळाली होती. मृत्यूपूर्वी दीड वर्षापर्यंत केवळ जनतेचाच नव्हे तर बहुसंख्य विचारवंतांचा पंडितजींच्या नेतृत्त्वावर संपूर्ण विश्वास होता. पंडितजींनी आपले बौद्धिक नेतृत्त्व इतक्या सहजरित्या मान्य करवून घेतले होते की काही अपवाद वगळल्यास अनेक विचारवंतांना त्यांचे पायिक म्हणून कार्य करण्यात अभिमान वाटायचा. महात्मा गांधींनासुद्धा अशी सर्वांगीण मान्यता मिळाली नव्हती. बहुजनसमाजाच्या हृदयात गांधींचे व्यक्तिमत्त्व जे स्पंदन निर्माण करू शकत होते ते सुशिक्षित वर्गाच्या बाबतीत झाले नाही. गांधींचे राजकीय नेतृत्त्व मान्य करूनही त्यांच्याशी वैचारिक किंवा मूल्यांच्या पातळीवरील तादात्म्य साधणे या वर्गास अशक्य होते. मानवेंद्रनाथ रॉयसारख्या धडाडीच्या क्रांतिकारक आणि तर्कनिष्ठ विचारवंतांच्या बाबतीत हे झाले नाही. पंडितजीच एक असे निघाले की ज्यांच्या व्यक्तिमत्त्वाची मोहिनी समाजातील सर्व वर्गांवर एकसारखी प्रभावी ठरली.

या अद्वितीय यशाचे मूळ अर्थातच पंडितजींच्या बहुरंगी व्यक्तिमत्त्वात शोधले पाहिजे. ते रसिक होते, लेखक होते, आधुनिक मूल्यांचे उपासक होते, पद-दलितांबद्दल मनापासून सहानुभूती बाळगणारे होते, आणि अमाप सत्ता आणि लोकप्रियता मिळाली असून एका अर्थाने एकाकी व सत्तेपासून अलिप्त होते. परंतु हे सर्व गुण रॉय यांच्या ठायीसुद्धा होते; त्यांच्यामुळे सत्ता किंवा सर्वमान्य नेतृत्त्व मिळू शकत नाही. पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वाचा विशेष असा होता की त्यात वर उल्लेख केलेल्या गुणांबरोबर, भारतीय मनाची पकड घेणारे इतरही काही गुण होते. उदा. व्यक्तिस्वातंत्र्य आणि लोकशाही यांचा पुरस्कार करणारे पंडितजी वृत्तीने बादशहा होते, विज्ञानाधिष्ठित बुद्धिवादाचे महत्त्व मान्य करीत असूनही ते





अनेकदा आणीबाणीच्या वेळी श्रद्धा किंवा भावना यांच्या आहारी जात असत. बहुजनसमाजाच्या प्रेमामधून शक्ती आणि स्फूर्ति मिळविणारे पंडितजी सर्वसामान्य नागरिकाशी कधीही एकरूप होऊ शकले नाहीत; एवढेच नव्हे तर ते आणि त्यांचे निकटवर्ती सहकारी यांच्यामध्येही शेवटपर्यंत एक दरी राहिली. रेखीवपणाचे चाहते असलेले पंडितजी भारताच्या राष्ट्रीय जीवनात विलक्षण वैचारिक वेंधळेपणा आणि परस्परविरोधी प्रवृत्ती यांचे स्फूर्तिदैवत म्हणून वागत राहिले. उदा. धर्माधिष्ठित भोळ्या समजुतीवर कोरडे ओढीत असताना पंडितजी आपल्या बहिणीस नवजात नातवाची कुंडली उत्तम ज्योतिषाकडून करवून घेण्याचा सल्ला देऊ शकत होते. आणि आधुनिक लोकशाही समाजवादाची कल्पना विशद करून सांगताना वेदान्ती तत्त्वज्ञानाचाही सकौतुक उल्लेख करू शकत होते.

पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वात असे अनेक अंतर्विरोध होते. प्रत्येक वर्गास त्यात स्वतःचा आदर्श अंशतः का असेना परंतु प्रतिबिंबित झालेला दिसत असे, आणि म्हणून दोष उपेक्षणीय वाटत होते. त्यांच्याशी महत्त्वाच्या प्रश्नावर तीव्र मतभेद असणाऱ्या विचारवंतांनासुद्धा ते आपल्यातले वाटत असत, कारण या टीकाकारांची भाषा त्यांना समजत होती. त्यांच्यामुळे सत्तेच्या राजकारणालाही एक शान आली आणि स्वातंत्र्योत्तर नाजुक काळात भारतास राजकीय स्थैर्य लाभण्यास सहाय्य झाले.

**मूल्ये व धोरण**

परंतु त्याचबरोबर पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वामुळे देशापुढील काही महत्त्वाच्या प्रश्नांचे स्वरूप स्पष्ट होण्यास अडथळा आला हे तितकेच खरे आहे. विशेषतः परराष्ट्रधोरण आणि आर्थिक नियोजन या दोन्ही प्रश्नांवर त्यांनी घेतलेल्या भूमिका इतक्या चुकीच्या ठरल्या की त्यांना प्रिय असलेल्या स्वातंत्र्य, शांती आणि समृद्धीवर आधारलेली समता या तिन्ही मूल्यांना धोका निर्माण झाला. शेवटी शेवटी हे पंडितजींच्या लक्षात येऊ लागले होते असे समजण्यास जागा आहे. चिनी हल्ल्याच्या पाचव्या दिवशी राज्य सरकारांच्या माहितीमंत्र्यांच्या सभेत बोलताना, समकालीन जगाबद्दल आपला समज साफ चूक ठरल्याचे त्यांनी मोकळेपणाने कबूल केले. त्याच सुमारास नियोजनाबद्दल बोलताना त्यांनी मोठमोठ्या प्रकल्पांमागे लागण्याच्या वृत्तीवर टीका केली. भारतीय समाजाचे सामाजिक आणि सांस्कृतिक नव्हे तर केवळ आर्थिक आधुनिकीकरण व्हावयाचे असेल तरी त्या प्रक्रियेत शिक्षणाचा फार मोठा भाग आहे हे त्यांनी ओळखले होते. स्टालिनोत्तर काळात कम्युनिस्ट जगात घडलेल्या घटनांवरून त्यांची लोकशाही मार्गावरील श्रद्धा बलवत्तर झाली. याचा परिणाम त्यांच्या समाजवादाच्या कल्पनेवरही झाला असल्यास नवल नाही. कारण, समाजवादी निष्ठा बाळगणारे अनेक राजकीय पुढारी आणि विद्यापीठीय अर्थशास्त्रज्ञ यांच्यापेक्षा पंडितजींची भूमिका अधिक व्यापक आणि लवचिक होती. हे लक्षात घेतले की संयुक्त सहकारी शेतीसारख्या गोष्टींचा त्यांनी का आग्रह धरला नाही हे समजण्यास मदत होते.

याचा अर्थ असा नव्हे की पंडितजींची समाजवादाची कल्पना पुरेशी स्पष्ट होती. स्पष्टता होती, परंतु ती मूल्यांच्या बाबतीत आणि ती साध्य करण्यास अवलंब करण्याच्या साधनांच्या बाबतीत. म्हणून पंडितजींच्या विचारांची मांडणी किंवा त्यांचे विश्लेषण करताना एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे. ती अशी की, धोरण आणि मूल्य (किंवा कार्यपद्धती) यांच्यामध्ये विरोध दिसून आला तर मूल्यांच्या अबाधितत्त्वासाठी धोरणात बदल करण्याची त्यांची तयारी असे. काही वेळा उघडपणे तर काही वेळा गाजावाजा न करता, परंतु नेहमी असा बदल होत असे. संयुक्त सहकारी शेतीचे उदाहरण वर दिलेच आहे. दुसरे उदाहरण लष्करी सहाय्य घेण्याबद्दलच्या धोरणाचे देता येईल. १९६२ च्या सप्टेंबर पर्यंत याबाबत पंडितजींची भूमिका अशी होती की असे सहाय्य घेणे अलिप्ततावाद आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य यास घातक ठरेल. चीनने आक्रमण चढविल्यानंतर या भूमिकेत जो बदल घडून आला तो सुविदित आहे. समाजवादावर पंडितजींनी केलेल्या विधानांचा विचार करताना त्यांची ही वृत्ती लक्षात ठेवली नाही तर त्यांच्या नावावर अनेक परस्परविरोधी कल्पना विकल्या जाण्याचा संभव आहे, आप्तवाक्य प्रमाण मानण्याची परंपरा असलेल्या समाजात, तशीच परंपरा असलेल्या कम्युनिस्टांना याचा फायदा उठविणे विशेष सोपे आहे. शास्त्रीसरकारविरुद्ध आलेल्या अविश्वासाच्या ठरावावर कम्युनिस्टांनी केलेल्या भाषणात याचे प्रत्यंतरही आले आहे.

**दोन विस्तृत स्पष्टीकरणे**

समाजवादावर पंडितजींनी केलेली दोन विस्तृत स्पष्टीकरणे या दृष्टीने बारकाईने पाहणे योग्य ठरेल. पहिले अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीतर्फे प्रसिद्ध होत असणाऱ्या इकॉनॉमिक रिव्ह्यू (Economic Review) या नियत-कालिकाच्या १५ ऑगस्ट १९५८ च्या अंकात मूलभूत धोरण






(The Basic Approach) या शीर्षकाखाली प्रसिद्ध झाले आहे. दुसरे त्यांच्या नावाखाली किंवा त्यांच्या भाषेत प्रसिद्ध झाले नसले तरी त्यांच्या संपूर्ण संमतीनं झाले असावे असे समजण्यास हरकत नाही. हे स्पष्टीकरण म्हणजे भुवनेश्वरच्या बैठकीत जानेवारी १९६४ मध्ये काँग्रेसच्या साधारण सभेत मंजूर झालेला लोकशाही आणि समाजवाद (Democracy and Socialism) ठराव हे होय. या स्पष्टीकरणांचा उल्लेख पुढे 'B.A.' & 'C&D' असा केला जाईल. त्यातील उद्धृत केलेल्या वाक्यांचा अक्षरशः अनुवाद देण्याचा प्रयत्न न करता आशयास बाधा येणार नाही एवढी काळजी घेऊन त्यांचा स्वैर अनुवाद दिला आहे.

पंडितजींच्या समाजवादाच्या कल्पनेत व्यक्ती केंद्रस्थानी आहे. तिच्या विकासास आवश्यक असलेली आर्थिक, सामाजिक, आणि सांस्कृतिक परिस्थिती निर्माण करण्यास, विशेषतः भारतासारख्या मागासलेल्या आणि अविकसित राष्ट्रात, भांडवलशाही असमर्थ आहे आणि म्हणून आपल्यास समाजवादी मार्गाने गेल्याशिवाय गत्यंतर नाही. परंतु समाजवादही एक साधन आहे आणि त्याचा उपयोग लोकशाही मार्गाने, जनतेच्या संमतीने व सहकाराने करावयाचा आहे. दुसरे असे की हा समाजवाद कोठल्याही पोथीवंद तत्त्वावर उभारावयाचा नाही. त्याचे उद्दिष्ट संधींची समानता, सामाजिक न्याय, समृद्धीवर आधारलेली आर्थिक समता, वैज्ञानिक दृष्टिकोन आणि नैतिक व अध्यात्मिक मूल्यांची जोपासना व त्यांचा विकास याकरिता अनुकूल परिस्थिती निर्माण करणे हे होय. केवळ भौतिक भरभराटीने मनुष्यजीवनास अर्थ प्राप्त होत नाही. त्याचबरोबर जोपर्यंत सर्वसामान्य नागरिक दारिद्र्य आणि आर्थिक अशाश्वती यापासून मुक्त होत नाहीत तोपर्यंत त्याला स्वतःचा विकास करून घेणे अशक्य आहे. भारताची लोकसंख्या आणि त्या मानाने मर्यादित असलेली साधनसामुग्री लक्षात घेता दारिद्र्याचा प्रश्न नियोजनाचा अवलंब केल्याशिवाय सुटणार नाही. हे नियोजन शासनाने केले पाहिजे, हे उघड आहे. नियोजनाबरोबर उत्पादनाचे न्याय्य वाटप होईल हे पाहणेही शासनाचे कर्तव्य ठरते. या सर्व गोष्टी लक्षात घेतल्या तर अर्थव्यवस्थेतील शासकीय विभाग मोठा आणि निर्णायक स्वरूपाचा असावयास पाहिजे हे स्पष्ट होईल.

परंतु समाजवादाचा स्वीकार केल्याने लगेच दारिद्र्याचे समृद्धीत रूपांतर होईल असे समजणे चूक ठरेल. त्याकरिता खूप श्रम करावे लागतील. तसेच व्यक्तीच्या प्रतिष्ठेस घातक अशा सामाजिक संस्था - उदा. जातिसंस्था आणि बुरसटलेले विचार यांचे निर्मूलन करून आधुनिक मूल्ये व वैज्ञानिक दृष्टिकोन यांची स्थापना केली पाहिजे. म्हणजे पंडितजींना अभिप्रेत असलेला समाजवाद व्यक्तीची प्रतिष्ठा आणि तिचे स्वातंत्र्य, समृद्धी, समता आणि आधुनिक ज्ञान व मूल्ये यावर आधारलेला होता. त्याची साधने तितकीच पवित्र असावयास पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. विशेषतः कम्युनिझमचे पोथीवंद तत्त्वज्ञान आणि हिंसेचा किंवा हुकूमशाहीचा मार्ग त्यांना नामंजूर होता, कारण की कम्युनिस्टांच्या बाबतीत हे सिद्ध झाले आहे की साधनांच्यामुळे साध्यही विकृत होऊन जाते. तसेच मार्क्सने मांडलेले सिद्धांत जुनाट झाले आहेत आणि आज त्यांना चिकटून बसणे म्हणजे गेल्या शंभर वर्षांत मनुष्यजातीने मिळविलेल्या ज्ञानाचा आणि अनुभवाचा उपमर्द करण्यासारखे होईल.

ही झाली पंडितजींची समाजवादाबद्दलची तात्त्विक भूमिका. वर उल्लेख केलेल्या १९५८ च्या लेखात ही भूमिका स्पष्ट भाषेत व्यक्त करणारी अनेक विधाने आहेत. उदा. 'आपण हे विसरू नये की मानव हा मूलभूत घटक आहे : व्यक्तीचा विकास साधणे व विषमता कमी करणे हे आपले ध्येय होय; तसेच जीवनाला अर्थ प्राप्त करून देणारी व सुसंस्कृत समाजाचा अंतिम पाया म्हणून असणारी जीवनाची नैतिक व अध्यात्मिक अंगेही आपण विसरता कामा नये.' ही उद्दिष्टे साध्य करण्याचे समाजवादी अर्थव्यवस्था एक साधन आहे, ती स्वतः काही साध्य नाही. 'परंतु समाजवाद म्हणजे काय ? या प्रश्नाचे काटेकोर उत्तर देणे अवघड आहे... मूलतः समाजवाद म्हणजे भांडवलशाहीपेक्षा वेगळा असा एक मार्ग आहे. परंतु मला वाटते की समाजवाद आणि भांडवलशाही या दोन्हीमधले अंतर हळूहळू कमी होत जात आहे. कारण की समाजवादाच्या अनेक कल्पना क्रमशः भांडवलशाहीत आत्मसात होऊ लागल्या आहेत. .... शेवटी समाजवाद म्हणजे सामाजिक आणि आर्थिक प्रश्नांकडे पाहण्याची एक वैज्ञानिक दृष्टि आहे. मागासलेल्या आणि अविकसित देशात समाजवाद स्वीकारल्याने त्याचे मागासलेपण काही एकदम कमी होत नाही. वस्तुतः अशा परिस्थितीत दारिद्र्यग्रस्त आणि मागासलेला समाजवाद आपणास पाहावयास मिळेल.' दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे 'समाजवादाचा स्वीकार केल्याने जादूची कांडी फिरविल्यासारखे दारिद्र्याचे लगेच सुबत्तेत रूपांतर होणार नाही. श्रम करणे, राष्ट्राची उत्पादनक्षमता वाढविणे, न्याय्य वितरण करण्याची व्यवस्था करणे हा एकच मार्ग आपल्याला उपलब्ध आहे. ' ही एक दीर्घकालीन प्रक्रिया आहे आणि म्हणून नियोजन स्वीकारणे आवश्यक आहे.

**नियोजनाची तत्त्वे**

या नियोजनाची मार्गदर्शक तत्त्वे भुवनेश्वर ठरावाच्या सहाव्या परिच्छेदात सांगितली आहेत. 'आर्थिक समृद्धी, संधिसमानता आणि शोषण व विशेष हक्क यांचे निर्मूलन हे नियोजनाचे उद्दिष्ट होय. हे उद्दिष्ट शांततामयमार्गाने, लोकांच्या संमतीने, भारताच्या संविधानात प्रतिष्ठित केलेली लोकशाही मूल्ये आणि कार्यपद्धती यांचे संरक्षण आणि वर्धन करून साध्य करावयाचे आहे. ... म्हणजे लोकशाही, व्यक्तीची प्रतिष्ठा आणि सामाजिक न्याय या तत्त्वावर आधारलेला लोकशाही समाजवाद असे काँग्रेसच्या विचारसरणीचे थोडक्यात वर्णन करता येईल.'

लोकशाही समाजवादाचे हे तत्त्वज्ञान साधन आणि मूल्ये या दोन्ही बाबतीत कम्युनिझमपेक्षा वेगळे आहे. सोव्हिएट युनियनने अनेक क्षेत्रात मिळविलेल्या यशाचे कौतुक करूनही पंडितजींना कम्युनिझमचा मार्ग पसंत नाही हे त्यांनी स्पष्ट केले आहे. त्यांच्या मते 'कम्युनिझमचे यश वरवरचे आहे, आणि शेवटी ते फोल ठरते. एकतर त्यात लवचिकपणा नाही. दुसरे, अधिक महत्त्वाचे कारण असे की कम्युनिझम मनुष्य स्वभावाच्या काही मूलभूत गरजांकडे दुर्लक्ष करतो. भांडवलशाहीतल्या अंतर्विरोधाबद्दल कम्युनिस्ट साहित्यामध्ये आपण बरेच वाचतो आणि त्यात तथ्यही आहे. परंतु कम्युनिझमच्या जड साच्यातसुद्धा वाढते अंतर्विरोध आपणास दिसू लागले आहेत. व्यक्ति-स्वातंत्र्याची कम्युनिझम गळचेपी करतो आणि त्यातून फार प्रभावी प्रतिक्रिया निर्माण होत असतात. आपण ज्यास जीवनाची नैतिक आणि अध्यात्मिक बाजू म्हणू तिच्याबद्दल कम्युनिझम तिरस्कार बाळगतो. यात मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वात मूलभूत असलेल्या कशाची तरी उपेक्षा होत आहे. एवढेच नव्हे तर मनुष्याच्या वागणुकीस कोठलेही निकष आणि मूल्ये उरत नाहीत. हिंसेशी त्याचा असलेला संबंध माणसात एक अमंगल प्रवृत्तीस प्रोत्साहन देत असतो. परंतु हिंसक मार्गांना पंडितजींचा विरोध केवळ नैतिक नव्हता; तो तितकाच आधुनिक युगाच्या निदानावर आधारलेला होता. आधुनिक जग एक अशा टप्प्याला येऊन पोहोचले आहे की कोठल्याही मोठ्या समाजावर सक्तीने कोणतीही विचारसरणी लादण्याचा प्रयत्न शेवटी निष्फळ ठरणार हे निश्चित आहे. उलट, आजच्या परिस्थितीत त्यातून युद्ध आणि महाविनाश एवढेच निष्पन्न होईल. याच संदर्भात हंगेरीचे उदाहरण देऊन ते पुढे सांगतात की 'हंगेरीत (१९५६ मध्ये) घडले ते कम्युनिझम आणि कम्युनिझमविरोधी शक्ती यांच्यामधला संघर्ष अशा स्वरूपाचे नव्हते. त्याचे स्वरूप परकीय नियंत्रणापासून मुक्ती मिळवू पाहणाऱ्या राष्ट्रवादाच्या आविष्काराचे होते.'

**निर्दोष कल्पना पण प्रत्यक्षात...**

पंडितजींची समाजवादाची कल्पना तात्त्विकदृष्ट्या निर्दोष होती असे वरील विवेचनाच्या आधारे म्हणता येईल. लोकशाही, व्यक्तीची प्रतिष्ठा आणि सामाजिक न्याय या तत्त्वांवर आधारलेला लोकशाही समाजवाद आणि समृद्ध अर्थव्यवस्था अस्तित्वात आणणे हे भारतीय नियोजनाचे उद्दिष्ट म्हणून पंडितजींना आणि त्यांच्या पक्षाला मान्य असले तर इतर लोकशाही समाजवाद्यांचा त्यांच्याशी नियोजनाच्या तपशीला-वरच मतभेद शक्य आहे. उदा. नियोजनाच्या वेगवेगळ्या टप्प्यात, विशेषतः सुरुवातीच्या काही वर्षात, अग्रक्रमांचे (Priorities) स्वरूप कोणते असावयास पाहिजे? एकूण अर्थव्यवस्थेत शासकीय विभागाचे स्थान काय राहिले पाहिजे? मोठ्या प्रमाणावर भांडवलनिर्मितीची गरज आणि न्याय्य वाटपाची बहुसंख्य लोकांची अपेक्षा, यामध्ये समतोल कसा साधावयाचा? हे व इतर तत्सम प्रश्न तात्त्विक दृष्टीने तपशीलाचे वाटले तरी ते कसे सोडविले जातात यावरून सर्वसामान्य नागरिक तात्त्विक भूमिकेची सार्थासार्थता ठरवीत असतो. मला वाटते की या बाबतीत अर्थशास्त्रज्ञ आणि इतर तज्ज्ञमंडळी यांनी पंडितजींची दिशाभूल केली. येथे तपशीलात जाण्याची गरज नाही, परंतु दोन गोष्टींचा उल्लेख करणे आवश्यक आहे. एक अशी की भारतासारख्या शेतीप्रधान आणि मर्यादित साधनसामुग्री असलेल्या देशात कोणत्याही सरकारने शेतीकडे दुर्लक्ष करणे अक्षम्य ठरले असते. पंडितजींना जो समाजवाद अभिप्रेत होता त्याच्या संदर्भात तर शेतीच्या विकासात पहिला क्रमांक देणे आवश्यक होते. दुर्दैवाने पंडितजींना जे सल्लागार लाभले त्यात बरेचसे पुस्तकी स्वप्नाळूपणात रमणारे किंवा कम्युनिस्ट नियोजनपद्धतीचे प्रशंसक असे होते. पंडितजी स्वतः अर्थशास्त्राचे अभ्यासू नव्हते व म्हणून, त्यांनी एकेठिकाणी म्हटल्यानुसार, बहुसंख्य अर्थशास्त्रीय सल्लागारांच्या म्हणण्या-नुसार ते आपले धोरण ठरवीत गेले. म्हणून दुसरी पंचवार्षिक योजना क्रमवारीच्या दृष्टीने कम्युनिस्ट स्वरूपाच्या योजनेसारखी झाली. परंतु हे करीत असताना पंडितजींची लोकशाहीवरील श्रद्धा त्या तज्ज्ञांनी लक्षात घेतली नाही. आता मौज अशी आहे की कम्युनिस्ट स्वरूपाची योजना कम्युनिस्टांच्या कार्यपद्धतीनेच 'यशस्वी' करता येते. तशी कार्यपद्धती स्वीकारली नाही तर नियोजनामुळे दुर्दम्य असे नवीनच ताण निर्माण होतात आणि नियोजनाची कल्पनाच धोक्यात येते. तिसऱ्या योजनेत हीच स्थिती कायम राहिली आणि म्हणूनच स्वतंत्र पक्षास इतके यश मिळाले.

अनुक्रमणिका

**शासकीय विभागाची व्याप्ती**

दुसरा प्रश्न शासकीय विभागाच्या आकाराचा होय. येथेही नियोजनाच्या शासनमान्य कल्पनेवर मतभेद होऊ शकतो. कोठल्याही समाजात शासकीय विभाग एकूण अर्थव्यवस्थेच्या प्रमाणात फार मोठा असला तर व्यक्तिस्वातंत्र्यासच नव्हे तर उत्पादनक्षमतेसही बाध येत असतो. शासकीय आणि खाजगी विभाग यांच्यामध्ये स्पर्धा असली तर हा धोका थोडातरी मर्यादित राहण्याचा संभव आहे. (पोलादाच्या बाबतीत आपल्याकडे तेही झालेले नाही.) परंतु शासनाची जर मक्तेदारी झाली तर आर्थिक मक्तेदारीत राजकीय सत्तेच्या मक्तेदारीची भर पडून अनेक दृष्टीने अनर्थ माजणे अपरिहार्य होऊन बसते. अविकसित राष्ट्रात हा धोका विशेष असतो. कारण की सुशिक्षित मध्यमवर्गाचा बराच भाग सरकारी नोकरीत असल्यामुळे लोकमत आणि लोकशाही संकेत दुबळे राहतात. लोकशाहीवर आधारलेला समाजवाद आणावयाचा असेल तर हा मार्ग स्वीकारून चालणार नाही. परंतु येथेही पंडितजींची दिशाभूल झाली असे म्हणावे लागेल.

पंडितजींनी पुरस्कृत केलेल्या नियोजन पद्धतीचे असे अनेक दोष दाखविता येतील. परंतु ते येथे महत्त्वाचे नाही, कारण त्यांनी कधी सर्वज्ञपणाचा दावा केला नाही. उलट अनेकदा ते संशयग्रस्त मनःस्थितीत सापडत होते, आणि म्हणूनच की काय, त्यांचा भर नेहमी पोथीबंद तत्त्वज्ञानापेक्षा अनुभव आणि स्वतंत्र विचारांवर आणि विशिष्ट कार्यक्रमापेक्षा कार्यपद्धतीवर असायचा. ज्या मूल्यांमुळे या कार्यपद्धतीस पावित्र्य लाभत असते ती मूल्ये त्यांनी निःसंदिग्ध भाषेत सांगितली आहेत. त्यांच्या बहुरंगी आणि अंतर्विरोधी व्यक्तिमत्त्वाचा गाभा या मूल्यनिष्ठेत सापडतो. त्या निष्ठेचे जतन करणे आणि त्या मूल्यांची साधना अविरतपणे चालू ठेवणे, हीच पंडितजींच्या स्मृतीस स्वातंत्र्यप्रेमी व्यक्ती अर्पू शकणारी सर्वोत्कृष्ट आदरांजली होय.



## धर्मासंबंधी

धर्माबद्दल समाजवाद्यांनी पुरेसा विचार केला नव्हता हे प्रांजळपणे मान्य केले पाहिजे. **एका बाजूला समाजव्यवस्थेचा मूळ भौतिक-आर्थिक पाया बदलला की जात-धर्म वगैरे डोलाऱ्यातील बाबी आपोआप सुधारतील असे अध्याहृत धरले गेले तर दुसरीकडे गांधी, विनोबा यांची कर्मकांड विरहित उदात्ततेकडे नेणारी धार्मिकता समाजपरिवर्तनाला हानिकारक नाही असेही त्यांनी मानले. राजकीय व आर्थिक व्यवहारात धर्मग्रंथ व धर्मगुरूंचे आदेश प्रमाण मानू नयेत अशी भूमिका मात्र समाजवाद्यांनी प्रथमपासून सातत्याने मांडली आहे.** धर्मनिरपेक्षता म्हणजे धर्मविरोध नव्हे. श्रद्धा ठेवण्याचे, त्यानुसार उपासना करण्याचे स्वातंत्र्य हा नागरिकाचा मूलभूत हक्क आहे, हे १९३१ च्या कराची काँग्रेसच्या ठरावात म्हटलेले समाजवाद्यांनाही मान्य होते. धर्मव्यवहारात पुरोहित-शाहीचे वर्चस्व असू नये आणि सर्वसामान्य माणसांची दिशाभूल करून त्यांचे नुकसान व शोषण करणाऱ्या कर्मकांडांना विरोध केला पाहिजे अशी भूमिका आवश्यक त्या संदर्भात समाजवाद्यांनी घेतली आहे. **वैचारिक पातळीवर बौद्ध धर्माची शिकवण मानव जातीला उपकारक आहे असे प्रतिपादन आचार्य नरेंद्र देवांनी विद्यापीठीय पातळीवर मांडले.** तसे अन्य सार्वजनिक, शैक्षणिक व साहित्यिक व्यासपीठांवरून मांडत राहिले. आर्यसमाजाने त्यांना आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला असता त्याला त्यांनी स्पष्ट नकार दिला. **वैदिक परंपरा विषमतावादी आहे असे प्रतिपादन आचार्यांच्या लिखाणात वारंवार असल्याचे दिसून येते.**

भारतीय राजकारणात सांप्रदायिक जमातवाद ही एक मोठी समस्या आहे, याची जाणीव समाजवाद्यांना होती. हिंदुत्ववादी संघटनांना समाजवाद्यांनी उघडपणे व हिरीरीने विरोध केला. १९४० साली बॅ. जिनांनी पाकिस्तानची मागणी केली. त्याला दक्षिण भारतातील एक नेते सी. राजगोपालाचारी यांनी पाठिंबा दिला होता. **राष्ट्रकांना स्वयंनिर्णयाचा हक्क आहे अशी तरतूद सोव्हिएत युनियनच्या संविधानात होती. त्याचा आधार घेऊन भारतातील कम्युनिस्टांनीही पाकिस्तानच्या कल्पनेला उचलून धरले होते.** त्यावर सडेतोड टीका करून समाजवाद्यांनी भारत अखंड रहावा या भूमिकेचा पाठपुरावा केला. येथे हिंदू व मुस्लिमांत तेढ वाढविण्याचे ब्रिटिश सत्ताधाऱ्यांचे धोरण आहे. (फोडा आणि राज्य करा) तेव्हा त्यांच्या कारस्थानांपासून भारतीय जनतेने एकजूट टिकविली पाहिजे असे प्रतिपादन 'कॉम्युनल ट्रँगल' (सांप्रदायिक त्रिकोण) या अशोक मेहता आणि अच्युत पटवर्धन यांनी लिहिलेल्या पुस्तकात करण्यात आले होते. हिंदु-मुस्लीम तणाव कमी व्हावा, जातीय दंगली झाल्या तर त्या शमविण्यासाठी जागेवर जाऊन प्रयत्न करावेत असे समाजवाद्यांचे धोरण व वर्तन राहिले आहे.

**- पन्नालाल सुराणा**

(साधना १० ऑगस्ट २००२)










# आधुनिक भारतीय लोकशाहीचा विकास

आचार्य शं० द० जावडेकर

(नवभारत ऑगस्ट - सप्टेंबर १९५२)

भारतीय लोकशाहीचा इतिहास सांगावयाचा म्हटले तर आपणास प्राचीन काळात जावे लागेल. कारण युरोपखंडाप्रमाणे भरतखंडातही प्राचीन काळी लोकशाही नांदत होती, ही गोष्ट आता सर्वमान्य झालेली आहे. पण आपल्या राष्ट्रात प्राचीन काळी लोकशाही नांदत होती आणि ती एक अभिमानास्पद घटना आहे हे तरी आम्हास केव्हा समजले, या प्रश्नाचे उत्तर जर आपण शोधू लागलो तर असे दिसून येईल की, सर्व भरतखंडात ब्रिटिशसत्ता सार्वभौम बनली व त्यानंतर सुमारे साठ-सत्तर वर्षांनी आम्हास लोकशाहीचे महत्त्व समजू लागले. आणि त्याच सुमारास आम्हास असे आढळून आले की, या भरतखंडांतही प्राचीन काळी लोकशाही नांदत असावी. पण या प्राचीन लोकशाहीचा विचार आपणास येथे करावयाचा नसून आधुनिक भारतात लोकशाहीची स्थापना व्यावी यासंबंधी आम्ही जे प्रयत्न केले, त्यांचे स्वरूप व भवितव्य काय होणार आहे या दोनच प्रश्नांचा विचार या लेखात अगदी थोडक्यात करावयाचा आहे.

आधुनिक भारतात लोकशाही राजकारणाची मुहूर्तमेढ, इ. स. १८८५ साली राष्ट्रीय सभेची संस्थापना करून, यापूर्वीही भारतातील निरनिराळ्या प्रांतात लोकशाही पद्धतीने राजकारण करणाऱ्या संस्था अस्तित्वात आल्या होत्या, पण अखिल भारतीय स्वरूपाची राजकीय संस्था त्यापूर्वी निर्माण झालेली नव्हती. अशी संस्था स्थापन करण्याचा विचार १८८५ पूर्वी सुमारे दहा वर्षे येथील वातावरणात संचार करीत असावा. पण त्याला मूर्त स्वरूप या सालीच प्राप्त झाले. या संस्थेची पहिली बैठक पुण्यास भरविण्याचे ठरले होते. १८८५ च्या मार्च महिन्यात पुण्यातूनच निरनिराळ्या प्रांतातील राजकीय राष्ट्रसेवकांना निमंत्रणे पाठविण्यात आली; पण आयत्या वेळी पुण्यात महामारीचा उपद्रव सुरू होण्याची धास्ती निर्माण झाली, म्हणून ही सभा पुण्यात न भरता मुंबईस भरविण्यात आली. यावेळी धाडण्यात आलेल्या निमंत्रणपत्रकात असे म्हटले आहे की, ही सभा म्हणजे हिंदी लोकांचे एक बीजरूप पार्लमेंटच बनेल आणि ती जर योग्य प्रकारे काम करू लागली तर थोड्याच वर्षात असे प्रत्यक्ष सिद्ध होईल की, हिंदी लोक प्रातिनिधिक संस्था चालविण्यास नालायक आहेत हे मत निराधार आहे.

"Indirectly, this Conference will form the germ of a Native Parliament and, if properly conducted, will constitute, in a few years, an unanswerable reply to the assrtion that India is still wholly unfit for any form of representative institutions." (History Of congress by Pattabhi Sitaramayya, P. २४)

हिंदुस्थान लोकशाही राजकारण करण्यास लायक झाला आहे, हे सिद्ध करण्यास तसे राजकारण प्रत्यक्ष करू लागणे हाच एक मार्ग होता. आपण एक पार्लमेंटसारखी सर्व राष्ट्राची प्रतिनिधिभूत संस्था स्थापन करावी आणि तिच्यामार्फत लोकशाही पद्धतीने जनतेचे राजकारण करू लागावे असा काँग्रेसची स्थापना करणाऱ्यांचा हेतू होता. इंग्लंडातील पार्लमेंट आणि अमेरिकेतील काँग्रेस तशीच आपली राष्ट्रीय सभा जनतेच्या वतीने राष्ट्रातील सत्ताधारी परकीय सरकारशी शिष्टाई करणारी आणि लोकांच्या हक्कांसाठी झगडणारी संस्था बनावी अशी ही कल्पना आहे. इंग्लंड किंवा अमेरिका ही राष्ट्रे स्वतंत्र असून तेथील लोकप्रतिनिधिसभा सत्ताधारी आहेत. आपले राष्ट्र आज परतंत्र असले, तरी आज ना उद्या येथील राज्यसत्ता लोकप्रतिनिधींच्या हाती येणार आहे व यावी, या दृष्टीनेच हा उपक्रम करण्यात आला होता. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धाचा इतिहास आणि फ्रेंच राज्यक्रांतीचा इतिहास यांचे ज्ञान यावेळी हिंदी नेत्यांना झालेले होते. आधुनिक जगातील लोकशाही व राष्ट्रीय भावना यांच्या इतिहासातील या घटनांपासून ब्रिटिश लोकांनी योग्य तो बोध घेतला होता. यामुळे हिंदी जनता जागृत व लायक बनल्यानंतर, तिने क्रांती करण्याची वाट न बघता, ब्रिटिश राज्यकर्ते हिंदुस्थानात लोकशाही राज्य स्थापन करण्यास तयार होतील असा राष्ट्रीय सभेतील पहिल्या पिढीचा विश्वास होता. आज हिंदी लोकांत क्रांती करण्याची शक्ती नाही आणि लोक क्रांती करेपर्यंत ब्रिटिश मुत्सद्दी वाट पाहत स्वस्थ बसणार नाहीत अशी त्यांची भावना होती. या सर्व दृष्टींनी विचार करून त्यांनी आपले राजकारण राष्ट्रीय सभेमार्फत चालू केले. आम्ही क्रांति करण्याचा प्रयत्न करीत नसून भावी क्रांति टाळण्याचाच आमचा

अनुक्रमणिका

प्रयत्न आहे असे ते जाहीर करीत असत आणि आपल्या नेमस्त राजकारणामुळे व ब्रिटिशांच्या दूरदर्शी मुत्सद्दीपणामुळे भारत व ब्रिटन या दोन राष्ट्रांमधील तंटा आपणास क्रांती न करता सोडविता येईल अशी त्यांची श्रद्धा होती.

आपल्या साम्राज्याविरुद्ध आज ना उद्या येथील लोक बंड करून उठतील व त्या बंडात त्याचा अंत होईल अशी भीती ब्रिटिशांना प्रथमपासून वाटत होती. पण १८५७ च्या बंडानंतर ही भीती केवळ काल्पनिक नसून ती वास्तविक आहे, याचीही त्यांना जाणीव झाली होती. ही भीती नष्ट करण्याचा व भावी क्रांती टाळण्याचा एक उपाय म्हणून कायदेशीरपणे जनतेची गाऱ्हाणी सरकारपुढे मांडणारी एखादी अखिल भारतीय राजकीय संस्था निर्माण झाली तर बरे होईल असे लॉर्ड डफरीन यांनी ह्यूम यांच्यापाशी बोलून दाखविले आणि थोड्याच दिवसात ह्यूम ह्यांनी हिंदी पुढाऱ्यांना राष्ट्रीय सभा स्थापन करण्यास व ती चालविण्यास सहाय्य केले. या संस्थेच्या स्थापनेने व कार्याने भारतात क्रांती घडून येणार नाही व येऊ नये अशीच तिची संस्थापना करणाऱ्या हिंदी व ब्रिटिश मुत्सद्यांची इच्छा होती. तथापि, हिंदुस्थानात लोकशाहीची संस्थापना करण्यासाठीच ती निर्माण झाली आहे, याबद्दल कोणासही शंका नव्हती.

**पहिले पक्षभेद व काँग्रेसनिष्ठा**

राष्ट्रसभेच्या संस्थापकांच्या मनांतील ब्रिटिशांच्या दूरदृष्टीवरील व उदार धोरणावरील ही श्रद्धा, तिचे नेतृत्त्व करू पाहणाऱ्या दुसऱ्या पिढीतील नव्या नेत्यांत उरली नव्हती. पहिल्या पिढीतील पुढाऱ्यांचे धोरण त्यांना मवाळ आणि परावलंबी वाटू लागले. त्यांच्या धोरणापेक्षा अधिक जहाल आणि स्वावलंबी धोरण स्वीकारण्याचा काळ आता आला आहे असे लो. टिळकप्रभृति नव्या पुढाऱ्यांना वाटू लागले. या जुन्या व नव्या पिढीच्या पुढाऱ्यांच्या मतभेदातून दोन निरनिराळ्या विचार-सरणीच जनतेपुढे येऊ लागल्या व दोन विचारसरणींच्या आधारावर दोन राजकीय पक्ष या राष्ट्रसभेत निर्माण झाले. जुन्या पिढीच्या विचारसरणीला प्रागतिक सुधारणावाद आणि दुसऱ्या पिढीच्या विचारसरणीला राष्ट्रीय क्रांतिवाद अशी नावे देता येतील. या विचारांवर उभारलेल्या पक्षांना अनुक्रमे 'प्रागतिक' व 'राष्ट्रीय' अशी नावे प्राप्त झाली. असे दोन पक्ष निर्माण झाले, तरी दोन्हीही पक्षांतील अधिकृत नेत्यांची राष्ट्रसभेवरील निष्ठा कायमच होती. राष्ट्रीय पक्ष क्रांतिवादी असला तरी ही क्रांती निःशस्त्र व रक्तहीन रहावी, असेच आपले धोरण त्याने ठरवून घेतले होते. हे धोरण म. गांधींच्याप्रमाणे अहिंसानिष्ठेमुळे त्यांनी स्वीकारले होते असे नाही, तर व्यवहारदृष्टीने आपणास सशस्त्र क्रांती अशक्य आहे हे ओळखून आणि थोड्याफार अंशाने ब्रिटिशांच्या दूरदृष्टीवर त्याचाही विश्वास होता म्हणून, ते त्याने स्वीकारले होते. स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण, बहिष्कार व संपूर्ण स्वातंत्र्य अशी त्याची राजकीय चतुःसूत्री होती. 'बहिष्कारयोग' या शब्दात, पुढे म. गांधींनी असहकार व सत्याग्रह या रूपाने जो जो लढावू कार्यक्रम काँग्रेसपुढे ठेवला, त्या त्या सर्वांचा अंतर्भाव लो. टिळक प्रभृति राष्ट्रीय पक्षाचे पुढारी करीत असत. यालाच ते निःशस्त्र किंवा रक्तहीन क्रांती असेही नाव देत.

हा कार्यक्रमच असा होता की तो राष्ट्रातील बहुसंख्य जनतेच्या संघटनेवर व स्वार्थत्यागावर अवलंबून होता. बहुजनसमाजात हे संघबल व त्यागबल निर्माण करण्याचा आत्मविश्वास व प्रत्यय ज्यांच्यापाशी होता अशा नेत्यांचे अग्रणी लो. टिळक हेच होत. भारतीय संस्कृतीसंबंधीचा अभिमान, बहुजनसमाजाच्या अंगच्या सुप्त सामर्थ्याचा प्रत्यय आणि ते सामर्थ्य आपल्या धैर्याने, स्वार्थत्यागाने आणि चिकाटीने जागृत करून आपण सरकारची अडवणूक व कोंडी करू आणि आपले राजकारण जनतेच्या बळावर यशस्वी करू अशी श्रद्धा - हे लो. टिळकांच्या चाळीस वर्षांच्या सार्वजनिक जीवनाचे रहस्य म्हणून सांगता येईल. हे धोरण क्रांतिकारक असले तरी ते वास्तववादी होते आणि त्याची बजावणी राष्ट्राची प्रतिनिधीभूत अशी जी काँग्रेस संस्था तिच्यामार्फतच आपण केली पाहिजे हे सूत्र त्यांनी आपल्या सार्वजनिक जीवनात केव्हाही सोडलेले नव्हते. राष्ट्रसभा हे आपले पार्लमेंट आहे व राष्ट्रातील सर्व पक्षांनी त्या संस्थेचे निर्णय मान्य केले पाहिजेत ही त्यांची निष्ठा त्यांनी अव्वलपासून अखेरपर्यंत पाळलेली होती. त्यांच्या राजकारणामागील लोकशाही वृत्तीचे व निष्ठेचे हे प्रतीक आहे.

दादाभाई नौरोजी, ना. गोखले व लो. टिळक या तिन्हीही राष्ट्रीय पुढाऱ्यांत राष्ट्रसभेसंबंधीची ही निष्ठा जशी दिसून येते, तशीच ती त्यांच्यानंतर सुमारे तीस वर्षे राष्ट्रसभेचे नेतृत्त्व करणाऱ्या म. गांधींच्या अंतःकरणातही तितक्याच तीव्रतेने किंबहुना थोड्या अधिक तीव्रतेनेच वसत होती, असे म्हणण्यास हरकत नाही. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर या राष्ट्रसभेचे रूपांतर एका पक्षात करावे, असा विचार जेव्हा काँग्रेस पुढाऱ्यांनी पुढे मांडण्यास सुरुवात केली तेव्हा त्यांनी त्या धोरणाचा पुढील जळजळीत शब्दात निषेध केला.

"The Congress has been national from its very birth in १८८५. It has never represented all parties and all Indians. Of Course, it is open






to this great national organisation any day to committ suicide by becoming a party machine. The Calamity may overtake it if God's wrath descends upon it. Nevertheless, many will be praying that such a misfortune may never befall it." (Harijan, Aug.३, १९४७)

स्वातंत्र्यप्राप्तीचा दिन निश्चित झाल्यानंतर त्या दिनापूर्वी सुमारे पंधरा दिवस त्यांनी हे उद्गार काढलेले आहेत. आपल्या राष्ट्रीय नेतृत्त्वाच्या अखेरीस त्यांनी राष्ट्रसभेसंबंधी ही जी भावना प्रकट केली आहे, तीच भावना त्यांनी तिच्यात प्रथम प्रवेश केला, तेव्हाही व्यक्त केलेली आढळते. ॲनी बेझंट यांनी स्थापन केलेल्या होमरूल लीगचे ते काही काळ अध्यक्ष होते. त्यावेळी लीग व कॉंग्रेस यांच्यातील संबंधाबद्दल ते लिहितात :

"I do not consider the Congress as a party organisation, even as the British Parliament, though it contains all parties, and has one party or other dominating it from time to time, is not a party organisation. I shall venture to hope that all parties will cherish the Congress as a national organisation providing a platform for all parties to appeal to the nation, with a view to moulding its policy and I will endeavour so to mould the policy of the League as to make the congress retain its no party character." ('Selections from Gandhi' by N.K. Bose, P. ९८)

हिंदी राजकीय स्वातंत्र्याचा लढा राष्ट्रातील जनतेची प्रतिनिधीभूत अशी जी कॉंग्रेस तिच्यामार्फत चालावा, या संस्थेचे राजकारण लोकशाही पद्धतीने चालावे, तिच्यात पोट-पक्ष स्थापन करण्याचे स्वातंत्र्य सर्वांना असावे, तिचे निर्णय बहुमताने लागावेत, तिची अधिकारसूत्रे बहुसंख्य पक्षाच्या हाती असली तरी अल्पसंख्य पक्षांच्या मतांना शक्य तो व अवश्य तितका मान द्यावा - ही तत्त्वे राष्ट्रसभेच्या घटनेत व व्यवहारात अंतर्भूत झालेली होती. हिंदी जनतेला पूज्य वाटणाऱ्या सर्व नेत्यांनी त्यांचा पुन:पुन्हा पुरस्कार केलेला होता. त्या तत्त्वांच्या विरुध्द वागणारांची त्यांनी निंदा केलेली होती. आपल्या धोरणाचे व वर्तनाचे समर्थन करतांना त्या तत्त्वांच्या कसोटीवरच त्यांनी ते समर्थन केलेले होते. अशा रीतीनें तीन-चार पिढ्यांतील कर्तृत्ववान, लोकप्रिय आणि असामान्य नेत्यांनी हिंदी जनतेच्या अंत:करणावर लोकशाही निष्ठेचे संस्कार केलेले आहेत. यामुळे येथील जनतेच्या अंत:करणात त्या निष्ठेची मुळे वरीच खोल रुजू लागली आहेत.

**अनत्याचारी क्रांती आणि लोकशाही**

१९१७ साली रशियात बोल्शेविक क्रांती झाली आणि जागतिक राजकारणात कम्युनिझमची ध्येयें व क्रांतितंत्र यांना प्रतिष्ठा प्राप्त होऊ लागली. याच वर्षी हिंदुस्थानात म. गांधींनी चंपारण्यात सत्याग्रहाचा पहिला प्रयोग केला. पहिल्या महायुद्धापासून दुसऱ्या महायुद्धाच्या अंतापर्यंत ज्या अनेक क्रांतिकारक घटना घडून आल्या, त्यात रशियन क्रांती, युरोपातील फॅसिझमची उत्पत्ती आणि अंत, कम्युनिस्ट क्रांतीतून निर्माण होत असलेली हुकुमशाही, भारतात सत्याग्रही नेतृत्त्वाने घडत असलेली अनत्याचारी क्रांती आणि चीनमधील क्रांतीला प्राप्त झालेले कम्युनिस्ट वळण या घटनांना अत्यंत महत्त्व आहे. एकंदर जगात महायुद्धें आणि रक्तपाती क्रांत्या यांचे वातावरण निर्माण झाले असल्यामुळे भारतीय राष्ट्राच्या अंत:करणात क्रांतिमार्गाचे आकर्षण निर्माण झाले असल्यास नवल नाही. दादाभाई, टिळक व गोखले यांच्या काळात असे क्रांतिकारक व हिंसक वातावरण जगातील राजकारणाला प्राप्त झाले नव्हते. तरीही भारतीय राजकारणात १९०७ पासून सशस्त्र क्रांतिवादाला तरुणांच्या अंत:करणात मानाचे स्थान मिळू लागले होते. १९१९ मध्ये जालियनवाला बागेत जे हत्याकांड ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांनी आचरिले त्यानंतर प्रागतिकांच्या सुधारणावादावर किंवा लोकमान्य टिळक प्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्यांनी उपदेशिलेल्या वहिष्कार-योगावरही राष्ट्राची निष्ठा टिकणे शक्य राहिले नाही. सशस्त्र क्रांतीचे केलेले प्रयत्नही विफल ठरलेले होते. अशा वेळी राष्ट्रात नवे चैतन्य निर्माण करणारा सत्याग्रही संदेश म. गांधींनी दिला. या वेळेपासून राष्ट्रसभेची सूत्रे एकदा जी म. गांधींच्या हाती गेली ती १९४८ च्या जानेवारीत त्यांचा वध होईपर्यंत त्यांच्याच हाती राहिली.

या काळात राष्ट्रसभेला लढावू आणि क्रांतिकारक स्वरूप प्राप्त झाले. एखाद्या क्रांतिकारक संघटनेप्रमाणे तिच्या सभासदांवर शिस्तीची बंधने लादण्यात येऊ लागली. ब्रिटिश सत्तेविरुद्ध कायदेमंडळांच्या आतून व त्यांच्या बाहेरूनही सतत राजकीय लढा चालविणारी अशी ही संस्था बनली. तिची सूत्रे एकाच नेत्याच्या हाती गोळा होऊ लागली. तिच्या संघटनेत सत्तेचे केंद्रीकरण होऊ लागले. तिच्यावर व गांधींच्यावर हुकुमशाहीचे, फॅसिझमचे आरोप होऊ लागले आणि गांधी हे एक हिटलरच




आहेत असे त्यांचे विरोधक म्हणू लागले.

या क्रांतिकालांत राष्ट्रसभेची वाढ लढावू व क्रांतिकारक संस्था या दिशेने करूनही, तिच्या अंतर्गत कारभारात लोकशाही जिवंत ठेवून, हिंदी नेत्यांच्या व जनतेच्या अंत:करणात लोकशाहीवरील निष्ठा अधिक खोल रुजविण्याचे अत्यंत विकट पण अत्यंत महत्त्वाचे कार्य म. गांधींनी करून दाखविले. परकीय साम्राज्यशाहीशी लढा देत असताना लष्करातील कडक शिस्तीप्रमाणे कठोर शिस्त स्वयंप्रेरणेने पाळणारी, पण अंतर्गत व्यवहारात सहिष्णु लोकशाही वृत्ती धारण करणारी अशी राष्ट्रसभेची संघटना वनवून तिच्यामार्फत त्यांनी तीस वर्षे शांततेचा लढा चालविला आणि ब्रिटिशांच्या हातची सार्वभौम सत्ता सर्व राष्ट्राच्या वतीने आपल्या हाती घेण्याची पात्रता व सामर्थ्य तिच्या अंगी आणले, हे म. गांधींचे राजकीय यश लेनिन किंवा डॉ. सन्यत्सेन यांच्यासारख्या सशस्त्र क्रांतिकारकांच्याहून अधिक आहे. या त्यांच्या अपूर्व यशामुळेच रशिया किंवा चीन या राष्ट्रांतील क्रांत्यांतून जशी एकपक्षीय अनियंत्रित सत्ता तेथे निर्माण झाली तशी या राष्ट्रांत निर्माण झाली नाही. या क्रांतिकालात राष्ट्रसभेला जे द्विविध स्वरूप प्राप्त झाले त्याचे वर्णन म. गांधींनी पुढील शब्दात केलेले आहे :

"Let us understand the functions of the Congress. For internal growth and administration, it is as good a democratic organisation as any to be found in the world. But this democratic organisation has been brought into being to fight the greatest Imperialist power living. For this external work, however, it has to be likened to an army. As such it ceases to be democratic."...

"Therefore the Congress conceived as a fighting machine, has to centralise control and guide every department and every Congressman, however highly placed and expect unquestioned obedience. The fight cannot be fought on any other terms."... " The Congress is the very antithesis of Fascism, because it is based on non-violence, pure and undefined. Its sanctions are all moral." -

(Selections from Gandhi, N. K. Bose P.९९)

प्रस्थापित ब्रिटिशसत्तेविरुद्ध लढण्याच्या कामी कठोर लष्करी शिस्त पाळूनही अंतर्गत व्यवहार व स्वयंविकास यासाठी पूर्ण लोकशाहीची नीती पाळणारी असे द्विविध वर्णन म. गांधींनी या कालांतील राष्ट्रसभेचे केले आहे. राष्ट्रसभेच्या शिस्तीमागे केवळ नैतिक शक्ती आहे, तिच्यामागे दंडसामर्थ्य नाही, यामुळे ती संस्था हुकुमशाही ठरत नाही असे ज्याप्रमाणे म. गांधी प्रतिपादीत असत, त्याप्रमाणे तिच्यामध्ये पोटपक्ष नांदत असतात व ते बहुमताने तिची सूत्रे आपल्या हाती घेऊ शकतात हेही त्या संस्थेच्या लोकशाही स्वरूपाचे महत्त्वाचे लक्षण आहे असे त्यांचे मत होते. लॉर्ड सॅम्युएल यांनी १९४२ साली राष्ट्रीय सभा हुकुमशाही वृत्ती धारण करून वागत आहे असा आरोप केला, तेव्हा म. गांधींनी त्यांना पुढीलप्रमाणे उत्तर दिले.

"'Totalitarian', according to the Oxford Pocket Dictionary, means 'designating a party that permits no rival loyalties or parties.' 'Totalitarian State' means 'with only one governing party.' It must have violence for its sanction for keeping control. A Congress member, on the contrary, enjoys the same freedom as the Congress President or any member of the Working Committee. There are parties within the Congress itself. Above all, the Congress eschews violence. Members render voluntary obedience. The all India Congress Committee can, at any moment, unseat the members of the Working Committee and elect others." - (Gandhi's Correspondence with the Governement, १९४२-४४, P.९०)

राष्ट्रसभेत पोटपक्ष स्थापण्यास स्वातंत्र्य असणे आणि शिस्तीमागे केवळ नैतिक शक्तीचाच आधार असणे ही दोन लक्षणे असल्यामुळे कॉंग्रेस ही सर्वंकष सत्ताकांक्षी पक्ष किंवा संस्था नसून ती लोकशाही स्वरूपाची राष्ट्रीय संस्था आहे असा म. गांधींचा युक्तिवाद आहे व तो समर्पक आहे.

सशस्त्र क्रांतिकारक संघटनेत ही दोन लक्षणे फार काळ टिकू शकत नाहीत आणि अशी संस्था एकदा सर्वसत्ताधारी बनली, म्हणजे ती लोकशाहीचा अंत करून हुकुमशाही स्थापन करते, असा अनुभव रशिया, चीन वगैरे राष्ट्रांत व फॅसिस्ट राष्ट्रांत भरपूर आलेला आहे. म. गांधींच्या समकालीन जगाचा हा इतिहास लक्षात घेतला, तर अनत्याचारी क्रांतीचे तंत्र शोधून









अनुक्रमणिका

काढून भारतीय राष्ट्राच्या अंतःकरणात उदय पावलेली लोकशाही-निष्ठा दृढमूल व चिरंतन करण्यात म. गांधींनी केवढे महत्कार्य केले आहे ते दिसून येते.

**स्वातंत्र्यातील लोकशाहीचे रक्षण**

म. गांधींनी भारताला राजकीय स्वातंत्र्याची प्राप्ती करून दिली असली, तरी त्याच्या प्राप्तीनंतर ते लवकरच निधन पावले आणि त्यांनी अखिल राष्ट्राची प्रतिनिधीभूत म्हणून वाढवलेली राष्ट्रसभा त्यांचा सल्ला व इशारा धुडकावून लावून एकपक्ष संघटना बनली. त्या एकाच पक्षाच्या हाती राष्ट्राचे सार्वभौमत्व ब्रिटिशांकडून संक्रांत झालेले होते. जनतेला ज्या एकाच संस्थेला आपली सर्व निष्ठा अर्पण करण्याची सवय तीन पिढ्यांत निर्माण झालेल्या सर्व राष्ट्रीय नेत्यांनी लाविली होती, त्या संस्थेला नेहरू, पटेल यांच्यासारख्या असामान्य नेत्यांनी राजकीय पक्ष बनविण्याचे धोरण अंमलात आणले. या परिस्थितीत राष्ट्रातील लोकशाही निष्ठा जागृत ठेवून म. गांधींनी दाखवून दिलेल्या अनत्याचारी क्रांतितंत्राचा उपयोग करून आर्थिक लोकशाहीची अथवा समाजवादाची क्रांती करण्याच्या उद्दिष्टाने भारतीय समाजवादाची संस्थापना करणारा पक्ष काँग्रेसचा त्याग करून जनतेच्या पुढे आला.

भारतीय तरुणांच्या अंतःकरणातील समाजवादी क्रांति-निष्ठेला लोकशाहीचे व अनत्याचारी वृत्तीचे वळण लावणारा हा समाजवादी पक्ष भारतात यावेळी निर्माण झाला नसता, तर दादाभाई नौरोजी, टिळक, गोखले, गांधी यांनी निर्माण केलेली लोकशाही-निष्ठा नष्ट होण्यास फार काळ लागला नसता. मग या राष्ट्रात भांडवलदार लोकशाही राज्यघटना सुस्थिर करू पाहणारा काँग्रेस पक्ष हाच एक कायदेशीरपणे वावरणारा व सर्व सत्ता आपल्याच हाती एकवटणारा पक्ष उरला असता. या एकमेव सर्वसत्ताधारी पक्षाला अत्याचारी क्रांतीने उडवून टाकू पाहणारा व त्याला सत्ताभ्रष्ट करण्यासाठी वाटेल त्या पक्षाचे व साधनाचे सहाय्य घेणारा कम्युनिस्ट हा त्याचा एकमेव प्रतिस्पर्धी पक्ष भूमिगत होऊन क्रांतिमार्ग चोखाळू लागला असता. या दोन शस्त्रधारी पक्षांच्या लढ्यात भारतीय लोकशाहीचा अंत होऊन, कोणाची तरी एकाची अनियंत्रित सत्ता पण तीही अमेरिका किंवा रशिया या परकीय सत्तांची हस्तक बनून-नांदू लागणे अटळ झाले असते. अशा प्रकारे केवळ लोकशाहीचाच नव्हे, तर आमच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचाही विनाश ओढवला असता!

ही आपत्ती टाळून आपले राष्ट्रीय वैशिष्ट्य आणि आपल्या राष्ट्रांत निर्माण झालेली अनत्याचारी क्रांतीची थोर परंपरा कायम ठेवून त्यांच्याच आधारावर आपल्या लोकशाहीचे समाजवादी लोकशाहीत परिवर्तन घडवून आणणारा पक्ष पुढे आला. भांडवलशाहीचे निर्मूलन करू पाहणारा, समाजवादी क्रांतीची दीक्षा घेतलेला, पण कम्युनिस्टांशी सख्य न करणारा हा पक्ष हेच भारतीय लोकशाहीच्या सुरक्षिततेचे व भारतात समाजवादाच्या संस्थापनेचे खरे आशास्थान आहे. या पक्षाच्या स्थापनेचा अप्रत्यक्ष परिणाम कॉंग्रेस-पक्षाच्या धोरणावरही होत आहे. जनतेपुढे मतांची याचना करताना प. नेहरूंना पुढे करून 'आम्हासही समाजवादी ध्येय मान्य आहे' अशी घोषणा या पक्षास करावी लागली. समाजवादी पक्षाचाच हा प्रभाव आहे.

परवाच झालेल्या सार्वत्रिक निवडणुकीत काँग्रेस पक्षाला एकंदर मतदानाच्या निम्म्याहून कमी मतदान झाले आणि त्या पक्षाच्या खालोखाल मतदानाचे प्रमाण समाजवादी पक्षाच्या पदरात पडले. यावरून भारतीय लोकशाहीच्या विकासात या पक्षाला महत्त्वाचे व आघाडीचे स्थान प्राप्त होत आहे असे दिसून येते. काँग्रेस पक्ष आज कितीही बलाढ्य दिसत असला तरी भ्रष्टतेने त्याचे सामर्थ्य नष्ट होत आहे आणि त्यालाही लोकशाहीचा विकास समाजवादी दिशेनेच झाला पाहिजे हे मान्य करावे लागत आहे. समाजवाद अटळ व इष्ट असला, तरी कम्युनिस्टांच्या तंत्राने तो येणार नसून त्या तंत्राचा अवलंब करण्याने हुकुमशाहीच येणार हे लोकांना पटू लागले आहे. सत्याग्रह आणि अनात्याचारी क्रांती यांचे तंत्र समाजवादी पक्ष अवलंबीत आहे व तो वाढती लोकप्रियता संपादन करीत आहे. आमच्या राष्ट्रांतील लोकशाहीची घडण करणाऱ्या या शक्ती आहेत व त्यांना आमच्या परंपरागत संस्कृतीशी अनुरूप असा आकार येत आहे.

**हिंदी राजकारणातील अष्टमूर्ती**

आधुनिक भारतात जे राजकीय स्वातंत्र्य व जी लोकशाही उदय पावली आहेत, त्यांच्या प्राप्तीचे श्रेय ज्या महान नेत्यांना देता येईल अशा आठ विभूती गेल्या साठ-पाऊणशे वर्षात होऊन गेल्या. आधुनिक भारताच्या राजकारणाचे हे आठ भाग्यविधाते आहेत असेही म्हणता येईल. राष्ट्रसभेच्या पहिल्या पहिल्या पिढीतील नेत्यांत दादाभाई नौरोजी ही असामान्य विभूती होऊन गेली व राष्ट्राने त्यांना राष्ट्रपितामह (Grand Old Man of India) अशी पदवी देऊन त्यांचा यथायोग्य गौरव केलेला आहे. भारतातील वाढत्या दारिद्र्यातून व ब्रिटिशांच्या आर्थिक शोषणांतून पुढेमागे मोठे क्रांतिकारक आंदोलन होईल किंवा हिंदी राष्ट्र तरी नामशेष होईल हे सत्य त्यांनी १८७० च्या सुमारास

ओळखले. दादाभाई हे कार्ल मार्क्सच्या नंतर सात वर्षांनी जन्मास आले आणि त्याच्यानंतर चौतीस वर्षांनी निधन पावले. मार्क्स १८१८ मध्ये जन्मला व १८८३ मध्ये मरण पावला. तो ६५ वर्षांचा होऊन वारला. दादाभाई १८२५ साली जन्मले व १९१७ साली वारले. त्यांचे वय मरणसमयी ९२ वर्षांचे होते. मार्क्सने, एक वर्ग दुसऱ्या वर्गाचे शोषण करतो व त्यातून क्रांती होणार, हे ओळखले व ती क्रांती यशस्वी करण्याचा प्रयत्न त्याने जन्मभर केला. दादाभाईंनी एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राचे रक्तशोषण केले तर त्यातून क्रांती होणार, हे जाणले आणि ही क्रांती शांततेने घडवून आणावी असे प्रयत्न दोन्ही राष्ट्रातील विचारवंत व दूरदर्शी उदार नेत्यांच्या सहाय्याने सुरू केले. पहिल्याच्या प्रयत्नांतून पुढे कम्युनिस्ट क्रांतितंत्र व हुकुमशाही यांच्या उद्भव झाला. दुसऱ्याच्या प्रयत्नामुळे, पुढे सत्याग्रही क्रांतितंत्र व समाजवादी लोकशाही अशी फळे येतील, अशी अनुकूल भूमिका निर्माण झाली.

राष्ट्रसभेच्या दुसऱ्या पिढीत लो. टिळक व ना. गोखले हे दोन थोर राजकीय नेते निघाले. त्यांनी आपापल्या तत्त्वानुसार राष्ट्रीय व प्रागतिक असे दोन राजकीय पक्ष निर्माण केले आणि हिंदी राजकारणावर आपला ठसा उमटविला. या दोघांनाही दादाभाई यांच्याबद्दल पूर्ण आदर वाटत होता आणि त्यांचेच कार्य आपण पुढे चालवित आहोत असे मानण्यात व म्हणण्यात भूषण वाटत होते. पण त्यापैकी कोणालाही दादाभाईंच्याप्रमाणे सर्वपक्षीय मान्यता मिळाली नाही.

राष्ट्रसभेच्या तिसऱ्या पिढीत म. गांधी ही एक अलौकिक व असामान्य विभूती भारतीय राजकारणाचे नेतृत्त्व करण्यास मिळाली. म. गांधी व लेनिन यांनी आपल्या राष्ट्रात क्रांती करून सर्व जगालाही क्रांतिकारक संदेश दिलेला आहे. लेनिनपेक्षा गांधी एक वर्ष आधी जन्मले आणि त्याच्यानंतर २४ वर्षांनी वारले. दोघांनीही आपापल्या राष्ट्रात क्रांतिकारक राजकारण यशस्वी केले व जगालाही एक नवे दर्शन दिले. पण लेनिनने दिलेले जीवनदर्शन त्याचे स्वतःचे नसून ते कार्ल मार्क्सचे जीवनदर्शन होते. म. गांधींनी दिलेले जीवनदर्शन त्यांचे स्वतःचे असून ते मार्क्सने दिलेल्या जीवनदर्शनाहून श्रेष्ठ आहे, हे भारतीय समाजवाद्यांना पटलेले आहे. यामुळेच भारतीय समाजवादी, गांधींनी दिलेल्या नव्या दृष्टीने, लोकशाहीच्या व समाजवादी क्रांतीच्या तत्त्वज्ञानाची फेरमांडणी करू लागले आहे. म. गांधींचे राजकीय नेतृत्त्व त्यांच्या पिढीत अद्वितीय तर ठरेलच, पण त्यांच्या पुढील तरुण पिढीतही म. गांधींच्या क्रांतिकारक नेतृत्त्वाला व त्यांच्या जीवनसंदेशाला सर्वपक्षीय मान्यता मिळत आहे. दादाभाई जसे राष्ट्राचे पितामह तसे म. गांधी स्वतंत्र भारताचे जनक व राष्ट्रपिते म्हणून ख्याती पावले आहेत.

दादाभाईंच्या पुढील पिढीत जे टिळक, गोखले असे दोन पक्षांचे दोन नेते निर्माण झाले, तसेच गांधींच्या पुढील पिढीत पं. नेहरू व साथी जयप्रकाश हे दोन असामान्य राजकीय नेते स्वतंत्र भारताला लाभलेले आहेत. त्या दोघांच्या नेतृत्त्वाखाली दोन राजकीय पक्ष स्वतंत्र भारतात संघटित होत असून, तेच दोन पक्ष भारतीय लोकशाहीचे भवितव्य ठरवून तिचा भावी आकार घडविणार आहेत. म. गांधींच्या राजकीय वारशाचे दोघेही आपापल्यापरी निधिधारक आहेत. त्या दोघांनाही त्याची जाणीव असून आपापल्या कार्यास लागणारी गुणसंपत्ती दोघांपाशीही भरपूर आहे. भारतीय लोकशाही या दोन नेत्यांच्या मार्गदर्शनाने खंबीर बनून दृढमूल व पूर्ण विकसित होऊ शकेल.

अशा प्रकारे आधुनिक भारताच्या मनावर दीर्घकाल-पर्यंत एकाच दिशेने राजकारण करून ज्यांनी आपली छाप पाडली व त्यावर संस्कार केले असे येथवर वर्णन केलेले सहाच नेते होत व त्यांना त्या अर्थाने 'भारताचे भाग्यविधाते' असे नाव देता येईल. पण या सहांच्या जोडीला आणखी दोन विभूतींचाही उल्लेख भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासात प्रतीकरूपाने केला पाहिजे. योगी अरविंद घोष आणि नेताजी सुभाषचंद्र बोस या त्या दोन विभूती होत. सतत एकाच दिशेने दीर्घकाल राजकारण करून जनतेच्या मनावर चिरंतन संस्कार करून त्याला विशिष्ट वळण लावणारे राजकीय नेते हे नव्हेत; तर राष्ट्रात आणीबाणीची क्रांतिकारक परिस्थिती प्राप्त झाली असता आकाशातील विजेप्रमाणे कडाडून उंचावर तळपणारे व अंधारात चाचपडणाऱ्या जनतेला एकदम प्रकाश देऊन तिच्या अंतःकरणात आशेचे व उत्साहाचे नवे चैतन्य भरतीस आणणारे असे हे दोन राजकीय नेते होऊन गेले. इतर कोणासही न होणारे दुर्घट कार्य स्वतःच्या आत्मविश्वासाच्या जोरावर त्यांनी आपापल्या काळात केलेले आहे व त्यांच्या त्या कार्याचा उपयोग भारतीय स्वातंत्र्याच्या संपादनकार्यांत त्या त्या वेळच्या मुत्सद्दी नेत्यांनी भरपूर करून घेतला आहे. अरविंदबाबूंनी जी प्रेरणा बंगालमध्ये १९०५ ते १९१० पर्यंत निर्माण केली तिचा उपयोग लो. टिळकांनी आपल्या राजकारणास करून घेतला आणि नेताजींनी 'आझाद हिंद सरकार' स्थापून ब्रिटिश-साम्राज्याविरुद्ध जे उघड युद्ध केले त्याचाही उपयोग राष्ट्रसभेच्या नेत्यांनी करून घेतला आहे. ब्रिटिशांच्या राजकीय धोरणावर व स्वातंत्र्यदानावरही या घटनांचा निश्चित परिणाम झालेला आहे. अशा प्रकारे भारतीय स्वातंत्र्याच्या संग्रामाकडे पाहू लागल्यास त्यात चिरंतन परिणाम

करणारे सहा नेते आणि अल्पकाल आपल्या तेजाने तळपणारे दोन प्रतापशाली नेते आपणास दिसून येतात. त्यात येथील लोकशाही निष्ठेला बद्धमूल करून तिच्या घडणीला विशिष्ट आकार लावून देणारे म्हणून पहिल्या पिढीत दादाभाई, दुसऱ्या पिढीत टिळक-गोखले, तिसऱ्या पिढीत म. गांधी व चौथ्या पिढीत पं. नेहरू व साथी जयप्रकाश अशा सहा राष्ट्रविधात्यांचा उल्लेख करावा लागेल, भारतीय लोकशाहीच्या विकासाचा वा घडणीचा इतिहास असा आहे.

**लोकशाही आणि सत्याग्रह**

भारतीय स्वातंत्र्याच्या संपादनात, लोकशाही राज्याच्या संस्थापनेत आणि त्याच्या समाजवादी विकासात सत्याग्रही तत्त्वज्ञान आणि सत्याग्रही क्रांतितंत्र यांनी फार महत्त्वाचे कार्य केलेले आहे. लोकशाहीला अहिंसेचे अधिष्ठान युरोपात देण्यात आले नाही. युरोपात लोकशाहीची उभारणी व्यक्तीच्या संग्रहबद्धीवर करण्यात आली. यामुळे हिंसावृत्ती व संग्रहबुद्धी यातून उद्‌भवणाऱ्या शक्ती आज त्या लोकशाहीचा बळी घेत आहेत. केवळ बुद्धिबलाने व सनदशीर राजकारणाने आपल्या समस्या सुटत नाहीत असा अनुभव पहिल्या महायुद्धानंतर युरोपलाही आला व भारतालाही आला. पण युरोपखंडाने बुद्धिबल व सनदशीर राजकारण यांचा त्याग करून शस्त्रक्रांती व शस्त्रयुद्ध यांचा आश्रय केला व लोकशाहीचा विध्वंस केला. याच काळात भारताने आपल्या प्रातिनिधिक राजकारणामागे जनतेची सत्याग्रहशक्ती उभी केली. यामुळे आपल्या राजकीय स्वातंत्र्याची तर समस्या सोडवून दाखविता आलीच, पण लोकशाही पद्धतीने समाजवादी क्रांती घडवून आणण्यात जे यश युरोपला संपादन करता आले ते यशही आपणास उपलब्ध झालेल्या सत्याग्रही शक्तीने आपण हस्तगत करू, असा अभिमान येथील नेत्यांना आज वाटू लागला आहे. तो सार्थ ठरणे अथवा न ठरणे हे भारतात सत्याग्रहनिष्ठा किती प्रमाणात निर्माण होऊ शकेल व त्या निष्ठेतून निर्माण होणाऱ्या शक्तीचा योग्य विनियोग करण्यास लागणारे बुद्धिचातुर्य व कार्यकौशल्य येथील नेते किती प्रमाणात दाखवतील त्यावर अवलंबून आहे. आमच्या राष्ट्रात ज्या राजकीय शक्ती स्वातंत्र्योत्तर काळात कार्य करीत आहेत, त्यातून या पक्षसंघटना निर्माण होत आहेत. त्यातील ज्या पक्षांची वाढ किंवा ऱ्हास होत आहे त्यांचे अवलोकन केल्यास आमच्या लोकशाहीसंबंधी व तिच्या समाजवादी परिवर्तनासंबंधी पूर्ण आशा निदान मला तरी वाटत आहे. तसेच भारताचे भवितव्य रशिया व चीन यांच्यापेक्षा अधिक उज्ज्वल होईल. त्यात निर्माण होणारी संस्कृती जगाला अधिक आकर्षक व स्पृहणीय वाटेल अशीही खात्री वाटू लागते. युरोपीय संस्कृतीतील लोकशाही व समाजवाद ही तत्त्वे आत्मसात करून त्यांच्या संवर्धनाचा व शुद्धीकरणाचा मार्ग भारताने शोधून काढला आहे व त्या मार्गाचे महत्त्व ओळखून भारतीय नेते त्या मार्गाने जनतेला नेऊ लागले आहेत. थोड्याच काळात आशेचा हा प्रकाश सर्वत्र फैलावू लागेल. भारताचा आपत्काल संपला असून त्याचा भाग्यकाल सुरू झाला आहे.



१९७६ साली ४२ च्या घटनादुरुस्तीमुळे धर्मनिरपेक्षता हा शब्द घटनेत समाविष्ट झाला. आपला धर्मनिरपेक्षतेचा व्यवहार यानंतरच्या काळात अधिकाधिक घसरत गेला हा योगायोग तर नव्हे! याबाबतीत अन्य साऱ्या राजकीय संघटना व पक्ष यांच्याप्रमाणेच (थोडाफार फरक राहूनही) समाजवादी वर्तुळांनीही चुका केलेल्या आहेत. याबाबतीत आत्मपरिक्षण केल्यानंतर समाजवादच भारताची निरपेक्षता इतरांच्या तुलनेत जास्त निकोपपणे संवर्धन करेल हे निश्चित.

चुकले असे, की अल्पसंख्यांकांची अस्मिता व वेगळेपणा हा जणू निरंकुश, इतिहासातीत अमरपट्टा आहे असे गृहीत धरण्यात आले. दुसरे असे की हिंदू बहुसंख्यांक जणू एक चिरेबंदी मतपेढी आहे असे मानण्याकडे वैचारिक व व्यावहारिक कल झुकू लागला. तिसरी गोष्ट म्हणजे धर्निरपेक्षतेचे मूल्य, संकल्प, व व्यवहार जोपासण्याची जबाबदारी सर्वधर्मीयांवर व धर्मसंस्थांवर समान आहे हे विसरले गेले. त्यामुळे कधी बहुसंख्यांकांच्यावर तर कधी फक्त अल्पसंख्यांकांवर ही जबाबदारी एकतर्फी लादण्यात आली किंवा गृहीत धरण्यात आली. चौथी गोष्ट म्हणजे पक्षांध राजकारणामुळे धर्मबद्ध मतपेढ्यांना अवास्तव महत्त्व देण्यात आले. आणि पाचवी गोष्ट म्हणजे सार्वजनिक जीवनात सर्वधर्मीयांचे सर्व क्षेत्रांतील सहज एकत्र उठणे-वसणे ह्या सहवास -कृती मंदावत गेल्या, याची कोणी फारशी दखल घेतली नाही, परिणामी आज निदान हिंदु-मुसलमान समाजांचा विचार केला तर त्यांच्या दैनंदिन जीवनाचा विचार करताना जवळजवळ पूर्णांशी ध्रुवीकरण झालेले आहे.

धर्मनिरपेक्षतेच्या प्रश्नासंबंधाच्या घडल्या गेलेल्या उपरोक्त चुका दुरुस्त करून धर्मनिरपेक्षतेचे सैद्धांतिक व व्यावहारिक अधिष्ठान आपल्या राष्ट्रीय जीवनाला प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य व शक्यता समाजवादाकडेच अधिक आहे, हा विश्वास टिकविला व त्याप्रमाणे व्यवहार झाला, तर भारतात समाजवादाला फार मोठे भविष्य आहे हे निश्चित.

**- राम बापट**

(साधना, १० ऑगस्ट २००२)

अनुक्रमणिका








# भारतातील लोकशाहीची वाटचाल

प्रा. नारायण देशपांडे

(नवभारत जून १९५२)

सार्वत्रिक निवडणुका संपून नव्या घटनेप्रमाणे मध्यवर्ती सरकारात व घटकराज्यांमध्ये नव्या मंत्रिमंडळाचा बनाव पुरा झाला असल्यामुळे, स्वातंत्र्योत्तर काळातील राजकीय प्रगतीचा एक निश्चित टप्पा भारताने गाठला आहे. या देशाच्या राजकीय परिस्थितीचे समालोचन करण्यास ही वेळ योग्य ठरेल.

### निवडणुकांचे महत्त्व

गेल्या सार्वत्रिक निवडणुका लोकशाही राज्यपद्धतीच्या इतिहासातील एक मोठा प्रयोग म्हणून महत्त्व पावल्या आहेत. केवळ संख्यादृष्टीनेच विचार केला तरीसुद्धा जवळ जवळ १८ कोटी मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्याची संधी देणाऱ्या या निवडणुका जगातल्या इतर देशांशी तुलना करता अभूतपूर्वच होत. त्यातून हे मतदार बहुसंख्येने अशिक्षित, अडाणी व स्वतःच्या हक्कांबद्दल उदासीन आहेत ही गोष्ट जमेस धरली, म्हणजे लोकशाही कार्यपद्धतीस अनभिज्ञ अशा या समाजामध्ये लोकसत्तात्मक राज्यतंत्राचा वापर कसा होतो, याबद्दल आशंकायुक्त कुतूहल वाटणे अपरिहार्य होते. दीर्घकालीन पारतंत्र्यामधून मुक्त झालेल्या, पण आर्थिक व सामाजिक दृष्ट्या अप्रगत अशा राष्ट्रामध्ये लोकशाही राज्यपद्धती रुजू शकेल की नाही हा आज विचारवंतांना बिकट प्रश्न पडलेला आहे. या प्रश्नाच्या उत्तराची दिशा दाखविण्याच्या दृष्टीनेही अनेक पाश्चात्त्य विचारवंत आज भारतातील लोकशाहीच्या प्रयोगाकडे मोठ्या अपेक्षेने पाहत आहेत. या प्रयोगाचा मोठा भाग म्हणून या निवडणुकांबद्दल त्यांना स्वाभाविकच कुतूहल होते.

नव्या राज्यघटनेप्रमाणे भारतीय राजकारणात निवडणुकांना अतिशय महत्त्व आहे. सार्वत्रिक निवडणुका या सार्वभौम लोकसत्ताक गणराज्याच्या पायाभूत होत. घटनेप्रमाणे या देशातील अंतिम राजकीय सत्ता जनतेच्या आधीन आहे; पण ही सत्ता गाजविण्याचा एकच मार्ग जनतेला उपलब्ध आहे व तो म्हणजे निवडणुकीतील मतदान हा होय. कोणत्याही महत्त्वाच्या प्रश्नावर आपले मत प्रभावी रीतीने व्यक्त करण्याची संधी घटनेप्रमाणे जनतेला फक्त निवडणुकीच्या द्वारा मिळणार असल्यामुळे, या देशाच्या राज्यकारभारामध्ये निवडणुकांना अतिशय महत्त्व आहे. अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नांवर जनमताचा कौल घेण्यासाठी सार्वत्रिक निवडणुका करविण्याचा लोकशाही राज्यपद्धतीतील प्रघात आहे तो निवडणुकांचे महत्त्व दर्शविणारा आहे.

भारताच्या इतिहासामध्ये प्रांतिक विधिमंडळासाठी १९४५-४६ साली ज्या निवडणुका झाल्या त्यानंतर अत्यंत महत्त्वाच्या अशा काही घटना घडल्या. परंतु त्याबद्दल जनमताचा कौल घेण्यात आलाच नाही. देशाची फाळणी व राजकीय सत्तांतर, नव्या राज्यघटनेचा बनाव, हिंदी संस्थानांचे सामीलीकरण वा संघीकरण, राष्ट्रकुटुंबाचे सभासदत्व इत्यादि प्रश्नांबद्दल नागरिकांना निर्णायक मत देण्याची संधीच गेल्या सहा वर्षांत मिळाली नाही. त्यामुळे नव्या घटनेनुसार प्रथमच झालेल्या सार्वत्रिक निवडणुकांमध्ये गेल्या सहा वर्षांतील सर्व घटनांवर जनमताचे शिक्कामोर्तब व्हावयाचे असल्यामुळे, त्या दृष्टिनेही या निवडणुकांना महत्त्व होते.

### निवडणुक यंत्रणेचे यश

परवाच्या सार्वत्रिक निवडणुका अत्यंत शिस्तीने, शांततेने व व्यवस्थित रीतीने पार पडल्या, ही गोष्ट आज सर्वमान्य झाली आहे. राज्यघटनेप्रमाणे निर्मिलेली निवडणूक यंत्रणा ही पुष्कळच यशस्वी ठरली आहे. मध्यवर्ती निवडणूक-अधिकारी व त्यांचे सहकारी यांच्या कामगिरीबद्दल बहुतेक पक्ष-पुढाऱ्यांनी समाधानच व्यक्त केले आहे. निवडणुकीच्यावेळी काही किरकोळ अपवाद सोडल्यास अयोग्य प्रकार घडले नाहीत. काही भागांमध्ये निवडणुका शांततेने पार पडतील की नाही याबद्दल शंका वाटत होती ती अस्थानी ठरली. गेली दोन वर्षे निवडणूक-अधिकाऱ्यांनी जी पूर्वतयारी चालविली होती ती योग्य तऱ्हेने कामास आली. या अनुभवामुळे एक गोष्ट स्पष्ट झाली की, मतदारांची संख्या मोठी असूनही योग्य तजवीज केली तर सार्वत्रिक निवडणुका सुव्यवस्थित व शिस्तबद्ध रीतीने होऊ शकतात.

निवडणुकीमध्ये आपल्या अपेक्षेपेक्षा जास्त संख्येने मतदान झाले. असे बहुतेक पक्षांच्या कार्यकर्त्यांनी मत व्यक्त







अनुक्रमणिका

केले आहे. निवडणूक केंद्राची सोयिस्कर योजना हे याचे एक कारण होते. मतदान केंद्रांची संख्या वाढवून प्रत्येक केंद्राचे भौगोलिक क्षेत्र मर्यादित केल्यामुळे मतदारांची पुष्कळच सोय झाली. याशिवाय राजकीय पक्षांच्या प्रचारामुळेही मतदानाचे प्रमाण वाढण्यास पुष्कळच मदत झाली. या देशातील राजकीय पक्षसंघटना अजूनही अप्रगत अवस्थेमध्ये आहेत. त्यामुळे प्रत्येक मतदारसंघाच्या कानाकोपऱ्यातून पक्षसंघटनांचा प्रसार झालेला नाही हे खरे. पण अनेक पक्षांनी या निवडणुकांत भाग घेतला व शिवाय स्वतंत्र उमेदवारही मोठ्या संख्येने निवडणूक लढवीत होते, त्यामुळे देशाचा कोणताच भाग निवडणुकीच्या प्रचारापासून अलिप्त राहू शकला नाही आणि विशेष समाधानाची गोष्ट अशी की, निवडणुकीचा प्रचार सभांमधून व वर्तमानपत्रातून वरच्या पातळीवर चालू होता.

निवडणूक अधिकाऱ्यांचे काम समाधानकारक होते व एकंदर निवडणुकीची व्यवस्था चांगली होती ही गोष्ट सर्वमान्य होईल. पण या व्यवस्थेमध्ये काही गैरप्रकार होण्याची शक्यता आहे अशा संशयालासुद्धा जागा राहणार नाही, या दृष्टीने काही उपाय निवडणूक अधिकाऱ्यांनी पुढील वेळेला योजिले पाहिजेत. मतपेटी सील न फोडता उघडता येत असेल तर मतदान संपल्यापासून मत मोजणीपर्यंतच्या कालांत हा गैरवाजवी प्रकार होण्याच्या शक्यतेबद्दलचा संशय वाढतो. असा संशय राहू नये यासाठी प्रत्येक मतदान केंद्रावर मतदान संपल्याबरोबर लगेचच उमेदवारांच्या प्रतिनिधींसमक्ष मतपेट्या फोडून मतमोजणी करण्यात यावी, अशी एक सूचना करावीशी वाटते. असे झाल्यास मतपेट्या हालविण्याचा त्रास व वेळ वाचेल. शिवाय मतपेट्यांबाबत अधिकाऱ्यांकडून हातचलाखी होते अशा शंकेला वावच मिळणार नाही.

### मतदानसंघांचा बनाव व मतदानपद्धती

निवडणूक व्यवस्थेच्या समाधानकारकपणाबद्दल विविध पक्षांत एकमत होणे शक्य होईल, पण मतदान पद्धतीबद्दल मात्र तीव्र मतभेद आहेत व परवाच्या निवडणुकीमध्ये ज्या पद्धतीचा अवलंब करण्यात आला होता त्याबद्दल पुष्कळसा असंतोषही आहे. निवडणुकीचे निकाल पाहिले म्हणजे या असंतोषाचे कारण सहज ध्यानात येते. प्रमुख राजकीय पक्षांना निवडणुकीमध्ये मिळालेल्या मतांचे प्रमाण व लोकसभा आणि राज्यविधानसभा यामध्ये मिळालेल्या जागांचे प्रमाण यांची तुलना खालील कोष्टकावरून करता येईल. अशी तुलना केली तर आपणास असे आढळते की, या दोन प्रमाणांमध्ये अन्योन्यसंबंध काही लागू शकत नाही.

| | पक्षाचे नाव | लोकसभा | | राज्यविधानसभा | |
|---|---|---|---|---|---|
| | | मतदानप्रमाण (शे. टक्के) | मिळालेल्या जागांचे प्रमाण | मतदानप्रमाण (शे. टक्के) | मिळालेल्या जागांचे प्रमाण |
| १ | काँग्रेस | ४४.४७ | ७४ | ४३.६ | ६८.५ |
| २ | साम्यवादी | ५.४४ | ५.५ | ४.३ | ५.५ |
| ३ | समाजवादी | १०.२३ | २.५ | ७.७ | ३.८ |
| ४ | कि.म. प्रजापक्ष | ५.२६ | २ | ४ | २.३ |
| ५ | जनसंघ, हिंदुसभा व रामराज्य-परिषद | ३.८ | २ | २.४ | २.६ |
| ६ | शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन | २.२ | ०.४ | १.४ | ०.३ |
| ७ | स्थानिक पक्ष | ९.५४ | ५ | १०.५ | ८ |
| ८ | स्वतंत्र | १४.४ | ७.३ | १९.७ | ६.८ |

काँग्रेसपक्षाला निवडणुकांमध्ये शे. ४३-४४ टक्के मते मिळूनसुद्धा लोकसभेमध्ये व विधानसभांमध्ये एकूण सभासदांपैकी दोन तृतीयांशापेक्षा जास्त सभासद काँग्रेस पक्षाचे निवडून आले. याउलट समाजवादी पक्षाला लोकसभेच्या निवडणुकीत शे. १० पेक्षा जास्त मते मिळूनही त्यांच्या पक्षाला फक्त शे. २.५ एवढ्याच जागा लोकसभेमध्ये मिळाल्या. भारतीय राज्यघटनेप्रमाणे जी मतदानपद्धती पुरस्कारलेली आहे तीमध्ये अल्पसंख्यांक पक्षांना अन्याय होतो या तक्रारीला वरीलप्रमाणे आधार सापडतो. जनतेमधील मतप्रवाह यथायोग्य रीतीने विधिमंडळामध्ये प्रतिबिंबित होण्याच्या दृष्टीने ही एकजागा - मतदार - पद्धती उपयोगी पडू शकत नाही. अनेक पक्ष निवडणुका लढवीत असल्यास एकूण मतदानामध्ये निश्चित बहुमत मिळाले नसतानाही एखादा पक्ष विधिमंडळातील बहुतेक जागा मिळवू शकतो हे परवाच्या निवडणुकांनी पुनः सिद्ध केले आहे.

प्रचलित मतदान पद्धतीमुळे अल्पमतवाल्या पक्षांना अन्याय होतो असे असूनसुद्धा या पद्धतीऐवजी दुसरी कोणती पद्धत स्वीकारावी याबद्दल टीकाकारांमध्ये अजून एकमत नाही. किंबहुना पर्याय म्हणून दुसऱ्या कोणत्या मतदान पद्धतीचा फारसा गंभीरपणे अजून विचारच झालेला नाही. पाश्चात्त्य देशांप्रमाणेच आपल्या देशातही काही विचारवंत प्रमाणशीर प्रतिनिधित्वाच्या पद्धतीचा पुरस्कार करतात. पण या देशात त्या पद्धतीचा स्वीकार करण्यामध्ये अनेक व्यावहारिक अडचणी येतील, म्हणून विरोधी राजकीय पक्षसुद्धा या पद्धतीचा पुरस्कार करीत नाहीत. एकेका मतदारसंघातून अनेक उमेदवार निवडण्याची योजना करून मतदाराला आपली सर्वच्या सर्व मते एकाच उमेदवाराला देण्याची सवलत ठेवली, तर काही अल्पमतवाले पक्ष आपली सर्व शक्ती ठरावीक उमेदवारावर केंद्रित करून काही जागा निश्चित जिंकू शकतील. अल्पमतवाल्या पक्षांना प्रतिनिधित्व देण्याचा हा एक रूढ मार्ग आहे व याचा पुरस्कार या देशामध्ये काही लोक करतात. परंतु प्रमाणशीर प्रतिनिधित्व किंवा समुच्चय मतदानपद्धती या दोन्ही पद्धतींमध्ये अनेक जागा-मतदारसंघ अपरिहार्य बनतो व मतदारसंघाचे क्षेत्र आहे यापेक्षा विस्तृत होऊन एकेका उमेदवाराला न झेपण्याएवढ्या मतदारसंघामध्ये निवडणूक लढवावी लागते. अर्थात, अशा रीतीने निवडणूक लढविण्याचे सामर्थ्य व्यक्तीमध्ये तर नसतेच, पण पुष्कळशा राजकीय पक्षांनाही हे काम अवघड असते. लोकसभेची निवडणूक अप्रत्यक्ष पद्धतीने करावयाची असेल, तरच मतदारसंघाच्या क्षेत्राबाबतच्या अडचणी दूर होऊ शकतील. पण आज तरी असा बदल करण्याला लोकमत अनुकूल नाही. तेव्हा प्राप्त परिस्थितीमध्ये दुसरा इष्टतर पर्याय नाही, म्हणून चालू मतदानपद्धती व एकजागामतदारसंघ हेच गृहीत धरून चालणे अपरिहार्य आहे.

### सार्वत्रिक निवडणुकांचा अन्वयार्थ

परवाच्या निवडणुकांच्या निकालाचा अन्वयार्थ लावणे हे काम दुर्घट आहे. कारण मतदारांची निवडणुकीबाबतची प्रतिक्रिया घटकराज्यानुसार वेगवेगळी आढळते. लोकसभा व बहुतेक घटकराज्यांच्या विधानसभा यांच्या निवडणुकीमध्ये काँग्रेसपक्षाने निर्विवाद विजय मिळविला आहे. दक्षिणेकडील त्रावणकोर-कोचीन व मद्रास आणि उत्तरेकडील पतियाळा आणि पूर्व पंजाब संस्थानी संघ या तीन घटकराज्यांमध्ये काँग्रेसला हुकमी बहुमत मिळाले नाही; पण या तिन्ही ठिकाणी दुसऱ्या कोणत्याच पक्षाला बहुमत मिळाले नाही हेही तितकेच खरे आहे. एकंदर मतदान लक्षात घेता काँग्रेसपक्षाला देशामध्ये बहुमत नाही या गोष्टीवर काँग्रेसचे विरोधक भर देतात व काँग्रेसचे सरकार बहुमताला अमान्य आहे असा निष्कर्ष काढतात. याउलट काँग्रेसवर जनतेने विश्वास व्यक्त केला असून पुढील पाच वर्षे या देशाचा राज्यकारभार काँग्रेसच्या मतप्रणालीप्रमाणे चालावा असा निर्णय दिला आहे असे काँग्रेसचे लोक म्हणतात. याप्रमाणे निवडणुकीच्या निकालाचा जो तो आपापल्यापरीने अन्वयार्थ लावतो. वस्तुस्थिती अशी आहे की, देशातील लोकमतापैकी शे. ४४-४५ टक्के लोकांनीच काँग्रेसला मते दिली हे खरे असले तरी बाकीच्या पक्षांना फारच कमी प्रमाणात मते मिळाली आहेत. ही गोष्ट विचारात घेतली म्हणजे निवडणुकीच्या निकालाचे विश्लेषण करताना काँग्रेसच्या ४४ टक्के मतांविरुद्ध बिगर काँग्रेसची ५६ टक्के मते असे समीकरण मांडता येणार नाही; तर काँग्रेस ४४%, समाजवादी १०%, साम्यवादी ५% इ. याप्रमाणे जनमताचा पाठिंबा कोणत्या पक्षाला किती प्रमाणात आहे असा विचार करावा लागेल आणि जोपर्यंत काँग्रेसविरोधी सर्व पक्ष एकत्रित होऊन त्यांचे बहुमत होत नाही तोपर्यंत काँग्रेसपक्षाला सरकार बनविण्याचा अधिकार आहे ही गोष्ट मान्य केली पाहिजे.

कायदे करण्यासाठी जनतेने आपले प्रतिनिधी निवडून कायदेमंडळामध्ये पाठवावयाचे हा निवडणुकांचा औपचारिक उद्देश असला तरी, आज प्रत्यक्ष व्यवहारमध्ये तो मुख्य उद्देश राहिलेला नाही. ज्या देशामध्ये जबाबदार राज्यपद्धती रूढ आहे, तेथे निवडणुकांचा मुख्य उद्देश नवे सरकार अधिकारावर आणण्याचा असतो. पुढील निवडणुकीपर्यंत कोणत्या पक्षाने राज्याचा कारभार चालवावयाचा हा निर्णय सार्वत्रिक

निवडणुकांच्या आधाराने घेतला जातो. या दृष्टीने भारतातील पहिल्या निवडणुकांचे निकाल पाहता असा निष्कर्ष निघू शकेल की, काँग्रेसच्या कारभाराबद्दल काही बराच असंतोष आहे, पण राज्यकारभाराची धुरा काँग्रेसकडून काढून दुसऱ्या कोणत्या पक्षाकडे सोपवावी, इतका जनतेचा विश्वास अद्याप दुसऱ्या कोणत्याच राजकीय पक्षाने संपादन केलेला नाही. समाजवादी पक्षाबद्दल विरोधी पक्ष या दृष्टीने निवडणुकीपूर्वी बऱ्याच अपेक्षा होत्या. पण सरकारी कारभाराची धुरा स्वीकारण्यास हा पक्ष समर्थ आहे असा जनतेला अजून विश्वास वाटत नाही, हेच या निवडणुकीवरून अनुमान निघते.

नवीन सरकार बनविण्यासाठीच या निवडणुका होत्या, या दृष्टीने जनतेने मतदान केले असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. निवडणुकांसाठी जे जाहीरनामे राजकीय पक्षांनी प्रसिद्ध केले होते व ज्या घोषणा मतदारांना ऐकविल्या होत्या, त्यांचा प्रत्यक्ष मतदानावर फारसा परिणाम झालेला दिसत नाही. एक तर जाहीरनाम्यांतील कार्यक्रम वा घोषणा यांचा विचार करून मत बनविण्याइतकी राजकीय जागृती आपल्या मतदारांकडून अपेक्षिणे चूक ठरेल. शिवाय निवडणुकांच्यावेळी राजकीय पक्षांनी जो प्रचार केला त्यामध्ये स्वत:चा कार्यक्रम व घोषणा यांवर फारसा भर दिला नसून अधिकाररूढ पक्षांच्या चुका व उणिवा दाखविण्यावर किंवा त्यांच्या राज्यकारभाराचे समर्थन करण्यावरच मुख्य भर देण्यात आला होता. काँग्रेसपक्षाची भूमिका आत्मसमर्थनाची होती; याउलट विरोधी पक्ष काँग्रेसच्या राज्यकारभारातील नालायकी, वशिलेबाजी, लाचलुचपत, कार्यक्षमतेचा अभाव इत्यादि गोष्टींवर भर देत होते. जमीनदारी पद्धतीचे उच्चाटन, औद्योगीकरण, भाषावार प्रांतरचना, भारताचे स्वतंत्र परराष्ट्रीय धोरण वगैरे कार्यक्रमाचा निवडणुकीच्या जाहीरनाम्यात समावेश करण्यात आला होता. पण या प्रश्नांची निवडणुकीच्यावेळी सांगोपांग चर्चाही झाली नाही. या प्रश्नांच्या स्वरूपाबद्दल बहुसंख्य मतदारांना अजून काहीच कल्पना आलेली नाही. जनतेचे जिव्हाळ्याचे प्रश्न म्हणजे अन्नधान्यपुरवठा, महागाई, रेशन-व्यवस्था वगैरे होत. या बाबतीत काँग्रेसच्या राज्यकारभाराबद्दल असंतोष असूनही मतदारांनी बहुमताने काँग्रेसच्या बाजूने कौल दिला. कारण स्थिर स्वरूपात सरकारचा कारभार चालविण्याची धमक काँग्रेसजवळ आहे, ती इतर पक्षांजवळ नाही, असा जनतेचा समज हेच होय. कायद्याची अंमलबजावणी करून शांतता व सुव्यवस्था राखणे ही सरकारची प्राथमिक कर्तव्ये होत ही लोकांना जाणीव असून, ही कर्तव्ये पार पाडू शकेल असे सरकार बनविण्याला त्यातल्या त्यात समर्थ असलेल्या पक्षाला जनतेने अधिकार दिला, हाच या निवडणुकांचा आशय समजता येईल.

लोकशाही राजवटीमध्ये जनतेला राजकीयदृष्ट्या सज्ञान करणे हा निवडणुकांचा हेतू असतो. भारतासारख्या अशिक्षित मतदारांच्या देशात निवडणुकांचे हे कार्य जास्तच महत्त्वाचे असते. कारण राजकीय जागृती फैलावण्याचे निवडणुका हेच मोठे साधन असते. या साधनाचा योग्य रीतीने उपयोग करण्याची जबाबदारी बव्हंशी निवडणुका लढविणाऱ्या राजकीय पक्षसंघटनांवर पडते. मतदानाच्या हक्काचे महत्त्व व तो हक्क बजावण्याची आवश्यकता मतदारांच्या मनावर बिंबवणे हा या राजकीय शिक्षणाचा पहिला धडा होय. हा धडा भारतीय मतदारांना शिकविण्याचा प्रयत्न बहुतेक राजकीय पक्षांनी या निवडणुकीच्यावेळी केला आणि मतदारांनीही तो पुष्कळशा समाधानकारक प्रमाणात आत्मसात केला, असे मतदानाच्या एकूण प्रमाणावरून दिसते. सामान्य जनतेची या निवडणुकी-बाबतची प्रतिक्रिया पुष्कळच उत्साहजनक होती आणि त्यादृष्टीने या देशातल्या लोकशाही राज्यपद्धतीच्या व्यवहाराबाबतची सुरुवात यशस्वी रीतीने करण्याला जनतेने हातभार लावला आहे.

### लोकशाही राज्यव्यवहारातील अडथळे

निवडणुकांच्या एकंदर कारवाईबद्दल समाधान वाटण्याजोगी परिस्थिती असली तरी केवळ तेवढ्यावरून या देशातील लोकशाहीची वाटचाल योग्य दिशेने सुरू झाली आहे असे म्हणता येणार नाही. निवडणुकीनंतरच्या परिस्थितीत भारतीय राजकारणाचा व्यवहार कशा पद्धतीने चालतो आणि त्यामध्ये राजकीय पक्षांचे धोरण व कार्य किती प्रमाणात लोकशाही प्रवृत्तींना पोषक ठरते यावर भारतीय लोकशाहीचे भवितव्य ठरणार आहे. भारताची राज्यघटना बनविणाऱ्यांनी इंग्लंडची राज्यपद्धती व व्यवहार हे या देशासाठी आदर्श म्हणून स्वीकारले आहेत. संघराज्य व घटकराज्ये यांच्या सरकारांचा बनाव व कार्यपद्धती ही बव्हंशी इंग्लडमधील सरकारचा बनाव व कार्यपद्धतीप्रमाणे घटनेने योजिलेली आहेत. निवडणुका संपल्यानंतर संघराज्य व घटकराज्ये यांच्या मंत्रिमंडळाची स्थापना झाली ती घटनेप्रमाणेच झाली. पण इंग्लंडमधील राज्यपद्धतीचे वैशिष्ट्य म्हणून असे सांगण्यात येते की, राजकीय व्यवहाराबद्दल अलिखित संकेत व परंपराप्रामाण्य यांना तेथे अतिशय महत्त्व असून ते कसोशीने पाळण्याबद्दल त्या देशातील राजकीय पक्ष व जनता यांचा कटाक्ष असतो. राज्यघटनेप्रमाणे औपचारिक लोकशाही पद्धती निर्मिली असली, तरी लोकांमध्ये






अनुक्रमणिका

लोकशाही प्रवृत्ति रुजविण्यासाठी पोषक अशा व्यवहाराची परंपरा निर्माण झाल्याशिवाय लोकशाही मूळ धरू शकत नाही, असा इतिहासाचा दाखला आहे. या दृष्टीने नवीन घटनेप्रमाणे राज्यकारभार सुरू झाल्यावर प्रथमपासूनच लोकशाही व्यवहाराची परंपरा निर्माण करण्याबद्दल सर्व राजकीय पक्षांनी खबरदारी घेतली पाहिजे व जनतेनेही त्याबाबत जागरूक राहिले पाहिजे.

गेल्या एक-दोन महिन्यांतील घडामोडींचे समालोचन केले तर असे आढळते की, या देशातील राजकीय पक्ष अशा लोकशाही परंपरा निर्माण करण्याबद्दल फारसे उत्सुक नाहीत. आज काँग्रेस पक्ष या देशामधील बलिष्ठ पक्ष असून संघराज्य व घटकराज्ये या दोन्ही क्षेत्रात याच पक्षाच्या हाती सत्ता असल्यामुळे, राज्यव्यवहारामध्ये लोकशाही पद्धतीच्या परंपरा निर्माण करण्याची मुख्य जबाबदारी काँग्रेस पक्षावर आहे. या पक्षाच्या हाती भारतीय जनतेने अधिकारसूत्रे दिली आहेत व श्री. नेहरू प्रभृति काँग्रेस पुढारी या देशाचा कारभार लोकशाही पद्धतीने चालवितील अशी जनतेची अपेक्षाही आहे. परंतु घटकराज्यांमधील मंत्रिमंडळाचे बनाव व राज्यपालांच्या नेमणुका या व्यवहारांमध्ये जे धोरण काँग्रेस सरकारने स्वीकारले त्यामुळे जनतेची अपेक्षा पुरी होईल की नाही याबद्दल संदेह निर्माण होतो.

मद्रास राज्यामध्ये काँग्रेसपक्षाला निश्चित बहुमत मिळाले नाही. काँग्रेसला अधिकार स्वीकार करता येईल की नाही याबद्दल अनिश्चितता वाटू लागली. त्यात पुनः पक्षनेतृत्त्वाबद्दल काँग्रेसपक्षात मतभेद झाल्यामुळे पक्षाचे भवितव्यच धोक्यात आले. अशावेळी श्री. राजगोपालाचारी यांची मद्रास-विधान-परिषदेमध्ये नेमणूक करून राज्यपालांनी राजगोपालाचारी यांना काँग्रेसपक्षाचे नेतृत्व घेणे सुलभ करून दिले व नंतर त्यांनाच मंत्रिमंडळ बनविण्यास सांगून मद्रासमध्ये काँग्रेसपक्षाच्या हाती अधिकारसूत्रे दिली. घटकराज्यांच्या विधानपरिषदेमध्ये राज्यपालाला १२ पर्यंत सभासद नेमण्याचा अधिकार घटनेने दिला आहे. परंतु कलम १७१ (५) प्रमाणे हे सभासद साहित्य, शास्त्र, कला, सहकारी चळवळ व समाजसेवा यात विशेष मान असलेले किंवा व्यावहारिक अनुभव असलेले पाहिजेत. श्री. राजगोपालाचारी यांची नेमणूक या कलमाप्रमाणे समर्थनीय ठरत नाही. अर्थात शब्दाचे अर्थ दूरान्वयाने लावूनच फार तर या नेमणुकीचे समर्थन करता येईल. पण ही नेमणूक करताना घटनेच्या आशयाकडे कानाडोळा करून पक्षहिताला प्राधान्य मिळाले ही गोष्ट उघड आहे. याशिवाय विरोधी पक्षप्रमुख श्री. प्रकाशम् यांनी राज्यपालांकडे आपल्या पक्षाचे बहुमत आहे अशा अर्थाचे जे परिपत्रक दिले होते त्याला समाधानकारक उत्तर न देताच काँग्रेसला मंत्रिमंडळ बनविण्याचा राज्यपालांनी आदेश दिला याही बाबतीत त्यांनी घाई केली असे म्हणण्यास वाव मिळतो.

मुंबईमध्ये श्री. मुरारजी देसाई हे एका मतदार संघातून पराभूत झाले असता त्यांना काँग्रेसपक्षाचे नेतृत्त्व देऊन मुख्यमंत्रीपद देण्यात आले यामध्ये घटनाभंग झाली नाही हे खरे. पण परंपरा या दृष्टीने ही गोष्ट चांगली नाही असे म्हणणे भाग आहे.

मंत्रिमंडळाच्या बनावाबाबत आणखी एका घटनेचा उल्लेख या ठिकाणी करावासा वाटतो. पतियाळा व पूर्व पंजाब संस्थानी संघराज्यामध्ये काँग्रेस मंत्रिमंडळाने राजीनामा दिल्यानंतर विरोधी पक्षप्रमुखाला मंत्रिमंडळ बनविण्याचा आदेश राजप्रमुखांनी दिला. परंतु विरोधी पक्षाच्या पुढाऱ्यांसमवेत राजप्रमुख दिल्लीला जाऊन मध्यवर्ती सरकारच्या संस्थान-खात्याबरोबर मंत्रिमंडळातील मंत्र्यांची संख्या व सभासद वगैरे बावतीत त्यांनी चर्चा केली, अशी बातमी प्रसिद्ध झाली होती. ही बातमी जर खरी असेल, तर घटनेमध्ये दहा वर्षेपर्यंत 'ब' वर्गीय राज्यावर सामान्य नियंत्रण ठेवण्याचा मध्यवर्ती सरकारला ज्या कलमान्वये अधिकार देण्यात आला आहे त्या ३७१ व्या कलमाच्या आशयाची ही अतिव्याप्ती होत आहे असे वाटल्याशिवाय राहत नाही. एखाद्या घटकराज्यामध्ये विरोधी पक्ष अधिकारावर आल्यास त्या राज्याशी मध्यवर्ती सरकारचे धोरण कसे राहते हा भारतीय संघराज्याच्या घटनेचा निकष आहे. विरोधी पक्षाच्या सरकारवर मध्यवर्ती सरकार मंत्रिमंडळाच्या बनावासारख्या गोष्टीतही नियंत्रण चालवू लागेल, तर घटकराज्यांची स्वायत्तता अगदीच तकलुपी ठरेल! पेप्सूच्या नव्या मंत्रिमंडळाबाबत मध्यवर्ती सरकारची ढवळाढवळ ही संघराज्ये व घटकराज्ये यांच्या संबंधाबाबत एका अनिष्ट परंपरेची सुरुवात ठरण्याचा संभव आहे.

राज्यपालांची नेमणूक करतानासुद्धा काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी घटनेच्या आशयाचे अतिक्रमण केले आहे. राज्यपालांची प्रांतातील जनतेने निवडणूक करावी अशी घटनासमितीने प्रथम योजना ठरविली होती. परंतु नंतर त्यामध्ये बदल होऊन राष्ट्रपतीकडून राज्यपालांची नेमणूक व्हावी असे ठरविण्यात आले. या बदलाचे समर्थन करताना घटनासमितीमध्ये असे सांगण्यात आले की, राज्यपाल हा शक्य तो पक्षविशिष्ट राजकारणापासून अलिप्त असेल. त्याप्रमाणे एखादा अनुभवी पण निवृत्त प्रशासक, स्वतःच्या कार्यक्षेत्रामध्ये प्राविण्य

मिळविलेला व जनतेचा विश्वास संपादन केलेला स्वतंत्र वृत्तीचा नागरिक राज्यपाल म्हणून नेमण्यात येईल, अशी अपेक्षा होती. परंतु आतापर्यंत राज्यपालांच्या ज्या नेमणुका झाल्या आहेत, त्यावरून आपल्याच पक्षांतील कार्यकर्त्यांची अधिकारपदावर वर्णी लावण्याचा एक मार्ग म्हणून यापैकी बऱ्याच नेमणुका करण्याची प्रवृत्ती अधिकाररूढ पक्षांमध्ये दिसून येते. विशेषतः सार्वत्रिक निवडणुकांमध्ये पराभूत झालेल्या पक्षीय उमेदवारांची राज्यपाल म्हणून नेमणूक करणे ही अनिष्ट परंपरा आहे.

गेल्या दोन महिन्यांमध्ये लोकशाही पद्धतीच्या राज्यव्यवहाराच्या दृष्टीने ज्या दोन-तीन घटना अनिष्ट वाटल्या त्यांचा उदाहरणादाखल येथे वर उल्लेख केला आहे. पक्षसंघटना व पक्षहित यांवर भर देऊन निर्णय घेण्याची प्रवृत्ती अधिकाररूढ पक्षामध्ये प्रभावी आहे हे यावरून दिसते. आणि पक्षहित म्हणजेच राष्ट्रहित अशा तऱ्हेचे सर्वंकष समीकरण मांडून पक्षाच्या धोरणाचे व निर्णयाचे समर्थन करण्यात येते. ही वृत्ती अर्थातच लोकशाही पद्धतीला पोषक नाही.

विरोधी पक्षांचे राज्यव्यवहारातले धोरण हेहि फारसे आशादायक नाही. विरोधासाठी विरोध हे बहुतेक विरोधी पक्षांच्या धोरणांचे सार आहे. निवडणुकांनंतर लोकसभा व विधानसभा यांच्या कामकाजास सुरुवात झाल्याबरोबर सभात्याग व असहकार इत्यादि मार्गांचा अवलंब विरोधी पक्षांनी केला. यामध्ये प्रदर्शनी वृत्ती असली तरी ही पद्धती नकारात्मकच आहे. घटनेच्या मर्यादेमध्ये राहूनच कार्य करावयाचे असे नैतिक बंधन निष्ठेने पाळण्याची विरोधी पक्षांची प्रवृत्ती नाही आणि ही परिस्थिती आहे तोपर्यंत घटनेने पुरस्कारलेल्या राज्यपद्धतीच्या चिरस्थायी-पणाबद्दल ग्वाही देता येणार नाही.

घटनेने पुरस्कारलेली लोकशाही राज्यपद्धती या देशामध्ये यशस्वी व्हावयाची असेल तर राजकारणामध्ये प्रामुख्याने भाग घेणाऱ्या राजकीय पक्षांनी या पद्धतीवर निष्ठा ठेवून या पद्धतीला पोषक अशाच परंपरा राज्यव्यवहारामध्ये येतील अशी काळजी घेतली पाहिजे. आजच्या घटकेला तरी या देशातील राजकीय पक्ष याबाबतीत फारसे जागरूक नाहीत. त्यांचे धोरण बदलले तर ही पद्धती यशस्वी होण्याची शक्यता वाढेल. निवडणुकांच्या अनुभवामुळे जनतेच्या सहकार्याची पार्श्वभूमी तयार झाली आहे. तिचा फायदा करून घेऊन या देशात लोकशाहीची वाटचाल किती प्रमाणात पुढे न्यावयाची, हे राजकीय पक्ष ठरविणार आहेत.



### तत्त्ववैचारिक आव्हाने

सत्याग्रही समाजवादाने गांधी व मार्क्स यांच्या वाचनातून उभ्या केलेल्या आव्हानांचा सारांश पुढीलप्रमाणे सांगता येईल. आर्थिक समता राबविण्यासाठी राज्यसंस्थेच्या क्षमतांचा वापर करीत असतानाच, तिच्या वास्तविक अन्याय्य स्वरूपविरोधात लढा कसा उभारायचा? हा लढा अहिंसक राखायचा म्हणजे काय? त्यासाठी अहिंसेचा निव्वळ तांत्रिक वापर व सनदशीर राजकारण पुरेसे ठरेल काय? सनदशीर राजकारणाच्या मर्यादा ओलांडून चळवळींचे राजकारण उभारण्यासाठी निव्वळ प्रबोधनात्मक काम पुरेसे ठरेल काय ? इत्यादी प्रश्नांविषयी लोकशाही समाजवादाने गंभीर चिंतन करण्याची गरज सत्याग्रही समाजवादाने सूचित केलेली दिसते. जावडेकरांच्या मांडणीत या सर्व प्रश्नांची उत्तरे स्पष्टपणे मिळतात असेही नाही. मात्र मार्क्स आणि गांधी यांचा खऱ्या अर्थाने समन्वय घडवायचा असेल तर ते राजकारण स्वभावतः भांडवलशाही व राज्यसंस्था या दोहोंच्या विरोधातील आणि तरीही राजकारण असेल, याची स्पष्टता सत्याग्रही समाजवाद देऊ इच्छितो. हे राजकारण सहज सोपे असणारन नाही, याची जाणीवही सत्याग्रही समाजवादाच्या मांडणीतून (आणि तिच्या अपुरेपणातून वारंवार मिळते)

लोकशाही समाजवादाने मात्र गांधी-मार्क्स समन्वय सोपा बनवला. या राजकारणाने एका बाजूने राज्यसंस्थेला व दुसऱ्या बाजूने भांडवली लोकशाहीला तटस्थतेची मान्यता दिल्याने भांडवलशाहीच्या वैचारिक-सांस्कृतिक चौकटीबाहेर हा विचार जाऊ शकला नाही. याचा परिणाम म्हणून समाजवादी चळवळींचे अंतर्गत विघटन झाले आहे. व्यक्तिगत प्रबोधनाच्या मर्यादा स्पष्ट झाल्याने राष्ट्र सेवादलासारख्या संघटना थंडावल्या आहेत. मंडल आयोगाचे राजकारण करून ही दलित चळवळींशी समाजवादी गट नाळ जोडू शकलेले नाहीत. वर्गीय चळवळी उभ्या राहू न शकल्याने अंधश्रद्धा निर्मूलनासारख्या मर्यादित प्रश्नांवर लढणे या गटांना भाग पडत आहे. आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे राज्यसंस्थेने कल्याणकारी मुखवटा दूर केल्याने लोकशाही, विकेंद्रित तत्त्वज्ञानाचा आधारच कोलमडून पडला आहे. त्यामुळे समाजवादी गटांचे अस्तित्वच संपुष्टात येताना दिसते आहे. या पार्श्वभूमीवर सत्याग्रही समाजवादी विचार गांभीर्याने पुढे नेण्याची गरज आहे.

**- राजेश्वरी देशपांडे**

(साधना १० ऑगस्ट २००२)

अनुक्रमणिका






# समाजवादी लोकशाहीकरणाच्या नव्या दिशा

प्रा. हिं. ए. चव्हाण

(नवभारत एप्रिल १९६५)

"Politics is still far from being a positive science, let alone an exact science." (Prof. ErnstCassirer) प्रा. अर्न्स्ट कॅसिरर यांचे (The Myth of the state' या प्रबंधातील) हे विधान राजकीय क्षेत्रात आज वेगाने घडणाऱ्या परिवर्तनाकडे पाहून सार्थ वाटते.

लोकशाहीला समाजवादाची जोड दिल्याशिवाय लोकशाही ही केवळ औपचारिक स्वरूपाची राहते आणि उत्पादनाची साधने ज्यांच्या हातात आहेत त्यांच्या हाती ती खेळणे होते, हे सत्य आज जेवढे स्पष्ट झाले आहे, तेवढेच समाजवादाला लोकशाहीची चौकट लाभल्याशिवाय तो हुकुमशहाच्या भात्यातला बाण होतो हे वास्तवही उघड झाले आहे. म्हणूनच भांडवलशाहीप्रधान देशातील लोकशाहीवादी समाजवादाच्या आकर्षणबिंदूकडे आणि साम्यवादी देशातील समाजवादी हे लोकशाहीच्या आकर्षणबिंदूकडे कळत नकळत ओढले जात आहेत. राजकीय आदर्शवादाच्या क्षेत्रात होत असलेले हे सुस्पष्ट परिवर्तन वास्तववादी विचारवंतांनी लक्षात घेणे आवश्यक आहे. सर्वसाधारणत: साम्यवादाचे लोकशाहीकरण होणे शक्य नाही, असे होऊन लोकशाही समाजवाद्यांना स्वतंत्रपणे पुढे जावे लागते, असा एक पक्का समज झालेला आढळतो. लोकशाही समाजवादी चळवळीत आणि साम्यवादी विचारांच्या प्रभावाबाहेरील विचारवंतात एक अल्पप्रवाह असा आहे की तो साम्यवादाच्या लोकशाहीकरणाची अपेक्षा बाळगतो. साम्यवादाचे लोकशाहीकरण जवळच्या भविष्यकाळात होणे शक्य आहे काय, या प्रश्नाची चर्चा करण्याचा प्रस्तुत लेखात प्रयत्न आहे.

### १. डाव्यांचे अपयश

प्रत्यक्षात भांडवलशाहीप्रधान लोकशाही ही भांडवलदार वर्गाची हुकुमशाही असते, म्हणून साम्यवादाने अथवा समाजवादाने श्रमिक वर्गाची हुकुमशाही प्रस्थापित करून भांडवलदारी चौकट कायमची मोडून काढली पाहिजे, आणि श्रमिक वर्गाची म्हणजेच श्रमिकांच्या राजकीय पक्षाची हुकुमशाही हीच खरी व प्रगत लोकशाही असते या सिद्धांतानुसार आजपर्यंत देशोदेशीच्या साम्यवादी चळवळीची व्यूहरचना ठरलेली आहे. कामगारवर्गीय हुकुमशाहीच्या सिद्धांतावर आजवर बरीच टीका झाली. त्यातील उजव्या विचारांच्या प्रभावाबाहेरील समाजवाद्यांनी लोकशाही व समाजवाद यांची सांगड घालण्याची आवश्यकता प्रतिपादन केली तेव्हा साम्यवाद्यांनी त्यांची सुधारणावादी, अर्धभांडवली विचारप्रभावाचे प्रवक्ते म्हणून हेटाळणी केली, ही साम्यवाद्यांची सर्वात मोठी चूक होय. त्यामुळे साम्यवादी चळवळीत व्हायचे ते विचारमंथन होऊ शकले नाही. लोकशाहीसहित समाजवादावर निष्ठा ठेवणाऱ्या असंख्य समाजवाद्यांपासून साम्यवादी वेगळे पडले. आपल्या अतिरेकी पंथीय अथवा पक्षीय प्रवृत्तीमुळे समाजवादी विचारवंताशी व कार्यकर्त्यांशी त्यांना सख्य साधता आले नाही. त्याचा परिणाम असा झाला की जर्मनीसारख्या काही प्रगत अर्थक्षमतेच्या राष्ट्रात साम्यवादी व समाजवादी यांना बहुसंख्यांकांचा पाठिंबा असूनही त्यांना उजव्या प्रतिगाम्यांचा पराभव करता आला नाही. फॅसिझमला मुळातच टोला देण्यात विभक्त समाजवादी शक्ती असमर्थ ठरल्या. तरीही वर्गीय आणि पक्षीय हुकुमशाहीच्या आपल्या आवडत्या सिद्धांताला झुगारून देण्याचे सावधपण साम्यवाद्यांनी दाखवले नाही. या साम्यवादी व समाजवादी यांच्या विभक्तपणाचे जे मूल्य पुढे फॅसिझमच्या उत्कर्षकाली या दोघांनाही चुकवावे लागले ते फार भयंकार आहे. तरीही दुसरे महायुद्ध संपल्यावर समाजवादी शक्ती अधिक बलशाली झाल्या. पण साम्यवाद्यांनी पूर्व युरोपात आपल्या पूर्वीच्याच एकपक्षीय प्रवृत्तीचे प्रदर्शन केल्यामुळे व संयुक्त मोर्चातील इतर समाजवादी पक्ष निष्प्रभ करण्याचे धोरण पत्करल्यामुळे लोकशाही समाजवादी व साम्यवादी यांचे परिणामकारक ऐक्य इतरत्र साधले गेले नाही. फ्रान्स आणि इटालीसारख्या देशात समाजवादी व साम्यवादी यांच्या संयुक्त शक्तींना लोकशाही पद्धतीने व ती पद्धती कायम ठेवून सत्ता राबविता आली असती. साम्यवादी शक्तींच्या मानाने तेथील समाजवादी शक्ती दुबळ्या ठरल्यामुळे त्यांनाही साम्यवाद्यांना आपल्या कार्यक्रमावर खेचून आणता आले नाही व लोकशाही समाजवादाचा प्रयोग वठविता आला नाही. ब्रिटनमधल्या मजूर-पक्षाचा समाजवाद फारच नाजूक









प्रकृतीचा आहे. ब्रिटिश समाजरचनेत त्याला महत्त्वाचे आर्थिक व सामाजिक बदल घडविण्याची संधी लाभूनही तो अकार्यक्षम ठरला.

तेथे वास्तविक साम्यवाद्यांच्या सहकार्यावाचून काही अडणारे नव्हते. कारण ब्रिटनमधील साम्यवादी पक्षाला संसदीय अस्तित्व जवळजवळ नव्हते. आर्थिक समाजवादामुळे हुकुमशाही निर्माण होते, असा उजव्या विचारवंतांनी सोवियतचे उदाहरण दाखवून करून दिलेला समज मजूर-पक्षातील उजव्या समाजवाद्यांनी जवळजवळ स्वीकारला आणि समाजवादाशिवाय समाजवाद आणण्याची शक्यता पाहण्याचे तो पक्ष अभिनव प्रयोग करण्याच्या भूमिकेवर आला. लोकशाही पद्धतीच्या समाजवादाचा सकस, सुनिश्चित, आदर्श आणि दमदार प्रयोग करून जगाला मार्गदर्शन करण्याची आपली ऐतिहासिक जबावदारी या पक्षाने टाळली. सत्तेवर आलेल्या एखाद्या समाजवादी पक्षाने लोकशाही पद्धतीने समाजवाद प्रस्थापित करून भांडवलशाही अर्थरचना मोडून दाखविली असती व नवा आदर्श उभा केला असता तर साम्यवाद्यांना वर्गीय व पक्षीय हुकुमशाहीचा सिद्धांत केव्हाच सोडून द्यावा लागला असता. जगातील समाजवादी व साम्यवादी आपापल्यापरीने लोकशाही समाजवाद हा अजूनही स्वप्नाभासच उरावा या गोष्टीला जबाबदार आहेत.

## २. नवी भूमिका

गेल्या दशकात साम्यवाद्यांच्या प्रभावाचा व विस्ताराचा वाढता वेग बराच मंदावला. या काळात समाजवादी विचारांच्या पक्षाची शक्ती जगभर वाढली. बहुतेक समाजवादी पक्षात डावे आणि उजवे असे गट पडले. हे गट साम्यवादी पक्षासंबंधी स्वीकारायच्या भूमिकेवरून मुख्यतः पडले. साम्यवाद्यांशी सहकार्य अथवा असहकार्य मानणाऱ्या सर्वच समाजवाद्यांनी लोकशाही समाजवादाचे मूल्य मात्र स्पष्टपणे स्वीकारले. त्यामुळे त्यांना कामगारवर्ग व मध्यमवर्ग यात प्रतिष्ठा प्राप्त झाली. अनेक देशात समाजवादी पक्ष हे प्रमुख विरोधी पक्ष म्हणून पुढे झाले. कित्येक देशात सत्ताधीश पक्ष होण्याची त्यांची शक्यता वाढली. याचा निश्चित असा एक परिणाम साम्यवाद्यांना विचारशील करण्यात झाला. संसदीय लोकशाही आपण स्वीकारणार की नाही, या प्रश्नांची उत्तरे साम्यवाद्यांना नव्या स्वरूपात द्यावी लागली.

साम्यवाद्यांना विचारप्रवण करणाऱ्या घटनांपैकी आणखी एक प्रमुख घटना म्हणजे क्रुश्चेव्ह यांचे उदारमतवादी नेतृत्त्व आणि स्तालिनच्या नेतृत्वात घडलेल्या खलत्वाचा त्यांना केलेला रहस्यस्फोट. या रहस्यस्फोटाचा परिणाम साम्यवादी विचारवंतांना जबरदस्त धक्का देणारा ठरला. तोपर्यंत स्तालिननिंदा अथवा सोवियतनिंदा हा केवळ भांडवली प्रचारयंत्राचा एक भाग आहे, असे निष्ठावंत साम्यवाद्यांना वाटत असे. क्रुश्चेव्हने स्तालिनच्या केलेल्या निंदेत काही अतिशयोक्तीचा भाग असू शकेल. पण एवढे मात्र निर्विवाद सिद्ध झाले की, स्तालिनकाळात सोवियत युनियनमध्ये लोकशाही जीवनप्रणाली जवळजवळ संपुष्टात आली होती आणि एक अथवा काही लहरी हुकुमशहांच्या अत्याचाराविरोधी आवाज काढणेही अशक्य झाले होते. क्रुश्चेव्हने स्तालिनकाळात घडलेल्या अपकृत्याचे कारण व्यक्तिपूजेत अथवा पक्षाच्या सामूहिक नेतृत्त्वाच्या अभावात असल्याचे सांगितले. त्यात साम्यवादी प्रांजल विचारवंताचेही समाधान होऊ शकले नाही, इतरांचे तर दूरच.

त्यातून कामगारवर्गीय अथवा पक्षीय हुकुमशाहीचा सिद्धांत चुकीचा असल्याची अथवा टाकाऊ झाल्याची जाणीव अनेक साम्यवादी विचारवंतांना झाली. इटालीचा युरोपातील सर्वात मोठा साम्यवादी पक्ष हे या जाणिवेचे मोठे उदाहरण आहे. स्तालिनकाळात घडलेल्या घटनांची अधिक चौकशी होऊन त्यावर अधिक विचारमंथन घडावे, अशी त्या पक्षाची सतत मागणी आहे. एवढेच नव्हे, तर इटालीमध्ये आपण संसदीय पद्धतीचा समाजवाद आणू शकतो व तोच आणणे इष्ट आहे, अशी त्या पक्षाची अलीकडे खात्री झाली आहे. तो ग्लिआती या इटालीच्या प्रभावशाली साम्यवादी नेत्याने आपल्या अखेरच्या निवेदनात पक्षाला तशी स्पष्ट दिशा दाखवून दिली आहे. क्रुश्चेव्हनेही सो.यु.बो. पक्षाच्या विसाव्या काँग्रेसमध्ये अशी भूमिका व्यक्त केली होती, की काही भांडवली देशात साम्यवाद्यांना पार्लमेंटच्या सहाय्याने सत्ता हस्तगत करता येईल. पण पार्लमेंटच्या सहाय्याने सत्ता हस्तगत करणे वेगळे आणि सत्ता मिळाल्यावरही विरोधाचे स्वातंत्र्य असलेली संसदीय यंत्रणा कायम ठेवणे वेगळे. इटालीच्या साम्यवाद्यांनी यावाबतीत स्पष्ट भूमिका स्वीकारली आहे. साम्यवादी चळवळीत ती नवीन आहे. लोकशाही समाजवादाचा एक प्रवाह साम्यवादी चळवळीतही निर्माण होत आहे, याची ती साक्ष आहे. भारतीय साम्यवादी पक्षाच्या काँग्रेससाठी प्रतिनिधी म्हणून येऊन गेलेले फ्रान्स कालामँड्री या इटालीच्या साम्यवादी पक्षाच्या मध्यवर्ती समितीच्या जबाबदार सभासदाचे खालील विधान या दृष्टीने पहाण्यासारखे आहे.







अनुक्रमणिका

"We think that in mature Capitalist countries, socialism must grow up from a process of building up and expanding democracy. In Italy, we have stated openly, plurality of parties may exist even after we achieve socialism. We do not exclude in principle the possibility of an opposition in the Italian socialist state- of course, a democratic opposition, working within the socialist constitutional framework."

-"Italian Communist Approach." Interviewing Calamandrei. Mainstream, January २, १९६५

इटालीच्या साम्यवादी पक्षाने स्वीकारलेल्या या नव्या भूमिकेमुळे त्याची शक्ती वाढली आहे. १८१४००० सभासदांचा हा पक्ष युरोपमध्ये सर्वात मोठा साम्यवादी पक्ष असून इटालीच्या पार्लमेंटमध्ये तो मोठा प्रभावशाली आहे. नुकत्याच झालेल्या तेथील अध्यक्षांच्या निवडणुकीत या पक्षाच्या सहकार्यामुळे लोकशाही समाजवादी गटाचा अध्यक्ष निवडून आल्यामुळे या पक्षाचे सत्तेवर काहीसे अप्रत्यक्ष नियंत्रण रहाणार आहे. या पक्षाचे सहकार्य घेऊ इच्छिणारा समाजवाद्यांचा एक मोठा वर्ग तेथे आहे. समाजवाद्यांसह सत्तेवर येणे या पक्षाला अगदीच अशक्य नाही. त्यामुळे युरोपच्या राजकारणात या पक्षाला व याच्या नव्या धोरणाला फार महत्त्व आहे. इतरही काही साम्यवादी पक्षांनी संसदीय लोकशाहीच्या अस्तित्वावर आपला विश्वास व्यक्त केला आहे. पण मुख्यत: इटालीचा साम्यवादी पक्ष साम्यवादातील नवप्रवाहाचे प्रतिनिधित्व करतो. साहजिकच, या पक्षासंबंधी काही अपेक्षा निर्माण होतात. या साम्यवादी पक्षाने स्वीकारलेल्या संसदीय लोकशाही पद्धतीच्या समाजवादाला सफलता प्राप्त होणे हे मुख्यत: तेथील समाजवादी व साम्यवादी यांची प्रत्यक्षात कशी युती होते यावर अवलंबून आहे. सिद्धांताची प्रत्यक्षात अंमलबजावणी हा राजकीय व्यवहाराचा वेगळा भाग होय.

### ३. पण एक विसंगती

साम्यवादी पक्षांची सत्ता असलेल्या देशात लोकशाही समाजवादाला मानणारे साम्यवादी नसतील असे नाही. तेथेही एक जोरदार विचारप्रवाह सापडण्याची शक्यता आहे. पण घडलेल्या इतिहासाचा नैसर्गिक क्रम म्हणून तेथील साम्यवादी पक्ष उघडपणे विरोधी पक्ष अस्तित्वाच्या संसदीय राज्यप्रणाली-कडे प्रथम वळणार नाहीत. प्रथम हा क्रम कुठल्यातरी प्रगत भांडवलशाही देशात घडेल आणि पुढे तो साम्यवादी चळवळीवर प्रभाव पाडील असा तर्क आहे. सध्यातरी अशी शक्यता इटाली आणि फ्रान्स या देशातच दिसते.

वास्तविक यात विसंगती आहे.

सोवियत युनियमध्ये क्रुश्चेव्ह यांच्या नेतृत्त्वाबरोबर काही प्रमाणात व काही क्षेत्रात उदारमतवादी विचारांचा व आचारांचा जो आविष्कार झाला तो क्रुश्चेव्हच्या नेतृत्त्व-लोपानंतरही थांबण्यासारखा नाही. सोवियत युनियनमध्ये परंपरागत कर्मठ साम्यवादी आणि उदारमताचे परिवर्तनवादी साम्यवादी असे दोन प्रवाह जवळ जवळ समतोल असण्याची शक्यता आहे. कामगारवर्गीय हुकुमशाहीचे तत्त्व त्यागण्याची त्यांच्यापैकी आजतरी कुणाचीच तयारी नाही. कारण आजपर्यंत जे निष्ठेने उराशी बाळगले त्याचा त्याग करण्याची तयारी 'गतिवादी' मनाचीही नसते, हेच खरे! त्यातल्या त्यात उदारमतवादी समजला जाणारा क्रुश्चेव्ह संधी मिळेल तेथे जयघोष कामगारवर्गीय वा पक्षीय हुकुमशाहीचाच करीत असे. आणि त्याच्या अर्धवट उदारमतवादामुळेही त्याला सोवियत-मधील हुकुमशाही प्रवृत्तीचा बिमोड करता आला नाही. 'स्तालिन-घटना' बदलण्याचा त्याने विचार व्यक्त केला होता. पण नेमका कोणता बदल त्याला करायचा होता हे कळले नाही. विरोधी विचारांना मुद्रणस्वातंत्र्य, संघटनास्वातंत्र्य व संसदीय स्वातंत्र्य देण्यात येते काय असा आशावादी प्रश्न क्रुश्चेव्हच्या परिवर्तनशील नेतृत्वकाली काहींना तरी अपेक्षित होता. पण क्रुश्चेव्हलाच सत्तेवरून हटविण्यात आल्यावर त्याचा स्पष्टीकरणाचा आवाज ऐकण्याची संधीही जगाला लाभली नाही. अखेरच्या अंकापलीकडेही उत्कंठा जागृत ठेवणारे सोवियत राजकारणाचे नाटक अभिनव खरेच! क्रुश्चेव्हही स्तालिनच्या व्यक्तिसंप्रदायाच्या दिशेने चालला होता अशी त्यावर टीका होऊ लागली. पण काहीही असले तरी क्रुश्चेव्ह बरोबर सुरू झालेली विचारप्रक्रिया सोवियत युनियनमध्ये व बाहेरील साम्यवादी चळवळीतही यापुढे शक्य नाही. भांडवलशाहीपासून आपल्याला काही गोष्टी शिकण्यासारख्या आहेत असे अलीकडे क्रुश्चेव्ह म्हणाला होता. साम्यवादाला भांडवलशाहीपासून शिकण्या-सारखी गोष्ट म्हणजे, औपचारिक पद्धतीचे का होईना पण संसदीय विरोधस्वातंत्र्य देणे हीच आहे असे क्रुश्चेव्हला आता तरी खास जाणवले असेल. स्तालिन जिवंत नव्हता म्हणून क्रुश्चेव्हनी केलेल्या आरोपाला उत्तर देऊ शकला नाही, तर क्रुश्चेव्ह जिवंत असूनही आता जगापुढे तोंड उघडू शकत नाही. न्यायालयात

गुन्हेगारांनाही उत्तर देण्याची संधी देण्यात येते. सोवियतमध्ये मात्र प्रथम 'हिरो' ठरलेला शेवटच्या अंकात खलपुरुष म्हणून समोर येतो आणि तोही मुस्कटदाबी केलेल्या अवस्थेत. जग ही रंगभूमी आहे म्हणणाऱ्या शेक्सपिअरची प्रतिभा रशियन राजकारणाच्या नाटकाने मंत्रमुग्धच केली असती!

सोवियत युनियनमध्ये राजकीय पक्षस्वातंत्र्य असते तर ट्रॉटस्कीला, मॉलोटॉव्हला, बुल्गानिनला, क्रुश्चेव्हला पदच्युती-नंतर आपल्या धोरणाचा पुरस्कार करणारा पक्ष निर्माण करावा, असे वाटले नसते व तसा तो निर्माण झाला नसता का? आज सोवियत युनियनमध्ये 'पिळणारा भांडवलदार' वर्ग नसताना दुसरा पक्ष हा भांडवलदारांचा पक्ष ठरणार कसा? कामगारवगाचा एकच आणि तोही साम्यवादी पक्षच असला पाहिजे, हा आग्रह कशाला? पक्ष आणि विचार हे काटेकोरपणे वर्गीयच असतात काय? असतील तर कालच्या श्रमिकवर्गाच्या देवता उद्या पतनानंतर कोणत्या वर्गाच्या होतात? आणि वर्गधरसोडीचे कारण काय? आज सोवियतमध्ये पिळणारा वर्गच जर उरला नाही तर श्रमिकनिष्ठ पक्षाला विरोधी पक्ष सत्ता हस्तगत करील ही तरी भीती कशाला हवी? या प्रश्नांची उत्तरे साम्यवाद्यांजवळ नाहीत. स्तालिनच्या सत्तातिरेकाची विषारी फळे दीर्घकाळ चाखूनही सोवियत साम्यवाद्यांना संसदीय लोकशाही निर्माण करण्याचे धैर्य होत नाही. कारण त्यामुळे आपल्या राजकारणाच्या सिद्धांताला काटेकोर विज्ञानाचे अथवा गणिताचे स्वरूप देण्याचा आजपर्यंत सोवियत साम्यवाद्यांचा प्रयत्न हास्यास्पद ठरण्याची शक्यता आहे. म्हणून सोवियत युनियनमध्ये साम्यवाद्यांना लोकशाही समाजवादाचे महत्त्व पटूनही त्याचा प्रत्यक्षात क्रम आचरण्याचे मनोबल प्राप्त होणार नाही. म्हणूनच झालाच तर साम्यवाद्यांच्या प्रयत्नातून नवीन देशात संसदीय लोकशाहीवर अधिष्ठित समाजवाद प्रस्थापित होईल, सोवियतमध्ये प्रथम हा बदल घडणार नाही. पण हा इतिहासाचा क्रम तेथे आवश्यक नाही, म्हणून नव्हे. उलट लोकशाही समाजवादाची गरज सर्वप्रथम जर कुणाला असेल तर ती सोवियत श्रमिकांना आहे. कारण सोवियत श्रमिकाच्या हाती क्रांतीचे फक्त अर्धे फळ लागले - आर्थिक स्वास्थ्याचे; आणि अर्धे फळ तोंडाशी आलेले हिरावून घेतले गेले - (राजकीय व वैचारिक) विरोध स्वातंत्र्याचे!

नवल वाटते ते इटालीत संसदीय लोकशाही कायम ठेवण्यास मान्यता देणारे कालामँड्रीसारखे विचारवंत सोवियत युनियनसंबंधी वेगळी भूमिका घेतात, त्यांच्या विसंगतीचे. ते म्हणतात,

"When one refers to the exisiting socialist countries, one must never forget the historical and national conditions in which socialism has been achieved there. It is therefore nonscense to suggest that a multi-party system should be introduced in the U.S.S.R. today artificially."

"Italian communist Approach." Mainstream Jan. २, १९६५

लोकशाही समाजवादी मूल्यांच्या बावतीत एका राष्ट्राला एक नियम व दुसऱ्याला दुसरा, असे दुहेरी मोजमाप बाळगणे चुकीचे आहे. उलट आज बाहेरील साम्यवादी व साम्यवाद्यांचे सहप्रवासी विचारवंत यांनी सोवियत युनियनला निक्षून सांगण्याची वेळ आली आहे की, दुसऱ्या देशात श्रमिक चळवळीला, समाजवादाला व साम्यवादाला एकाकीपणापासून, वेगळेपणापासून, भांडवली आघातापासून वाचवायचे असेल आणि प्रतिष्ठा प्राप्त करून द्यायची असेल तर कृपा करून प्रथम साम्यवादी प्रयोगाच्या मायदेशात संसदीय लोकशाहीची - विरोध स्वातंत्र्याची पुनर्रचना करा! जो हक्क आपण दुसऱ्या समाज-रचनेत मागतो तो आपल्या समाजरचनेत मात्र असू नये, हा कुठला न्याय? जोपर्यंत बाहेरील साम्यवादी आपल्या दादांचा कान धरण्याचे धैर्य दाखविणार नाहीत तोपर्यंत त्याच्या लोकशाही-निष्ठेबद्दल संशय घेण्यास अवसर मिळतो.

कालामँड्री यांच्या मते, सोवियत युनियनमध्ये लोकशाही दुसऱ्याच मार्गाने मजबूत करता येईल. ते म्हणतात,

"Limitations which may still exist in the full deployment of Soviet democrary, shall be overcome by bringing ever more directly the people into all decisions making processes in the field of economics and Politics."

कालामँड्री म्हणतात त्याप्रमाणे असे घडले तरी ती अतिमर्यादित लोकशाही ठरेल. एकपक्षीय सत्तेचा व तिच्यातून संभवणाऱ्या विशिष्ट जनाधिकारशाहीचा धोका नष्ट होत नाही. याबाबतीत प्रा. लास्की यांनी देऊन ठेवलेला इशारा कुणीही विसरू नये.

" The one party state is under constant temptation to overpass the boundries beyond which liberty degenarates in to dictatorship."

"Liberty in Modern State." Introduction १९४७ - H. J. Laski

अनुक्रमणिका

**४. संशय नको स्वागत बरे**

आज साम्यवादी जगात वैचारिक भिन्नतेचे तीन विचारप्रवाह स्पष्ट दिसतात.

१) सोवियत युनियनचा साम्यवादी सर्वाधिकारशाही व क्रुश्चेव्ह नेतृत्त्वकालात उदय पावलेला उदारमतवाद यांच्या अंतर्गत द्वंद्वात सापडलेला विचारप्रवाह.

२) चीनचा साम्यवादी सर्वाधिकारशाहीवादी कडवा, साचेबंद, परंपराशुद्धतावादी, सशक्त क्रांतिवादी विचारप्रवाह.

३) इटालीमधील साम्यवाद्यांचा (तत्सम इतर) लोकशाही आणि समाजवाद अथवा साम्यवाद यांचा समन्वय साधण्याची शक्यता अजमाविणारा विचारप्रवाह.

या विचारप्रवाहांपैकी पहिला अजून दीर्घकालपर्यंत वैचारिक द्वंद्वात राहणार असून साम्यवादी जगातील पुढील नेतृत्त्व त्याला निश्चित निर्णयाच्या अभावी बदलत्या परिस्थितीत करता येणार नाही. साम्यवादी जगावरील वैचारिक नेतृत्त्वाची सोवियत युनियनची पकड आता सुटलेली आहे. त्याचा एक सुपरिणाम वेगवेगळ्या साम्यवादी पक्षांनी नव्या दिशा शोधण्यात होणार आहे. साम्यवादी समाजरचनेच्या यशापयशाचा प्रत्यय घडविणारा एक प्रयोग, आणि लष्करी व औद्योगिक शक्तीमुळे साम्यवादी जगाचे बाहेरील आक्रमणापासून रक्षण करणारी एक शक्ती, एवढेच यापुढे साम्यवादी विश्वात सोवियत युनियनचे स्थान राहील. परंपरागत विचारांचे आणि भांडवलशाही व साम्राज्यशाही यांच्या आडमुठेपणामुळे चिडून गेलेले साम्यवादी हे नेतृत्त्वासाठी यानंतर पेकिंगकडे पाहतील. अणवस्त्रांसहित वाढत्या सामर्थ्याचा चीन नव्या कालातील लेनीन म्हणून माओ-त्से-तुंगची वैचारिक प्रतिमा साम्यवाद्यांपुढे आदर्श म्हणून ठेवील, आणि साचेबंद जहाल विचारांचे आकर्षण बाळगणारे साम्यवादी कळत नकळत, उघड वा गुप्तपणे 'माओवाद' चा आश्रय घेतील. चीनचा 'माओवादी' साम्यवाद या शतकाच्या उत्तरार्धात निर्माण झालेली एक प्रभावी शक्ती आहे, ही वास्तवता डोळ्याआड करून चालणार नाही. तिसराप्रवाह हा चिनी साम्यवादाच्या समांतर रेषेत वाहणारा व प्रसंगी त्याला शह देणारा ठरेल. तो मुख्यत: साम्यवादी पक्षाच्या हाती आज राजकीय सत्ता नसलेल्या देशात वाढणार असून संपूर्ण साम्यवादी चळवळीला एक नवे वळण त्याच्या रूपाने लाभण्याची शक्यता आहे. इटालीमध्ये समाजवादी व साम्यवादी यांच्या सहकार्यातून जर संसदीय पद्धतीचा समाजवाद सत्ताधिष्ठित झाला व यशस्वी ठरला तर समाजवादाचे एक नवे आकर्षणकेंद्र निर्माण होणार अशी चिन्हे दिसत आहेत.

प्रगत लोकशाहीची व विकासक्षम आर्थिक प्रगतीची काही फळे चाखणाऱ्या देशात संसदीय चौकट मोडून एकपक्षीय अधिकारशाहीची क्रांती घडणे शक्य नाही, हे साम्यवाद्यांना आता इतिहासाने शिकविले आहे. आज त्या देशातील संसदीय यंत्रणेवरील भांडवलशाहीची पकड पूर्वीपेक्षा बरीच सैल झाली आहे. तेथे उजव्या पक्षाची प्रतिष्ठा घटली आहे.

साम्यवाद्यांना जशी संसदीय चौकट मोडून क्रांती घडविणे शक्य झाले आहे, तसेच भांडवलशाहीप्रधान लोकशाहीवाद्यांना यापुढे साम्यवादी राष्ट्रात बाहेरील हस्तक्षेपाने व अंतर्गत अल्पसंख्यांकाचा उठाव करून सत्ता उलथून पाडणे अशक्य झाले आहे.

सर्वसंहारक अण्वस्त्रदले व राजकीय गटबंदी यामुळे बाहेरील आक्रमण आणि अंतर्गत उठावाच्या क्रांत्या या दोन्ही गोष्टी दोन्ही सत्तागटात आता जवळजवळ कालबाह्य ठरत आहेत. त्यामुळे लोकशाहीवादी आणि साम्यवादी या दोघांनाही आता वेगळे मार्ग हवे आहेत.

वॉशिंग्टन, मास्को, पेकिंग यांना काही काळ टाळून अथवा बाजूला सारून, लोकशाही समाजवादी क्रांतीचा प्रवाह यापुढे जगातील कित्येक राष्ट्रात बलशाली होऊन सत्ताधीश होण्याची वास्तवतापूर्ण शक्यता आहे. या प्रवाहापासून आजवर दूर राहिलेले साम्यवादी यापुढे दूर राहू शकणार नाहीत. साम्यवादातील विचारवंतांचा एक प्रवाह लोकशाही समाजवादाकडे आपल्या काही वैशिष्ट्यांसह - लढाऊ वैशिष्ट्यांसह - धावणार आहे. हा वास्तविक लोकशाहीचा व समाजवादाचाही एकाचवेळी विजय ठरणार आहे. इटालीसारखे साम्यवादी पक्ष लोकशाही समाजवादाकडे वळू लागावे हा साम्यवादाचा सुनिश्चित असा एका बाबतीत तरी (राज्य व क्रांती) तत्त्वगंभीर पराभव आहे. म्हणून साम्यवादातील या बदलाकडे संशयाने पाहण्यापेक्षा त्याचे स्वागत करणेच सुयोग्य ठरेल.

लोकशाही समाजवादाचा आणि संसदीय लोकशाहीचा सिद्धांत मूलभूतपणे स्वीकारला की साम्यवाद्यांच्या वैचारिक कर्मठपणाची इमारत पायापासून डळमळू लागते आणि तिची पुनर्रचना केल्याशिवाय पर्यायच उरत नाही.

**५. विकासाची अवस्था**

साम्यवादी जेव्हा संसदीय लोकशाहीची भाषा बोलतात तेव्हा त्यांच्याकडे संशयाने पाहण्यात येते, याचे कारण आजपर्यंत साम्यवादी हे संसदीय सवलतीचा फायदा केवळ क्रांतिकारक







अनुक्रमणिका

उठावासाठी जनतेला तयार करणाऱ्या उद्देशास पूरक म्हणून मानीत. अजूनही पुष्कळ साम्यवादी तसे मानतात. पण आज साम्यवाद्यांपैकी बराच मोठा वर्ग लोकशाही पद्धतीचे महत्त्व मान्य करण्यास मनापासून तयार होत आहे. गेल्या दशकात हा साम्यवादी विचारवंतांचा वर्ग वेदनापूर्ण विचारसंवेदनेतून गेला आहे व अजूनही जात आहे. भांडवलशाहीची आर्थिक चौकट मोडून समाजवादाचे पहिले प्रयोग करण्याचाव श्रमिक जनतेला लढाऊ कार्यक्रम देण्याचा त्याला अभिमान आहे. म्हणून तो साम्यवादी चळवळीचे सूत्र सोडून द्यायला तयार नाही. मात्र साम्यवादातील गंभीर उणिवांच्या व चुकीच्या जाणिवांनी तो आज भावनिक व वैचारिक दोन्ही प्रकारे त्रस्त झाला आहे. उद्या तो विचारवादळातून बाहेर पडला की नवीन दिशा शोधणार व नव्या मूल्यांच्या जाणिवा तो आत्मसात करणार, यात नवल नाही. साम्यवादी मनातील विचारमंथनाची पुरेशी जाणीव अनेकांना नसल्यामुळे त्यांना हे नवे राजकीय वास्तव्य दिसत नाही. साम्यवाद्यांचे लोकशाहीकरण अशक्य आहे, अशीच त्यांची भावना आहे.

लोकशाहीनिष्ठेविषयी साम्यवाद्यांकडे संशयाने पाहण्यात येते, याला सबळ कारणे आहेत.

सुरुवातीपासूनच साम्यवाद्यांनी भांडवलशाही देशातील लोकशाही (ही समाज उत्क्रांतीतील पुढील व महत्त्वाची घटना मानली तरी) बेगडी लोकशाही आहे असे मानले. ज्या काळात मार्क्स, एंजेल्स यांनी आपले सिद्धांत जुळविणारे अनुभव घेतले त्या काळात म्हणजे गेल्या शतकाच्या पूर्वार्धात पाश्चिमात्य जगात लोकशाही यंत्रणा दुबळी, नग्न, पिळवणुकीस वाव देणारी, साम्राज्य प्रस्थापनेच्या कार्यात रमलेली, वसाहतींना दारिद्र्याच्या खाईत लोटणारी आणि क्रांतिकारक शक्तींना जुलमाने चिरडून टाकण्यात तत्पर असलेली होती. गेल्या शतकाच्या उत्तरार्धातही तिचे हे स्वरूप कायम होते. गेल्या शतकातील लोकशाहीचे स्वरूप पाहून मार्क्सला ती धनिकांची वर्गीय सत्ता जोपासणारी यंत्रणा वाटावी, हे साहजिकच होते. आर्थिक शोषण थांबल्यावरच खरी लोकशाही निर्माण होईल या त्याच्या मतात फारशी चूक कोणती? चूक आहे ती, भांडवलशाही स्वतःची हुकुमशाही लोकशाही राज्ययंत्रणेवर लादते म्हणून श्रमिक वर्गानेही आपली हुकुमशाही प्रस्थापित करावी, या त्याच्या उपायात कार्ल मार्क्स म्हणतो, What I did that was new was to prove : १) ........२) that the class struggle necessarily leads to the dictatorship of the proletariat ३) that this dictatorship itself only constitutes the transition to the abolition of all classes and to a classless society." - (The correspondence of Marx and Engels)

भांडवलदाराची राज्ययंत्रणा मोडून काढावी म्हणून कामगारवर्गाची हुकुमशाही काही काळ अस्तित्वात असावी, पुढे ती वर्गविहीन समाजनिर्मितीच्या क्रमात नष्ट होईल, अशी मार्क्सची कल्पना होती. भांडवलशाही जे भ्रष्ट तंत्र वापरते तेच आपणही तिच्या पाडावासाठी वापरावे, यात मार्क्सने काय साधले? आर्थिक गुलामगिरीतून मुक्त होतानाच एक पाय राजकीय गुलामगिरीच्या पिंजऱ्यात टाकायला सांगण्यासारखे ते होते. भांडवलशाहीचा पुरता बिमोड होईपर्यंत तात्पुरती श्रमिकांची हुकुमशाही मान्य केली तरी ती संपुष्टात येणार कधी? १९१७ ते १९६५ एवढ्या दीर्घ कालावधीत ती संपुष्टात न येता तिची पकड आणखी घट्ट होत आहे ; हे चित्र कार्ल मार्क्सला दिसले असते तर स्वतःच तो बैचेन झाला असता? लेनीनने तर श्रमिकांच्या हुकुमशाहीचा अर्थ पक्षाच्या हुकुमशाहीबरोबर लावला. "Yes : the dictatorship of one party!" हे लेनीनचे शब्द ! ते स्तालिनने पक्षाच्या पुढारीपणाच्या अर्थाने घेऊन (Leadership) स्वतःसाठी हुकुमशाहीची तात्विक सनद करून घेतली. लेनीनचे म्हणणे असे की, " Parliament itself is given up to talk for the special purpose of fooling the 'common people'." (The state and Revolution). हीच गोष्ट "कामगारवर्गीय हुकूमशाही" विषयी म्हणता येणार नाही काय ? पार्लमेंटच्या ऐवजी ' The supreme soviet' एवढाच बदल करावा, म्हणजे झाले.

मार्क्सवाद्यांच्या हे लक्षात येऊ शकले नाही की, सरंजामशाही व राजेशाही यांच्या जुलमी सत्तेचा अंत करण्याच्या क्रमात निर्माण झालेली लोकशाही भांडवलशाहीच्या प्रवाहातून सुटून आज ना उद्या जनतेच्या हातात जाईल. सामाजिक परिवर्तनाचे ती एक साधन बनेल. समाजसंस्थेच्या उत्क्रांतीत मानवाच्या हाती लाभलेली लोकशाही ही प्रदीर्घ कालासाठी उपयुक्त ठरणारी नवी शक्ती होती. तिला अधिक उज्ज्वल स्वरूप देण्याचे क्रांतिकारक कर्तव्य होते. तिचा अंत करणे हे मागे पडणारे पाऊल होते. एक भांडवली संस्था म्हणून मार्क्सवाद्यांनी राज्ययंत्रणेबरोबरच संसदीय लोकशाहीची चौकट मोडण्याचा जो आदेश दिला तो अंती अत्यंत घातक होता. ब्रिटनसारख्या देशात श्रमिक वर्ग संसदीय लोकशाही मार्गाने सत्ताधीश होऊ शकेल, ह मार्क्सच्या शेवटी लक्षात आले होते. (कॅपिटल, खंड पहिला. प्रस्तावना.) पण मार्क्सच्या या विचाराचा धागा पुढे मार्क्सवाद्यांनी

कधी पकडला नाही. " The Communist do not form a seperate party opposed to the other working class parties. They have no interests seperate and apart from those of the protetariat as a whole."(communist Manifesto,) हा मार्क्सचा आदेशही वाऱ्यावर विरला. साम्यवादी हे लोकशाही समाजवादी चळवळीत प्रथम शिरून पुढे तिच्यात फूट पाडतात आणि आपला पक्ष बलवान करण्यासाठी तिचा उपयोग करतात, असा समाजवाद्यांचा आरोप, अगदीच निराधार नाही.

साम्यवाद्यांविषयीचा हा अविश्वास ऐतिहासिक चुकातून संभवला. साम्यवादी विचारवंतांनी आपल्या दृष्टीकोनात व व्यवहारात बदल घडवून, हा अविश्वास नष्ट करण्याची जबाबदारी त्यांचीच आहे.

मार्क्सवादी पक्ष ब्रिटनमध्ये संसदीय पद्धतीने सत्ताधीश झाला नाही, तरी श्रमिकवर्गाचा "मजूर-पक्ष" तेथे सत्ताधीश होऊ शकतो, यात कार्ल मार्क्सची भविष्यवाणी अंशतः तरी खरी ठरली आहे. इटालीसारख्या एखाद्या देशात जर शांततापूर्ण संसदीय समाजवाद प्रस्थापित झाला तर भविष्यकाळात कित्येक प्रगत अर्थरचना असलेल्या देशात समाजवाद संसदीय पद्धतीने विजयी होऊन मार्क्सचे म्हणणे नव्या अर्थाने साकार होईल. आणि ही फारच महत्त्वाची घटना घडेल. " If socialism is to have a fair chance, it must be inaugurated in a prosperous country." (" The practice and theory of Bolshevisim.") हे बर्ट्रांड रसेलचे म्हणणे योग्यच आहे. कारण तेथून समाजवादाला नवी दिशाच लाभण्याची शक्यता आहे. आणि त्याचा परिणाम म्हणून सोवियत साम्यवादाला कालांतराने का होईना पण लोकशाही समाजवादाचा प्रवाह त्यांच्या देशातही रोखता येणार नाही. " Russian communism may fail and go under, but socialism itself will not die." (' The theory and practice of Bolshevism.') समाजवादाविषयी प्रकट केलेला हा आशावाद लक्षात घेऊन, साम्यवादी विश्वात आज दिसू लागलेल्या लोकशाही समाजवादी विचारप्रवाहाची सावधपणे नोंद घेणे आवश्यक आहे. साम्यवाद स्वतः बदलण्याच्या क्रमास लागला आहे. समाजवाद्यांनी या बदलाचे स्वागत करून बदलाच्या क्रमास मदत करणेच इष्ट आहे, हा मथितार्थ.

तसे पाहिले तर आज जगभर पक्षपद्धती हीच टाकाऊ झाल्यासारखी दिसते. पक्ष कोणत्याही स्वरूपाचे असोत शेवटी हुकुमशाहीकडे नेणाऱ्या साधनात समाविष्ट होतात आणि अल्पसंख्य पुढारीपणाचे भासमान निर्णय जनतेवर लादतात. पण आज तरी व्यवहार्य दृष्टीने पक्षसाधनाशिवाय लोकशाही राबविण्याचा अन्य मार्ग स्पष्ट दिसत नाही. पक्षशून्य लोकशाहीच्या अवस्थेपूर्वी लोकशाही समाजवादाची लोकशाही विकासातील एक उत्क्रांती अवस्था अटळ असावी, असे वाटू लागते. या दृष्टीने लोकशाही समाजवादी विचारांचे भिन्नभिन्न प्रवाह लवकर एकवटतील तर ते विकासाची गती तीव्र करण्यास मदत करतील असे आमचे मत आहे.



## आव्हाने

**अनेक मार्क्सवादी-लेनिनवादी गट त्यांच्या साहसवादाचा पुनर्विचार करीत असताना समाजवाद्यांमध्ये मात्र भाबड्या नैतिकतेमधून पक्षीय राजकारणाच्या निर्भर्त्सनेचा कल बरेच वेळा डोकावतो.**

**समाजवादासाठीच्या बहुपदरी आणि दीर्घकालीन लढ्यात राज्यावरील नियंत्रण हा महत्त्वाचा मुद्दा आहे. राज्यावर कमीअधिक प्रमाणात नियंत्रण मिळाल्यामुळे समाजवादी राजकारणाला अनुकूल असा अवकाश निर्माण होऊ शकतो.**

**ढोबळमानाने असे म्हणता येईल की भारतातील साम्यवाद्यांनी राज्यसंस्थेला अतिरिक्त महत्त्व दिले तर समाजवाद्यांनी राज्यसंस्थेवरील नियंत्रणाचे मर्म पूर्ण उकलले नाही.**

**या पार्श्वभूमीवरील सर्व समाजवाद्यांनी 'कल्याणकारी राज्या'चा ठाम आग्रह हे आपल्या राजकारणाचे एक सूत्र म्हणून स्वीकारले पाहिजे.**

(पृष्ठ ७२ वर)

# लोकशाहीच्या अपयशातून निर्माण होणाऱ्या समस्यांचे दिग्दर्शन

प्रा. ना. अ. मावळंकर

(नवभारत ऑगस्ट-सप्टेंबर १९५२)

### लोकशाहीच्या पुनर्घटनेची आवश्यकता

### लोकशाही हा एक 'मंतरलेला' शब्द !

दोन महायुद्धांच्या दरम्यान जी हुकुमशाही राष्ट्रे निर्माण झाली, त्यांच्या उदयापासून जगामध्ये मुख्यत्वेकरून दोन गट पडले आहेत : एक लोकशाही राष्ट्रांचा आणि दुसरा हुकुमशाही राष्ट्रांचा. परंतु त्याचबरोबर लोकशाहीभोवती एक प्रकारचे अद्‌भुत रम्यतेचे वलय निर्माण झालेले आहे. शतकानुशतके चालत आलेल्या लोकशाहीच्या तत्त्वाचा अजूनही इतका प्रभाव आहे की, प्रत्येक राष्ट्र आपण लोकशाही राष्ट्र असल्याचे आवर्जून सांगत आहे; मग देशातील राज्यपद्धती कोणतीही असो! एक गट असे म्हणतो की, भांडवलशाही अर्थव्यवस्थेत लोकशाही नांदूच शकत नाही आणि म्हणून स्टॅलिनचा रशिया व माओचा चीन हीच लोकशाहीची खरी माहेरघरे आहेत. सोवियत रशिया आणि त्याच्या गटातील पूर्व युरोपातील राष्ट्रे स्वतःला 'जनतेच्या लोकशाह्या' म्हणवून घेतात याचे कारण हेच आहे. याच्या उलट, भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांचे म्हणणे असे की, समाजवाद ही गुलामगिरीची पहिली पायरी आहे आणि खरी लोकशाही ही भांडवलशाही समाजरचनेतच रुजू शकेल. यावरून एक गोष्ट सिद्ध होते ती ही की, आजच्या सुसंस्कृत जगात प्रवेश पाहिजे असेल तर लोकशाही हा परवलीचा शब्द झालेला आहे. अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत ज्याप्रमाणे कोणतीही गोष्ट मान्य व्हावयाची म्हणजे ती 'नैसर्गिक' व 'शास्त्रीय' असावी लागे, त्याप्रमाणे विसाव्या शतकात जे लोकशाहीला धरून आहे ते श्रेष्ठ नि कल्याणकारक असावयाचेच, असे जणू काही समीकरणच बनले आहे! लोकशाही ही एक आदर्श जीवनपद्धती झालेली आहे. आजच्या मानवतेने जे अत्यंत प्रिय आणि पवित्र म्हणून उराशी बाळगलेले आहे, त्याचे लोकशाही म्हणजे एक प्रतीक झालेले आहे. मनुष्याच्या आकांक्षांची ती एक ध्वजा आहे आणि आपल्या प्राणांचे मोल देऊनही या लोकशाही ध्वजेचे रक्षण करायला आजचा मानव तयार आहे.

तेव्हा १९४७ साली स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपण लोकशाही पद्धतीचा राज्यकारभार आपल्या देशात सुरू केला हे योग्यच झाले.

### देशी हुकूमशाहीचा धोका

परंतु ही जी लोकशाही आपण आपल्या देशामध्ये अस्तित्त्वात आणली, हिने कोणत्या गोष्टी साध्य केल्या? कित्येक लोक असे मानीत होते की, स्वातंत्र्य हेच जीवनातील उच्चतम मूल्य आहे आणि त्याच्या प्राप्तीबरोबर इतर सर्व मूल्ये आपल्यासमोर हात जोडून उभी राहतील. परंतु या बाबतीत त्या सर्वांची निष्ठुर वंचना झाली आहे! व्यक्तीचे जीवित आणि मालमत्ता सुरक्षित राहणे हा सुसंस्कृत जीवनाचा आधार आहे. पण स्वातंत्र्यप्राप्तीपासून व्यक्तीच्या जीविताची आणि मालमत्तेची शाश्वती कमी झाली आहे. मूलभूत हक्कांच्या बाबतीत आपली स्थिती ब्रिटिशांच्या 'सैतानी' राजवटीत होती तशीच किंबहुना त्याहूनही थोडी वाईटच अशी आहे. असे म्हणणे हे कदाचित देशाभिमानाशी विसंगत असेल, परंतु ते खरे आणि प्रामाणिकपणाचेही आहे. गांधीवादाने भारून गेलेल्या काही राज्य-सरकारांनी लाठीमार करणे, गोळीबार करणे, १४४ कलम पुकारणे याबाबतच्या ब्रिटिश परंपरेत मुळीच खंड पडून दिलेला नाही. अशा परिस्थितीत व्यक्तीच्या ठिकाणी जे काही उच्च नि उदात्त आहे, त्याचा विकास होणे शक्य नाही हे उघड आहे. स्वातंत्र्यप्राप्तीबरोबरच निरनिराळ्या वर्गात आणि हितसंबंधी लोकात धुमसणाऱ्या मतभेदांनी उग्र स्वरूप धारण केले आणि या निरनिराळ्या विचारसरणीच्या लोकांना आणि हितसंबंधी व्यक्तींना सारखा न्याय देणे, निःपक्षपातीपणे वागविणे सरकारला शक्य झाले नाही ही गोष्ट आता जाहीर आहे. सामाजिक न्यायाची प्रस्थापना अजून दूरच आहे. सामाजिक, आर्थिक व राजकीय स्वरूपाची पिळवणूक पूर्वीप्रमाणेच चालू आहे. लाचलुचपत आणि वशिलेबाजी अंगवळणी पडल्या आहेत आणि सत्तांध नोकरशाही तज्ज्ञांचा सल्ला झुगारून मन मानेल तसा धुडगुस घालीत आहे. भाववाढीने मध्यमवर्ग मेटाकुटीला आलेला आहे आणि देशाचे आर्थिक धोरण ठरविण्याबाबत सरकार आणि भांडवलदार यांच्यामध्ये जणू काय एक अपवित्र करारच झाला आहे! अन्नप्रश्नासारखे सार्वराष्ट्रीय प्रश्न तसेच भिजत पडले

अनुक्रमणिका

आहेत. 'न्यू स्टेट्स्मन अँड नेशन' मध्ये (१९-१-५२) श्री. अनिता मलीक यांनी आपल्या 'ॲज इंडिया व्होट्स्' या लेखात म्हटल्याप्रमाणे "टाळता येण्यासारख्या आर्थिक घोडचुका, पैशाच्या गैरव्यवहाराची कुप्रसिद्ध प्रकरणे आणि जगजाहीर झालेले लाचलुचपतीचे आणि वशिलेबाजीचे प्रकार" ही काँग्रेसच्या कारभाराची वैशिष्ट्ये होत. पंडित नेहरू ही सगळी घाण काढून टाकतील असे लोकांना वाटत होते, पण त्याही बाबतीत अपेक्षाभंग झाला आहे.

यावर सत्ताधारी पक्ष असे विचारू शकेल की, "तर मग आज हिंदुस्थानात खरी लोकशाही अस्तित्त्वात नाही काय? आम्ही नेहमी लोकशाही मार्गाचा आणि पद्धतीचाच दक्षतेने अवलंब केलेला नाही काय? गेल्या सार्वत्रिक निवडणुका म्हणजे लोकशाहीचाच एक भव्य प्रयोग नव्हता काय? प्रतिबंधक स्थानबद्धतेच्या कायद्यांवर बरीच टीका होते. परंतु हे कायदे भारतातील सर्वोच्च न्यायालयासमोर तावूनसुलाखून निघालेले नाहीत काय ? आणि ते घटनेशी सुसंगत असल्याचा निर्वाळा त्या न्यायालयानेच दिला नाही काय ? अखेरीस कायदा म्हणजे तरी काय ? जो कायदेमंडळातील बहुमताने एका विशिष्ट ठरलेल्या पद्धतीने संमत केलेला असतो तो कायदा. ही पद्धत काटेकोरपणे पाळलेली असली म्हणजे मग त्या कायद्याने जे ठरते ते योग्य आणि न्याय्य असलेच पाहिजे." परंतु लोकशाहीचा बाह्य आचार आणि तिचे भरीव अंतरंग यात फरक करण्यास सत्ताधारी पक्ष विसरला आहे. घटनेच्या २१ व्या कलमान्वये कोणाही व्यक्तीचे जीवित अगर स्वातंत्र्य "कायद्याने घालून दिलेल्या पद्धतीचा अवलंब केल्या (due process by law) खेरीज " या नेहमीच्या शब्दांऐवजी वरील शब्द वापरण्यात आले आहेत. याचा हेतू असा दिसतो की, कायद्याचा योग्य अवलंब कोणता आणि अयोग्य अवलंब कोणता याची चर्चा करण्यास न्यायालयास जागा राहू नये. मध्यवर्ती सरकारचे एक माजी मंत्री असे म्हणतात की, सत्याग्रह करणे हे लोकशाहीच्या विरुद्ध आहे. मग मिलचे ते अमर शब्द निरर्थकच म्हणावयाचे की काय? तो म्हणतो, "संबंध मानवजात एका बाजूला असेल आणि एकही मनुष्य जर दुसऱ्या बाजूला असेल, तर त्या एका मनुष्याने त्याच्या अंगी बळ असेल, तर संबंध मानवजातीचे तोंड बंद करणे जितके अन्याय्य ठरेल तितकेच मानवजातीने त्या एकट्या मनुष्याचे तोंड बंद करणे चुकीचे ठरेल." कायदेमंडळाने बहुमताने मान्य केलेल्या सर्व गोष्टी ते निवडणुकीने प्रस्थापित झालेले आहे म्हणून योग्य समजावयाच्या असतील, तर मग कायदेमंडळाची तरी काय गरज आहे ? तर्कदृष्ट्या पाहिले, तर निवडून दिलेले कायदेमंडळ जर जनतेचे पुरेपूर प्रतिनिधित्व करू शकते इतके की सरकारविरोधी मतप्रतिपादनही लोकशाहीविरोधी होते - तर मग निवडून दिलेला एखादा माणूसही - जर त्याला आतल्या आवाजाची देणगी आणि ऋषितुल्य सामर्थ्य ही असली - तर जनतेच्या आकांक्षांचे प्रतिनिधित्व का करू शकणार नाही ? गेल्या निवडणुकांत पंडित नेहरूंना मत देता न आल्यामुळे अनेक मतदारसंघातील मतदार निराश होऊन परत गेले. यावरून हेच सिद्ध होत नाही काय की, एखादी व्यक्तीही सबंध राष्ट्राचे यशस्वीरित्या प्रतिनिधित्व करू शकेल? हिंदुस्थानात अजून राजकीय शिक्षणाने मूळ धरले नाही. क्रांतिकालातील ज्या बेशिस्त वागणुकीने आम्ही आमच्या जुलमी राज्यकर्त्यांना हाकलून लावले, ती बेशिस्त वागणूक एवढेच आमचे सध्याचे राजकीय भांडवल आहे. आणि म्हणून आज असा फार मोठा धोका आहे की, परदेशी वर्चस्वाची जागा देशी हुकुमशाही घेईल.

**लोकशाही हे साध्य की साधन ?**

यावरून असा एक प्रश्न उपस्थित होतो की, लोकशाही हे साध्य आहे की, काही विशिष्ट मूल्यांच्या प्राप्तीचे साधन आहे? शुंपिटरने असे आग्रहाने म्हटले आहे की, लोकशाही हे एक निव्वळ साधन आहे आणि लोकशाहीच्या अगदी कट्टर पुरस्कर्त्यांनेही काही विशिष्ट मूल्ये लोकशाहीपेक्षाही अधिक श्रेष्ठ मानली पाहिजेत. लोकशाही म्हणजे काही 'तिळा उघड' सारखा मंत्र नव्हे की, जो जपल्याबरोबर सर्व मूल्ये ऋिद्धिसिद्धीसारखी हात जोडून समोर उभी रहावीत! एखादे वंशाभिमानी लोकशाही राष्ट्र लोकशाहीचा आचार न सोडता इतर वंशाच्या लोकांना मतदानाचा हक्क नाकारील किंवा त्यांना नागरिकत्व देणार नाही. एखादे धर्माधिष्ठित राष्ट्र इतर धर्मीयांना सावत्र मुलांप्रमाणे वागवील किंवा शुंपिटर सांगतो त्याप्रमाणे एखादे काल्पनिक राष्ट्र आपण डोळ्यासमोर उभे केले तर आपल्या असे लक्षात येईल की, ख्रिश्चनांची ससेहोलपट करणे, चेटकींना जिवंत जाळणे, ज्यू लोकांची कत्तल करणे इत्यादि गोष्टी ते राष्ट्र लोकशाहीची पद्धती न सोडताही करू शकेल? मग केवळ लोकशाही पद्धती काटकोरपणे पाळण्यात आली आहे म्हणून आपण या गोष्टींना मान्यता देऊ काय? अशा बाबतीत आपली भूमिका समाजवाद्यांसारखी आहे असे शुंपिटर म्हणतो. समाजवाद्यांच्या दृष्टीने भांडवलशाही ही चेटकींना जाळण्याहूनही किंवा वर्णभेदाहूनही वाईट आहे. आणि म्हणून ती नष्ट करण्याकरिता ते लोकशाहीविरोधी मार्ग अवलंबिण्यासही तयार असतात.

ही जी तुलना शुंपिटरने केलेली आहे तिच्यावरूनच

त्याच्या विचारसरणीतील गर्भित धोका लक्षात येतो. लोकशाही म्हणजे लोकशाही पद्धती नव्हे तर काही विशिष्ट मूल्यांची प्राप्ती असे म्हणणे म्हणजे हुकुमशाहीला मुक्तद्वार देण्यासारखेच नाही काय? प्लेटोच्या तत्वज्ञ राजापासून पुढे जो जो हुकूमशहा झाला तो तो असेच निक्षून सांगे की कोटी, सूर्यांइतक्या तेजाळ अशा सत्य आणि न्याय या दिव्य तत्त्वांचा आपल्याला साक्षात्कार झाला आहे; आणि ही मूल्ये जरूर तर बळाचा उपयोग करूनही अस्तित्वात आणणे हे आपले कर्तव्य आहे! याच दृष्टीने रूसो, हेगेल आणि इतर चैतन्यवादी (Idealists) यांनी असे म्हटले आहे की, मानवांना जर त्यांचे हित, त्यांचे स्वातंत्र्य कशात आहे ते कळत नसेल तर त्यांचे स्वातंत्र्य त्यांच्यावर लादले पाहिजे ('must be forced to be free') फॅसिस्ट राष्ट्रांचे जे नेते होऊन गेले त्यांचीही अशी प्रामाणिक श्रद्धा होती की, आपण आपल्या देवबांधवांच्या वैभवासाठी आणि सुखासाठी झटत आहोत. या विचारसरणीतून जी गोष्ट सूचित होते ती शुंपिटरने मोकळेपणाने मान्य केली आहे. जनतेच्या न्यायासनासमोर येशू ख्रिस्ताला आणण्यात आले तेव्हा हुकुमशाहीचा प्रतिनिधी जो पायलेट तो स्वातंत्र्याच्या आणि सहिष्णुतेच्या बाजूने उभा होता; तर त्या वेळची त्याच्यासमोरील जनता ही व्यक्तिस्वातंत्र्याच्या विरुद्ध, असहिष्णुतेच्या बाजूने उभी होती. शेवटी पायलेटला जनताजनार्दनापुढे लोकशाहीपुढे माघार घ्यावी लागली! ही गोष्ट खुद्द शुंपिटरनेच नमूद केली आहे. (कित्ता पृ. २४) प्रजाहितदक्ष हुकुमशहांना नेहमी लोकांचे त्यांच्यापासूनच रक्षण करण्यासाठी झटावे लागले आहे आणि त्यांनी ज्या सुधारणा घडवून आणल्या त्या अखेरीस लोकांच्या हिताच्याच ठरल्या आहेत.

तेव्हा हा एक मोठा पेच आणि शृंगापत्तीच आहे. लोकशाही हे जर साध्य मानले तर आपल्याला प्रिय असणारी अशी काही मूल्ये नष्ट होतील अशी भीती निर्माण होते. याच्या उलट, लोकशाही हे काही विशिष्ट मूल्यं प्राप्त करून घेण्याचे एक केवळ राजकीय साधन आहे असे मानले तर असा धोका निर्माण होतो की, आपण आपल्या अल्पबुद्धीने जगाची मूल्ये ठरवून जगाचे नियमन करण्याचा मक्ता आपणाकडे घेण्याचे धाष्ट्यं करू!

### रशियामधील प्राचीन ग्रामसंघटना

परंतु सूज्ञ वाचक या ठिकाणी असा प्रश्न विचारील की, लोकशाहीचे बाह्य आचार पाळून तिचे अंतरंगही टिकविणे शक्य नाही काय? लोकशाहीवर एक पद्धती म्हणून सर्वस्वी विश्वास ठेवून, त्या पद्धतीनेच ज्या मूल्यांचे रक्षण व्हावे असे आपल्याला वाटते त्याचे रक्षण करणे शक्य नाही काय? आणि हाच खरोखरी महत्त्वाचा मुद्दा आहे. काही देशांमध्ये काही कालखंडात साध्य आणि साधने यांचा इतका सुंदर मिलाफ झाला होता की, व्यक्तीची उच्चतम मूल्ये साध्य करणे लोकशाहीला शक्य झाले. ग्रीक लोकशाहीविषयीचे पेरिक्लिसचे स्मशानातील भाषण इतके सुप्रसिद्ध आहे की, ते येथे उद्धृत करण्याची काही आवश्यकता नाही. परंतु रशियन 'मिर'चा (प्राचीन रशियांतील गावांचा) कारभार कसा चालत असे याविषयी काही मनोरंजक व उद्बोधक माहिती देणारा उतारा खाली देतो :

"मिरचे निर्णय सर्व सभासदांच्या एकमताने घेतले जातात. जर सभेच्या वेळेस काही लोक विरुद्ध मताचे असेल तर सभा अपूर्ण आणि अयशस्वी मानण्यात येते. बहुमताने निर्णय घेणे शेतकऱ्यांना समजतच नाही. त्यांना एवढेच समजते की, प्रत्येक बाबतीत बरोबर निर्णय एकच असू शकतो आणि सर्वात शहाणा आणि प्रामाणिक मनुष्यच असा निर्णय घेतो. सत्य शोधून काढण्यासाठी सर्व सभासदांनी एकत्र यावयाचे अशी कल्पना असते आणि ते सत्य सापडले तर त्यावरहुकूम सर्वांनी वागले पाहिजे. जर एखाद्या सभासदाचा सर्वानुमते घेतलेल्या निर्णयाला विरोध असेल, तर त्याला एकच मार्ग उघडा राहतो. तो म्हणजे मिरपासून अलग होणे. याचा अर्थ असा की, तेव्हापासून तो गावचा रहिवासी नाही ... मिर हे एखाद्या लाटेप्रमाणे असते. एकाचा विचार तोच सर्वांचा विचार. मिर हा जणू काही कुणी एक मोठा माणूस आहे!"

ग्रीक लोकशाही किंवा रशिया आणि हिंदुस्थान येथील ग्रामसंघटना यशस्वी झाल्या याचे कारण हे समाज लहान लहान होते. या समाजातील व्यक्तीमध्ये एक प्रकारचे साम्य होते. त्यांची जीवनपद्धती, विचारसरणी, आशा-आकांक्षा समान होत्या. त्यांचे प्रश्न साधे व सोपे होते. समाज आणि राष्ट्र यांत काही फरक नव्हता. त्याचप्रमाणे व्यक्तीच्या खाजगी आणि सार्वजनिक आयुष्यातही काही फरक नव्हता. नागरिकत्व म्हणजे सार्वजनिक जीवनामध्ये व राष्ट्रजीवनामध्ये भाग घेणे असा अर्थ होता.

### भांडवलशाही चढाओढीचे घातकी स्वरूप

ग्रीसमधील ही नगरराष्ट्रे नाहीशी झाल्यावर कित्येक शतके लोकशाहीची कल्पना मागे पडली, ती पुन्हा भांडवलशाहीबरोबर उदय पावली. आधुनिक लोकशाही हा भांडवलशाही समाजरचनेचा परिपाक आहे. भांडवलशाही ज्या वेळेस निर्माण झाली, त्या वेळेस ती एक क्रांतिकारी शक्ती होती व तिने सरंजामशाहीच्या शृंखलातून व्यक्तीची सुटका केली.

त्यावेळेस भांडवलशाही हे एक गतिमान, अपारंपरिक आणि सर्व प्रकारच्या वर्चस्वाला विरोध करणारे तत्त्वज्ञान होते. या तत्त्वज्ञानाच्या प्रगतीआड ज्या ज्या मध्ययुगीन संस्था अगर विचारसरणी आल्या त्या भांडवलशाहीच्या जोरदार प्रवाहात लुप्त झाल्या. आणि हे सर्व स्वातंत्र्य, न्याय, समता, 'जास्तीत जास्त लोकांचे जास्तीत जास्त हित' या तत्त्वांच्या नावाने करण्यात आले. भांडवलशाहीने असे एक 'मुक्तद्वार' (open frontier) निर्माण केले की, तेथे जो महत्वाकांक्षेने, उमेदीने आणि उत्साहाने उभा राहील त्याला, तो मिळवू शकेल, त्यापेक्षा किती तरी मोठे भांडार खुले दिसावे! व्यक्तींमध्ये परस्परांच्या हितसंबंधांविषयी संघर्ष निर्माण होण्याचा प्रश्नच नव्हता. कारण प्रत्येकाने स्वतःकरिता जास्तीत जास्त शक्य असेल तितकी संपत्ती मिळविली असती, तरी देशातील संपत्ती अपुरी पडली नसती. स्मिथ म्हणाला त्याप्रमाणे प्रत्येक जण आपापले हित सांभाळीत होता आणि जणु काही कोणाचा तरी अदृश्य हात त्यांच्याकडून सार्वजनिक हिताची जपणूकही करून घेत होता! आणि म्हणून १९ व्या शतकात बऱ्याच काळपर्यंत अशी समजूत होती की, प्रत्येक व्यक्तीला एक एक मत दिले की, चढाओढीच्या अर्थशास्त्राप्रमाणे चढाओढीचे राजकारणही यशस्वी होईल.

अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यांना चढाओढीचे आत्मघातकी स्वरूप काही नवीन नाही. चढाओढीतून नेमकी विरुद्ध गोष्ट निर्माण होते आणि ती म्हणजे मक्तेदारी. पैशाकडे पैसा जातो आणि या पैशाच्या जोरावर सत्ता केंद्रित केली जाते. या सत्तेचा उपयोग पुन्हा संपत्ती मिळविण्याकडे किंवा आणखी सत्ता मिळविण्याकडे करता येईल: आणि याला काही अंत नाही. 'ज्याच्याकडे आहे त्याला आणखी दिले जाईल आणि ज्याच्याकडे नाही त्याच्याकडून जे काही थोडे त्याच्याकडे आहे तेही घेतले जाईल.' असा नव्या भांडवलशाही बायबलाचा कायदा आहे! नाईट म्हणतो त्याप्रमाणे ज्या खेळात जिंकले असता जिंकणाऱ्याची बाजूच अधिक बळकट होते तो खेळ फार काळ चालणार नाही! (नाईट-'एथिक्स ऑफ काँपिटिशन' पृ. २९८). लोकशाही ही साध्य आणि साधन या दोन्ही दृष्टींनी आज अपेशी ठरली आहे.

## खासगी मालमत्तेच्या कल्पनेत क्रांती

आणि लोकशाहीच्या या अपयशातूनच आजच्या पिढीची समस्या निर्माण झाली आहे. आज आपल्याला लोकशाहीची अशा रीतीने पुनर्घटना करावयाची आहे की जीवनाच्या उच्चतम मूल्यांच्या प्राप्तीसाठी आपण लोकशाहीला आपल्या कामी जुंपू शकू. लोकशाहीचा कारभार यशस्वी व्हावा यासाठी कोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे, त्याची यादी कोठच्याही राजकारणावरील पाठ्यपुस्तकात आढळेल. त्या यादीचा सारांश असा की, व्यक्तीचे नैतिक आणि अध्यात्मिक पुनरुज्जीवन घडवून आणणे आवश्यक आहे. राजकारणातील ही जी 'मानवी' साधनसामग्री आहे ती उच्च दर्जाची पाहिजे असे शुंपिटर म्हणतो. परंतु मनुष्याला नैतिक बनवायचा कसा? याबाबत ज्या दोन विचारसरणी आहेत त्या दोहोंपासून आपण सावध राहिले पाहिजे. पहिली विचारसरणी अशी की, मनुष्य स्वतः विचार करून, चिंतन-मननाने आत्मपरिवर्तन घडवून आणू शकतो आणि हेच खरे व्यक्तीचे परिवर्तन होय. कारण खरी क्रांती ही मानसिकच असते. ही विचारसरणी चैतन्यवाद्यां (Idealists) ची आहे. परंतु हे चैतन्यवादी हे विसरतात की, विचार किंवा परिवर्तनाच्या कल्पना काही आकाशातून पडत नाहीत. एखाद्यादुसऱ्या व्यक्तीने उत्स्फूर्तपणे जादूगारासारखी हवेतून तत्त्वे काढावीत असे कधीच होत नाही. उलट मॅनहाइम म्हणतो त्याप्रमाणे प्रत्येक व्यक्तीला असे दिसून येते की, एका विशिष्ट परिस्थितीला अनुरूप अशा विचारप्रणालीचा आपणाला वारसा मिळालेला आहे. यातूनच दुसऱ्या विचारसरणीचा म्हणजे भौतिकवादाचा उगम होतो. भौतिकवाद्यांचे म्हणणे असे की, मानव हे परिस्थितीचे 'अपत्य' आहे आणि म्हणून परिस्थिती बदलल्याखेरीज व्यक्तीला बदलणे शक्य नाही. परंतु परिस्थिती तरी व्यक्तींनी केलेल्या कार्याखेरीज दुसऱ्या कशाने बदलणार? ज्याप्रमाणे मनुष्य स्वतःचे केस धरून स्वतःला उचलू शकत नाही, त्याप्रमाणे परिस्थितीही आपोआप बदलू शकत नाही. खरी गोष्ट ही की, व्यक्ती आणि परिस्थिती ह्या परस्परावलंबी आहेत. त्यांच्यामध्ये क्रिया व प्रतिक्रिया सतत चालू असते. परिस्थिती आणि मानव यांमधील क्रियाप्रतिक्रियांचे नियम किंवा परिस्थितीविशिष्ट मानवा (man-in-milieu) मधील होणाऱ्या परिवर्तनाचे सर्वसाधारण नियम बसविण्याचा मार्क्सवादाचा स्फूर्तिशाली प्रयत्न आहे. परंतु आपण मार्क्सवादी असलो अगर नसलो तरी एक गोष्ट आपल्याला मान्य करावीच लागते. ती ही की, आपल्या सामाजिक उत्क्रांतीतील पुढली पायरी म्हणजे खासगी मालमत्तेवर आधारलेल्या संबंधांमध्ये मूलगामी क्रांती घडवून आणणे ही होय.

खाजगी मालमत्ता आणि खाजगी उद्योगधंद्यांचे स्वातंत्र्य यांवर आधारलेल्या आत्मघातकी चढाओढीला मान्यता देणाऱ्या समाजरचनेची वर केलेली मीमांसा जर बरोबर असेल तर खाजगी मालमत्तेबाबत काहीतरी बदल तातडीने घडवून आणणे

अत्यावश्यक झाले आहे हे मान्य होण्यास हरकत नाही. यात क्रांतिकारक असे काही नाही. मानवाच्या खासगी मालमत्तेच्या कल्पना प्राचीन काळापासून बदलत आलेल्या आहेत. जी मालमत्ता आपल्या मालकाला हजारो व्यक्तींच्या जीवनावर, स्वातंत्र्यावर आणि सुखावर अधिकार गाजविण्याचे सामर्थ्य देते ती 'खाजगी' नव्हे हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. तेव्हा जेणेकरून खाजगी मालमत्ता ही खरोखरच खाजगी होईल असे काही निर्बंध तिच्यावर घालणे आवश्यक आहे. असे निर्बंध घातले गेले तर त्याचा व्यक्तीच्या स्वभावावर आणि जीवनाविषयक दृष्टिकोनावर फार मोठा परिणाम होईल.

जेथे वैज्ञानिक यंत्रविषयक प्रगती उच्च कोटीला गेली आहे अशा आधुनिक भांडवलशाही समाजात उत्पादन हे केवळ वैयक्तिक राहिले नसून ते अनेक व्यक्तींच्या सहकार्यावर आधारलेले, सामूहिक असे झाले आहे. ही वस्तुस्थिती असताना, उत्पादनसाधने व्यक्तीच्या खाजगी मालकीची राहिली तर समाजात संघर्ष होणे अटळ आहे. उत्पादनसाधनांवरील भांडवलशाहीतील वैयक्तिक मालकीमुळे मजुरीला मोताद झालेला लाचार मजूरवर्ग गुलामगिरीत पडला आहे. या कामगार वर्गाजवळ स्वतःचे असे काही नसून तो मालमत्ताविहीन बनला आहे. मालमत्ता किंवा मालमत्तेवरील स्वामित्त्व हाही एक व्यक्तीचा हक्क मानून इतर हक्कांप्रमाणे समाजाने आत्तापर्यंत त्याला मान्यता दिली असली तरी त्या हक्कामुळे समाजाचे जर अकल्याण होत असेल तर त्या हक्कावर बंधन घालावयाचा समाजाला अधिकार आहे. रोमन कायद्याप्रमाणे जर असे कोणी म्हणेल की, 'ही माझी मालमत्ता आहे. तिचा सदुपयोग वा दुरुपयोग करावयाचा मला अनिर्बंध हक्क आहे.' तर ते चूक आहे. मालमत्तेवर खाजगी अनियंत्रित हक्क कोणाही व्यक्तीला देता येणार नाहीत. खाजगी मालमत्ता संपूर्ण नाहिशी करणे आज कदाचित सर्व लोकांना आवडणार नाही. त्याकरिता मालमत्तेच्या स्वामित्वाच्या स्वरूपात बदल करावा लागेल. प्रत्यक्ष मालमत्ता आणि तिचा ताबा आणि उपभोग ही भिन्न करावी लागतील. व्यक्तीला मिळावयाच्या उत्पन्नाची कमाल मर्यादा ठरवून मग त्या उत्पन्नाचा उपभोग घेण्याचे जास्तीत जास्त स्वातंत्र्य त्या व्यक्तीला देणे उचित होईल. टूथब्रश, अंडरवेअर यासारख्या स्वतःच्या नित्याच्या उपयोगी वस्तू स्वतःची खाजगी मालमत्ता समजावयास हरकत नसावी. मालमत्तेच्या योगाने स्वतःचा वैयक्तिक विकास तर साधला पाहिजेच, पण त्याचबरोबर मालमत्ता हे इतरांवर जुलूम करावयाचे साधन बनता कामा नये.

समाजाची बाह्य रचना आणि अंतर्गत आशय, समाजातील पद्धती आणि अंतर्गत सामाजिक मूल्ये या दोन्ही घटकांचे अविभाज्य ऐक्य लोकशाहीत झाले पाहिजे. प्राचीन ग्रीक लोकशाहीच्या काळी समाजजीवन साधे असताना, त्याचप्रमाणे भांडवलशाहीच्या उदयकालीही, लोकशाहीची बाह्य रचना आणि अंतर्गत आशय या दोन्हीही बाबतीत लोकशाहीचे एकपक्षीय हुकुमशाही (Totalitarianism) मध्ये परिवर्तन होत आहे. समाजवादच स्थापन झाला तरच फक्त त्या समाजवादाच्या परिस्थितीतच, लोकशाही खरी अंतर्बाह्य लोकशाही - स्थापन होईल.



(पृष्ठ ६७ वरून)

## आव्हाने

**वास्तविक डाव्यांनी अधिकाधिक कल्याणकारी धोरणांची मागणी पुढे रेटली पाहिजे. शिक्षण, आरोग्य, धान्य-पुरवठा, अशी एकामागून एक क्षेत्रे कल्याणकारी धोरणाच्या कक्षेत आण-ण्याचा आग्रह धरायला हवा. कारण त्यामागे एक अंतःसूत्र आहे. एखादे क्षेत्र कल्याणकारी धोरणाच्या चौकटीत आणणे याचा अर्थ त्या प्रमाणात साधन-सामग्रीची, वितरणाची आणि निर्णयाची प्रक्रिया 'सार्वजनिक' बनविणे असा होतो.**

**राजकीय व्यवहारांचा मध्यबिंदू आज उजवीकडे सरकला आहे. या उजवीकडे झुकलेल्या चौकटीत डावे राजकारण करण्याचे आव्हान आज उभे आहे.**

**समानतेचा मुद्दा हा केवळ राज्य-संस्थेच्या राजकारणापुरता मर्यादित राहून**

(पृष्ठ ७८ वर)

# लोकशाही विकेंद्रीकरणाची समस्या : १

प्रा. गोवर्धन पारीख

(नवभारत नोव्हेंबर १९६०)

लोकशाही विकेंद्रीकरणाच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी महाराष्ट्र राज्याने एक समिती नेमली आहे. बलवंतराय मेहता समितीच्या अहवालाच्या अनुषंगाने राज्यातील आजच्या स्थानिक संघटनांची पुनर्घटना कशी करायची व त्यांना कोणते व कितपत अधिकार द्यायचे याबद्दल समितीने शिफारशी करावयाच्या आहेत. समितीच्या कामाला आरंभ झाल्यापासून या विषयाच्या चर्चेला नव्याने चालना मिळाली आहे. त्या संबंधाने काही महत्त्वाचे वाटणारे प्रश्न उपस्थित करणे व विचारांसाठी काही सूचना पुढे मांडणे असा मर्यादित हेतू प्रस्तुत लेखनांत अभिप्रेत आहे.

लोकशाही विकेंद्रीकरण हा एक अत्यंत मौलिक स्वरूपाचा प्रश्न आहे. तो जसा जिव्हाळ्याचा तसाच अडचणीचा व धोक्याचाही आहे. त्याबाबत एकदा टाकलेले पाऊल सुधारणे वा मागे घेणे अत्यंत कठीण आहे व ते चुकीचे ठरल्यास त्यातून गोंधळ व पाच दहा वर्षांची पीछेहाट हीच पदरात पडण्याचा संभव आहे. केवळ उत्साह व सद्‌हेतु यांच्या आधारावर हाताळता येण्याजोगे त्याचे स्वरूप साधे, सरळ वा सोपे नाही. म्हणून खुली चर्चा व विवेक, सावधपणा व जबाबदारी यावर आधारित कृती यांनाच याबाबतीत महत्त्व मिळाले पाहिजे.

### सदोष कल्पना

"लोकशाही विकेंद्रीकरण" या शब्दप्रयोगावरून सूचित होणारी कल्पना सदोष वाटते हे आरंभीच स्पष्ट करणे जरूर आहे. हा शब्दप्रयोग अनेक वेळा वापरला जातो, मेहता समितीने व राज्य सरकारनेही तो वापरला आहे हे खरे. परंतु त्यामुळे होणारा अर्थबोध व तज्जन्य मानसिक प्रक्रिया विचारात घेतल्यास त्याऐवजी "विकेंद्रित लोकशाही" हा शब्दप्रयोग अधिक उचित व ग्राह्य मानावा लागेल. साम्यवादातील "डेमोक्रेटिक डिसेंट्रलायझेशन" च्या विरोधी कल्पना "डेमोक्रेटिक डिसेंट्रलायझेशन" ही नसून "डिसेंट्रलाइज्ड डेमोक्रसी" या शब्दांनीच ती अधिक चांगल्या रीतीने व्यक्त होते. अवास्तव महत्त्व पावलेले "सेंट्रलायझेशन" हे जसे लोकशाहीस मारक ठरते, तसेच "डिसेंट्रलायझेशन" तिच्या विभाजनाला जबाबदार ठरण्याचा संभव आहे.

हा केवळ शब्दाचा प्रश्न नाही. लोकशाही विकेंद्रीकरण या शब्दांवरून राज्य व केंद्राकडून गावाकडे सत्ता देण्याचीच कल्पना प्रामुख्याने सूचित होते व असे सत्तासंक्रमण म्हणजेच लोकशाही असा समज दृढ होतो. "लोकशाही हवी ना, तर मग सारी सत्ता गावाला द्या." अशा तऱ्हेची वेळोवेळी होणारी घोषणा हेच स्पष्ट दर्शवते. हा विचार अत्यंत मर्यादित अर्थानेच खरा आहे. गावाकडे सर्व सत्ता देणे तर राहोच; पण अशा प्रकारच्या मर्यादित सत्तासंक्रमणात देखील जशी लोकशाही दृढ होण्याची शक्यता आहे तशीच सामाजिक विभाजनाची देखील भीती आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे वरील मागणी करणारे बहुधा गावाच्या पातळीवर मात्र शासनात्मक, आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक इ. सर्व प्रकारचा व्यवहार एकाच संघटनेमार्फत चालला पाहिजे असा आग्रह धरताना आढळतात. संघराज्य वा राज्य यांच्याप्रमाणेच गावाच्या पातळीवरदेखील तेथील मर्यादित का होईना पण केंद्रीकरण संभवते ही गोष्ट त्यांच्या नजरेतून पूर्णतया निसटते. केंद्रीकरण म्हणजे दिल्ली वा मुंबईची सत्ता हा अत्यंत मर्यादित अर्थाने खरा पण बव्हंशी चुकीचा समज दृढ होतो. केवळ भौगोलिक विकेंद्रीकरणाचा हा मर्यादित व एकांगी विचार अत्यंत जुजबी व अपुरा आहे. दिल्ली वा मुंबईचे केंद्रीकरण हे जसे लोकशाहीस विघातक तसेच गावातील एखाद्या "दादा"च्या हाती होणारे केंद्रीकरणही समजले पाहिजे. केंद्रीकरण व विकेंद्रीकरण हे हुकुमशाही व लोकशाही यांच्याशी जुळणारे समान व्याप्तीचे व स्वरूपाचे शब्द नव्हेत. गावातील दादागिरीला आळा घालणारा केंद्रीय हस्तक्षेप हा लोकशाहीस बाधक नसून पोषकच मानावा लागेल.

याउलट विकेंद्रित लोकशाहीत सामान्य नागरिकांचे लक्ष्य सत्तेवर केंद्रित न होता ते मूल्ये, कार्यक्षमता, कार्यपद्धती इ. कडेच आकर्षित होण्याचा संभव आहे. या दृष्टिकोनातून विकेंद्रीकरण हा केवळ स्थानिक संस्थांना सत्ता वा अधिकार देण्याचा प्रश्न रहात नाही. स्थानिक पातळीवर लोकशाही रूजावी, तिने मुळे धरावीत व देशातील लोकशाहीला भक्कम पाया निर्माण व्हावा यासाठी उपयोगी पडणारे ते एक महत्त्वाचे










अनुक्रमणिका

साधन बनते. त्याबरोबरच कोणत्याही पातळीवरील केंद्रीकरण हे अनिष्टच होय हेही त्या योगाने स्पष्ट होते.

**परंपरेची पार्श्वभूमी**

भारतात ग्रामराज्यांची अत्यंत जुनी व दीर्घकालीन परंपरा असल्यामुळे येथे लोकशाही विकेंद्रीकरणाच्या आधारावरच रुजू शकेल. आमच्या लोकशाहीचे हेच वैशिष्ट्य असले पाहिजे. त्या योगानेच तिचे स्वरूप येथील जीवनाशी संवादी बनू शकेल असे विकेंद्रीकरणाच्या पुरस्कर्त्यांचे काही वेळा म्हणणे असते. हा दृष्टिकोन सकृतदर्शनी बरोबर वाटला तरी त्यात काही अडचणी आहेत व म्हणून तो तपासून घेणेच उचित होईल.

ग्रामराज्यांची ही परंपरा संघटित मध्यवर्ती शासनाच्या अभावाचीही परंपरा होय. यामुळे तिच्यात स्वयंपूर्ण खेडे अभिप्रेत होते. आजच्या सामाजिक जीवनाची कोणतीही बाजू ध्यानात घेतली तरीही स्वयंपूर्णतेची कल्पना स्वप्नमय वाटल्यावाचून रहात नाही. तिचा पुरस्कार करणाऱ्याला केवळ केंद्रीकरणच नव्हे तर सर्वच आधुनिक जीवनाचा त्याग करण्यास तयार व्हावे लागते व त्याचा स्वप्नाळूपणा स्पष्ट होतो. उलट, वस्तुस्थितीची दखल घ्यायची म्हणजे संघटित मध्यवर्ती सत्तेची गरज स्वीकारणे भाग पडते व परंपरागत खेड्याऐवजी व्यापक राष्ट्रीय पातळीवरील संघटित लोकशाहीचा पाया म्हणून खेड्याचा विचार करावा लागतो. केंद्रीय शासनाचा खेडे हा पर्याय रहात नाही उलट ते आधार बनते. खेडे मजबूत करण्याची गरज आहेच पण तसे करण्यात काही वेळा अंतर्भूत होणारी सामाजिक विभाजनाची संभाव्यता या दृष्टिकोनामुळे टाळता येते. तात्पर्य, आजच्या विकेंद्रीकरणाच्या विचारात परंपरागत खेड्याची पुनर्निर्मिती अभिप्रेत नसून नव्या खेड्यांच्या निर्माणाचा तो विचार आहे.

परंपरागत गावाची कल्पना सामाजिक स्थैर्य सूचित करणारी आहे हे खरे पण तिच्यात प्रगमनशीलता, प्रवाह वा गति यांचा अभावच आढळतो. बव्हंशी स्वयंपूर्णतेलाच प्राधान्य दिले गेल्या कारणाने दारिद्र्य, जीवनाची खालावलेली पातळी, तंत्रविद्या व शिक्षण यांची अत्यंत जुजबी वा तुटपुंजी अवस्था ही त्यात अपरिहार्यपणे स्वीकारावी लागतात. उलट आज या सर्व गोष्टी नाहीशा व्हाव्यात अशा म्हणजे विकासाच्या दिशेने पावले टाकली जात आहेत. विकासाचा अर्थच मुळी असा आहे की त्या योगाने गावाचे अन्य गावांशी, शहराशी व राज्याशी व संघराज्यांशी हजारो निरनिराळ्या धाग्यादोऱ्यांनी संबंध जोडले जावे. स्थानिक पातळीवरील शेती, जनावरांची निगा, स्वच्छता, आरोग्य, रस्त्यांची बांधणी , शिक्षण इत्यादी एकही कार्यक्षेत्र असे नाही की, ज्यातील आपली जबाबदारी पार पाडण्यासाठी गावाला इतरांवर या ना त्या रूपाने अवलंबून रहावे लागू नये. म्हणून सर्व अधिकार गावाला द्या. सारी सत्ता गावाकडे राहिली पाहिजे इत्यादी विधाने बव्हंशी अर्थशून्य घोषणांच्या स्वरूपाची ठरतात. गाव हा विकासाचा पाया असल्याने राष्ट्रीय वा प्रादेशिक विकासकार्याची गती बऱ्याच अंशी गावाच्या उत्साहावर, क्षमतेवर, प्रयत्नावर अवलंबून राहील हे खरे. पण त्याबरोबरच सगळाच विकास गावाच्या पातळीवर साधता येणार नाही हेही तितकेच खरे आहे. म्हणून विकेंद्रीकरणाचा प्रश्न हा मुख्यत्वे गावाला सत्ता देण्याचा प्रश्न नाही; त्याचे स्वरूप यापेक्षा अधिक गुंतागुंतीचे आहे. आपल्या सर्वांगीण विकासाचे आपल्या कक्षेतील प्रयत्न करणे, अन्य पातळीवरील विकासप्रयत्नांना सर्व प्रकारे शक्य ते सहाय्य देणे असे गावाच्या कार्याचे दुहेरी स्वरूप बनते व विकासकार्यांच्या जबाबदारीचा आपला वाटा उचलीत असताना त्याबरोबर गावाच्या पातळीवर सुरू असलेल्या प्रयत्नांना सर्व प्रकारचे उत्तेजन, सहकार्य व सहाय्य देऊन त्यांच्या यशस्वितेसाठी अनुकूल वातावरण निर्माण करण्याची जबाबदारी इतरांवर पडते. ही जबाबदारी तालुका, गट, जिल्हा, राज्य, संघराज्य इत्यादी पातळीवर विभागली जाईल हे खरे. पण यातील बव्हंशी वाटा राज्यसरकारलाच उचलावा लागेल, मग तो प्रत्यक्ष असो वा अप्रत्यक्ष!

**आणखी एक बाजू**

विकेंद्रीकरणाचा विचार करताना आणखी एक बाजू ध्यानात घेणे जरूर ठरते. या प्रश्नासंबंधी लोकशाहीवर श्रद्धा असणारांमध्ये देखील दोन आत्यंतिक भूमिका आढळतात हे प्रसिद्ध आहे. काहींचा या कल्पनेला अत्यंत तीव्र स्वरूपाचा विरोध असून या बाबतीत तूर्त तरी अधिक काहीही करता कामा नये असे त्यांचे आग्रहाचे म्हणणे आहे. या भूमिकेचे समर्थन काही वेळा अनुभवातून होणाऱ्या चुका, गुंडगिरी, वशिलेबाजी, लाचलुचपत इत्यादि सामान्य कारणांच्या आधाराने करण्यात येते व विकेंद्रीकरणाच्या पुरस्कर्त्यांकडून या सर्व विधानांना काहीसे रास्त तर काहीसे भावनामय, कटु किंवा आव्हानात्मक उत्तरहि मिळते. या वादात येथे पडण्याचे कारण नाही. तूर्त वरील आत्यंतिक भूमिकेच्या मुळाशी असलेल्या एका प्रश्नाचाच थोडक्यात ऊहापोह करणे इष्ट होईल व तो प्रश्न म्हणजे गावात आढळणारा सामाजिक एकजिनसिपणाचा अभाव हा होय.

हाच मुद्दा जातिसंस्थेचे प्राबल्य या स्वरूपात मांडण्यात येतो. जातीय भावना ही सामाजिक उच्चनीच श्रेणीवरील या








अनुक्रमणिका

उतरंडीवरील श्रद्धेपासून अलग करता येत नाही. ही श्रद्धा कायम असल्यास तिच्या योगाने ग्रामसमाजाची धारणा होऊ शकते. पायरीला पाय न लावणे ही अशा धारणेची मौलिक गरज असते. आजच्या ग्रामीण समाजात ही श्रद्धा जवळजवळ नष्ट झाली आहे हे उघड आहे व अत्यंत उचितही आहे. तथापि उतरंडीवरील श्रद्धेचा ऱ्हास हा जातीय भावनेचा ऱ्हास होय असे समीकरण मांडता येत नाही ही खरी अडचण आहे. उलट गेल्या दहावीस वर्षात जातीय भावना कितीतरी अधिक प्रवळ झाल्याचेच दिसून येते व या दोन प्रवृत्ति (उतरंडीवरील श्रद्धेचा ऱ्हास व जातीय भावनेची वाढ) एकत्र ध्यानात घेतल्या म्हणजे त्यातून सामाजिक विभाजन हाच निष्कर्ष निघू शकतो. ग्रामशासनाची उभारणी डोईस एक मत या तत्त्वावर झाली की त्याचे सर्व निर्णय हे लोकशाही निर्णयच समजले पाहिजेत हा एक अत्यंत औपचारिक व अपुरा विचार आहे. उलट सर्व निर्णय एकमताने घ्यावेत हा अनाठायी आदर्शवादी आग्रह आहे. चिठ्ठ्या टाकून निवडणुका वा निर्णय घेणे ही तर बुद्धीच्या पराभवाचीच कबुली वाटते. तात्पर्य, एकजिनसीपणाच्या अभावातून उद्भवणारी भीती आजच्या परिस्थितीत तरी बरीचशी रास्त ठरते. डोईस एक मत ही जशी लोकशाहीची गरज आहे तशीच व तितकीच महत्त्वाची गरज म्हणजे संघटित स्वरूपाच्या "कायमच्या" बहुमत-अल्पमताचा अभाव ही होय. जातीय भावनेमुळे ही दुसरी गरज पूर्ण होऊ शकत नाही; उलट ग्रामीण जीवनात संघटित गटांतील कलहांचा प्रादुर्भाव होण्याची शक्यता बळावते. मतदान व निवडणुकी यातून हे कलह निर्माण होतात हे विधान पटू शकत नाही. कलहांचा उद्भव ज्या सामाजिक पार्श्वभूमीत मतदान व निवडणुका होतात तिच्यात आहे. मतदान व निवडणुका टाळणे कठीण आहे; किंबहुना तसे करण्याची गरजही नाही. त्यांच्यासंबंधीचा दृष्टिकोन सुधारण्याची खरी आवश्यकता आहे. मतदान हे केवळ अधिकार कोणी चालवावा हे ठरविण्याचे साधन नव्हे; अधिकारक्षेत्राचे स्वरूप, त्यातील विविध प्रश्नोपप्रश्न व त्यासंबंधीचे भिन्नभिन्न दृष्टिकोन, बहुमताने निर्णय घेण्याच्या पद्धतीचे इष्टत्व व तिच्या मर्यादा आणि निर्णय अमान्य असणारांचे - मग ते एक असोत की अनेक - तो बदलून घेण्यासाठी बहुमत तयार करण्याचे स्वातंत्र्य अबाधित राखण्याची मौलिक गरज इत्यादी बाबतीत नागरिकांना शिक्षण देण्याचेही ते एक महत्त्वाचे साधन आहे. तात्पर्य, लोकशाहीची मूल्ये व व व्यवहार यांचे जतन करणे व ती सतत अधिकाधिक खोल रुजत जातील अशा प्रकारच्या कार्यपद्धतीचा अवलंब करणे हे ग्रामशासनाच्या विकासाचे एक महत्त्वाचे गमक समजले पाहिजे. विकेंद्रीकरण हा केवळ शासनात्मक प्रश्न नसून तो एक महत्त्वाचा लोकशिक्षणाचा प्रयोग आहे ही जाणीव नेहमी कायम राहिली पाहिजे.

**नियोजनाची गरज**

विकेंद्रीकरणाचा हेतू स्पष्ट करताना देशातील आजच्या आर्थिक नियोजनाची ती एक महत्त्वाची गरज आहे असे म्हटले जाते. "पहिल्या दोन्ही पंचवार्षिक योजनांच्या बाबतीत जनतेचे अपेक्षित सहकार्य मिळू शकले नाही; उलट, उत्साहाऐवजी उदासीनतेचा प्रत्यय आला. लोकशाही नियोजनाच्या दृष्टीने ही परिस्थिती अत्यंत अनिष्टच समजली पाहिजे. म्हणून ती सुधारण्यासाठी तावडतोब उपाययोजना करणे आवश्यक आहे. योजनेची अंमलबजावणी करण्याच्या कामात जनतेला सहभागी होता आल्यास तिच्या ठिकाणी योजनेबाबत उत्साह निर्माण होऊ शकेल. असा भाग घेण्याची संधी सामान्य जनतेला प्राप्त व्हावी यासाठी लोकशाही विकेंद्रीकरण हा मार्ग होय." असे याबाबतच्या विचारसरणीचे स्थूल स्वरूप सांगता येईल.

हा दृष्टिकोन अत्यंत महत्त्वाचा आहे याविषयी दुमत होण्याचे कारण नाही. योजनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी स्थानिक संस्थांवर टाकायची म्हणजे त्यासाठी साधनेही त्यांना प्राप्त झाली पाहिजेत हे उघड आहे. राज्याने संपत्ती गोळा करायची व मग ती स्थानिक संस्थांना अनुदानांच्या रूपाने पुरवायची ही पद्धत काहीशी अपरिहार्य असली तरी काही प्रमाणात अकारण त्रासाची व खर्चाची आहे. त्याऐवजी विशिष्ट प्रकारचे कर वसूल करण्याची व गोळा होणारा पैसा वापरण्याची मुभा स्थानिक संस्थांना देणे आवश्यक आहे. विकेंद्रीकरणाच्या उपक्रमात हे मान्य केले गेले आहे व त्यामुळे त्यासंबंधी होत असलेला विचार बराच व्यापक झाला आहे हेही उघड आहे.

तथापि योजनेच्या संदर्भात बोलायचे झाल्यास वरील दृष्टिकोनात एक महत्त्वाची अडचण प्रत्ययास येते. अंमलबजावणीची किंवा योजना पूर्तीची जबाबदारी म्हणजे विकासखर्च करण्याची जबाबदारी असे सामान्यत: समीकरण मांडले जाते. साधनसामुग्री उभारण्याच्या कल्पनेचा त्यात बहुधा अंतर्भाव केला जात नाही. एकदा विनिमय किंवा खर्च ही योजनेतील मध्यवर्ती कल्पना मानली गेली की अंमलबजावणीची जबाबदारी म्हणजे खर्च कोणी करावयाचा या विषयीचा अधिकार हा विचार आपोआप पुढे येतो व ओढाताणीस आरंभ होतो. गावाला हा अधिकार दिल्यास त्यातून गुंडगिरी, वशिलेबाजी, लाचलुचपत इत्यादींची वाढ होईल अशी भीती व्यक्त केली जाते. एकीकडे हे हक्क मर्यादित स्वरूपातच दिले पाहिजेत, वरील

अनिष्ट गोष्टींपासून ग्रामपंचायतीचा व्यवहार सुरक्षित राहील याबद्दलची तरतूद (सेफगार्डस्) ठेवलीच पाहिजे असा आग्रह धरला जातो व दुसरीकडे अशा तरतुदी किंवा मर्यादा ही जनतेच्या स्वातंत्र्यावरील बंधनेच होत, ही खरीखुरी लोकशाही नव्हे. विकेंद्रीकरणाचा हा केवळ आभास किंवा देखावा आहे अशा प्रकारची हाकाटी सुरू होते. या दोन दृष्टिकोनातील एखाद्या विशिष्ट अवस्थेत साधलेला समेट हा दोन्ही बाजूंना असमाधानकारक वाटण्याचा व म्हणून दोन विरुद्ध दिशांनी ताणला जाण्याचाच संभव अधिक; यामुळे प्रत्यक्ष व्यवहारात तो निरुपयोगी ठरतो. जनतेत त्या योगाने उत्साह निर्माण होण्याऐवजी असंतोष, कार्याविषयी अविश्वास वा तुच्छता, प्रसंगी विरोध, याच भावना वाढीस लागतात व विकासकार्य हे अडचणीच्या भोवऱ्यात सापडते.

### विकेंद्रीकरणाचा मार्ग

विकेंद्रीकरणाचा मार्ग हा या भोवऱ्यातून बाहेर पडण्याचा मार्ग असला पाहिजे. गेल्या दोन योजनांचा परिणाम म्हणून जनतेच्या सुप्त शक्ती आता जागृत होऊ लागल्या आहेत, शथिल्याचे स्थान प्रयत्नशीलता घेत आहे, दारिद्र्य व अज्ञान यांच्या बंधनातून मुक्त होण्यासाठी आवश्यक त्याग व श्रम करण्यास लोक तयार होत आहेत असे काहीवेळा म्हटले जाते व ते काही प्रमाणात खरेही आहे. परंतु त्याबरोबरच वर उल्लेख केलेली पार्श्वभूमी ध्यानात घेतल्यास या वरवर आढळणाऱ्या जागृतीत निरोगी व रचनात्मक भाग किती व केवळ अधिकार किंवा सत्ता लालसेतून जन्मलेला रोगट भाग किती, यासंबंधी शंका येणे शक्य आहे. या जागृत होऊ लागलेल्या शक्तींचा रचनात्मक आविष्कार व्हावा, त्यांना इष्ट ते वळण लागावे व त्यांची सतत जोपासना व वाढ होईल अशी तरतूद असावी या दृष्टीने विकेंद्रीकरणाकडे पाहिले पाहिजे. संघटनेपेक्षा कार्याला, खर्चापेक्षा क्षमतेला, ठरावीक कामापेक्षा नवीन उपक्रमाला, सत्तेविषयीच्या जागरूकतेऐवजी जबाबदारीच्या व सहकार्याच्या भावनेला व प्रातिनिधिकता व बहुमत यांच्यापेक्षा माणुसकी, एकजिनसीपणा व खेळीमेळीचे निर्णय यांना त्यात अधिक महत्त्व दिले गेले पाहिजे.

लोकशाही खोलवर रुजलेल्या व विकासाला अनुकूल मनोभूमिका असलेल्या स्थानिक संस्थांची परंपरा येथे असती तर हा प्रश्नच उद्भवण्याचे कारण नव्हते. जुनी परंपरा किंवा अलीकडील इंग्रजी राजवटीतील इतिहास यांची उजळणी येथे करण्याचे कारण नाही. तथापि या पार्श्वभूमीतून निघणारे एकदोन वादातीत निष्कर्ष येथे नमूद करण्यास हरकत नाही. अधिकारांचा वापर करण्याचे, जबाबदारी स्वीकारण्याचे, लोकशाही पद्धतीनुसार काम करण्याचे प्राथमिक शिक्षण घेण्याची केंद्रे म्हणजे स्थानिक संस्था होत अशी सर्वमान्य भूमिका आहे. त्यात आजच्या परिस्थित्यनुरूप विकासशीलतेची कल्पना भरीस घालणे आवश्यक आहे. त्यामुळे स्थानिक संस्थांच्या अधिकारांचे व जबाबदारीचे क्षेत्र ठरावीक कामापुरते मर्यादित न रहाता सतत वाढत जाणारे बनेल हे उघड आहे. दुसरे म्हणजे या दृष्टिकोनातून पहायचे म्हटल्यास सर्व ग्रामसंस्थांना सारखेच लेखता येत नाही, एकाच मापाने मोजता येत नाही ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. विकेंद्रीकरणाविषयी आज बव्हंशाने होणारा विचार हा समतेच्या या सदोष व यांत्रिक व्यवहारावर आधारलेला आहे. राज्याने स्थानिक संस्थांची जोपासना करायची म्हटले की त्यांना कायद्याने विशिष्ट हक्कांचे, अधिकारांचे व जबाबदारीचे स्थान देण्याची कल्पना आलीच, व मग हे स्थान निश्चित करताना एकीकडून उत्तम प्रकारे चाललेल्या व दुसरीकडून विविध दोषांनी भरलेल्या ग्रामसंस्थांचे दाखले पुढे येऊ लागले की गोंधळ उडाल्यावाचून राहत नाही. या गोंधळातून बाहेर पडण्यासाठी पळवाटाही अनेक काढल्या जातात. "काहीच करण्याची गरज नाही" हा एक सूर तर "अधिकार दिल्यावाचून वापर करता येणार कसा, पाण्यात पडल्यावाचून पोहता कसे येणार?" हा दुसरा. निष्क्रियतेचा आदेश या बाबतीत त्याज्यच होय. परंतु त्यावरून कृतीत सावधपणा असू नये असे मात्र सूचित होत नाही. पाण्यात पडल्यावाचून पोहता येत नाही हे खरे, परंतु याचा अर्थ एखाद्या नवशिक्याला महापुराच्या पाण्यात टाकावे असा नाही. त्यासाठी प्रथम लहानसे तळे वा विहीरच पाहिजे, त्यातही पाण्याची खोली क्रमशः वाढत गेल्यास उत्तम; व सर्वात महत्त्वाची गरज म्हणजे प्रसंगी बाहेर काढू शकेल अशा उत्तम पोहणाराचे सान्निध्य! या सर्व गोष्टी सावधपणाच्या सूचक आहेत. तात्पर्य ग्रामसंस्थांच्या कायदेशीर स्थानाविषयी निश्चितपणा दर्शवणारा व कार्यवाढीला वाव देणारा पण प्रत्यक्ष कामानुसार त्यांच्यात श्रेणी लावणारा कायदा हाच या प्रश्नाबाबत श्रेयस्कर मार्ग वाटतो. विकेंद्रीकरणाचे आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक हेतू योग्य रीतीने साध्य होण्यासाठी विकेंद्रीकरणाचा मार्ग हा केवळ सत्तादानाचा मार्ग न राहता "साहे ओझे त्यासि तेचि द्यावे" यावर त्याची उभारणी झाली पाहिजे. अर्थात ओझे देण्याच्या, जबाबदारी टाकण्याच्या या कल्पनेत सत्तासंक्रमण येतेच हे निराळे सांगण्याची गरज नाही.

जबाबदारी व सत्ता, कर्तृत्व व अधिकार यांची सांगड

अनुक्रमणिका

घालण्याचा हा उपक्रम अनेक दृष्टींनी अधिक श्रेयस्कर ठरेल अशी अपेक्षा बाळगता येते. सत्ता प्राप्त झाल्याने ती वापरण्याची कुवत अंगी येते ही कल्पना सर्वस्वी खरी नाही. कित्येकवेळा उलटाच अनुभव येणे शक्य आहे. म्हणून दोहोंची सांगड घालण्याचा प्रयत्न अधिक योग्य ठरतो. त्यातून उद्‌भवणाऱ्या प्रत्यक्ष कार्याच्या महत्त्वामुळे स्थानिक पातळीवर नव्या नेतृत्त्वाची निर्मिती व जोपासना होण्याची शक्यता बळावते. लोकशाहीची वाढ व्हावी, तिची बीजे खोलवर रुजावीत यासाठी नवे नेतृत्त्व निर्माण होणे आवश्यक आहे. सामाजिक, आर्थिक वा राजकीय व्यवहाराच्या सर्व पातळीवर नवा विचार, दृष्टिकोन व त्यातून होणारा व्यवहार यांना अधिकाधिक महत्त्व प्राप्त होत जाणे व नवनव्या व्यक्तींच्या कर्तृत्त्वाला सतत वाव मिळणे ही नवे नेतृत्त्व निर्माण होण्यातील मध्यवर्ती कल्पना होय. स्थानिक पातळीवर हितसंबंध, जातगोत, गुंडगिरी इत्यादींचे प्राबल्य होण्याच्या, वा व्यवहारांत वशिलेबाजी, लाचलुचपत व तत्सम अनिष्ट प्रवृत्ती शिरण्यांच्या संभाव्यतेवरही हाच टिकाऊ स्वरूपाचा उपाय होऊ शकेल. योजना व विकासप्रयत्न या संबंधाने उत्साह निर्माण करण्याच्या व ग्रामीण जनतेचे सहकार्य मिळवण्याच्या दृष्टीनेही हा मार्ग अधिक अनुकूल व उपयुक्त ठरणे संभवनीय आहे. फारसा विचार न करता केल्या जाणाऱ्या अवास्तव मागण्या व त्या पूर्ण न झाल्याने निर्माण होणारा वा केला जाणारा अकारण असंतोष या दोहोंनाही त्यात अवकाश नाही. उलट, प्रत्यक्ष कार्याला महत्त्व दिल्याने त्याविषयीचा जिव्हाळा व जबावदारीची जाणीव हीच त्याच्या योगाने वाढीस लागू शकतील.

### श्रेणीचे निकष

श्रेणीची कल्पना मान्य केली की ती ठरवायची कशी व कोणी हा प्रश्न आपोआपच पुढे येतो. श्रेणी ठरविण्यासाठी लावायचे निकष हे वस्तुनिष्ठ असले पाहिजेत हे उघड आहे; व त्याबाबतीतला तपशीलही शक्य तितका स्पष्ट असावयास हवा. या दोन्ही बाबतीत अगदी शंभर टक्के समाधानकारक उत्तर ताबडतोब सापडेलच असे नाही. कदाचित काही प्रमाणात अनुभवाधिष्ठित व प्रायोगिक पद्धतीनेच पुढे जावे लागेल. ही मर्यादा स्वीकारूनच येथे काही निकष सुचवायचे आहेत. कोणतीही ग्रामसंस्था वा पंचायत १) आपली नित्याची म्हणून समजली गेलेली कामे कितपत दक्षतेने, क्षमतेने व व्यवस्थितपणे पार पाडते; २) नित्याच्या व अन्य स्थानिक कार्यांच्या विकासाबाबत आपल्या प्रयत्नांनी कितपत जबाबदारी उचलण्यास तयारी दाखवते; ३) नजीकच्या इतर पंचायतींचे सहकार्य मिळवून वा त्यांना सहकार्य देऊन आपले विकासाचे प्रश्न कितपत सोडवते; ४) राज्य वा संघराज्य यांच्या विकासकार्यांच्या पूर्तीसाठी देता येण्यासारखे सहकार्य कितपत देते; ५) विकासकार्यासंबंधी जिव्हाळा निर्माण करून योजनेबाहेरील स्थानिक विकासकार्ये हाती घेण्याचा व स्वप्रयत्नांनी ती पार पाडण्याचा कितपत प्रयत्न करते; व ६) आपल्या कार्यपद्धतीने ग्रामीण जीवनात एकजिनसिपणा निर्माण करण्यात कितपत यश मिळवते; या सर्व गमकांच्या आधारावर तिचे स्थान ठरविता येणे शक्य आहे. नित्याचा व्यवहार, विकास व सामाजिक एकजिनसीपणा ही तीन क्षेत्रे या गमकांच्या मुळाशी आहेत. पहिल्या दोन क्षेत्रांच्या बाबतीत वस्तुनिष्ठ कसोट्या काढणे कठीण असले तरी अगदी अशक्य आहे असे नाही. ग्रामपंचायतीच्या त्या क्षेत्रातील कामाचे मोजमाप करता येणे शक्य आहे. शेवटच्या क्षेत्राबाबत मात्र काही अप्रत्यक्ष कसोट्या शोधून काढणे आवश्यक ठरेल. किती निवडणुका बिनविरोध झाल्या, किती निर्णय एकमुखाने घेतले गेले, व्यक्त झालेल्या विरोधाचे स्वरूप कोणते व त्याची दखल कशा प्रकारे घेतली गेली इत्यादी गोष्टी याबाबत सुचवता येण्यासारख्या आहेत.

### आणखी एक मुद्दा

याबाबतीत आणखीही एक मुद्दा विचारात घेण्यासारखा आहे व तो म्हणजे खालपासून वरपर्यंत केवळ प्रतिनिधीसत्तेचा सर्रास वापर यासंबंधी हा होय. संघराज्य, राज्य वा जिल्हाच नव्हे तर तालुका किंवा ब्लॉक इतपत देखील प्रतिनिधीसत्ता अपरिहार्य वाटणे ठीक आहे, परंतु गावाच्या पातळीवर देखील ती अपरिहार्य का वाटावी हा एक प्रश्नच आहे. लोकराज्य म्हणजे लोकप्रतिनिधींचे राज्य हे एक सोयीचे समीकरण आहे; त्यात तत्त्व अभिप्रेत नसून व्यावहारिक दृष्टीने अगतिकता व्यक्त झालेली आहे. या दृष्टीने ग्रामशासनाने घेण्याचे काही प्रकारचे निर्णय तरी गावातील वयात आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांच्या संमतीने घेण्याचे व खुली चर्चा आणि गुप्त मतदान हा ही संमती मिळवण्याचा मार्ग म्हणून स्वीकारण्याचे बंधन त्यावर का असू नये हा एक प्रश्नच आहे. गावातील जनतेने गावाच्या कारभाराकरितादेखील केवळ प्रतिनिधी निवडून द्यावेत व नंतर स्वस्थ बसावे हे फारसे उचित नाही. विशेषतः स्थानिक पातळीवरील विकासकार्यांच्या दृष्टीने ग्रामपंचायतीबरोबरच ग्रामसभेची संघटना गृहीत धरून गावातील सर्व वयात आलेल्या स्त्री-पुरुषांना विशिष्ट अधिकार देण्याचा प्रयोग करून पहाण्यासारखा आहे. काही निर्णय घेण्यात का होईना पण प्रत्यक्ष भाग घेण्याची संधी मिळाल्यास जनतेतील उत्साह

त्यायोगाने अधिक वाढीस लागेल अशी अपेक्षा बाळगता येते व या दृष्टीने या प्रश्नाकडे पाहणे अगत्याचे आहे. अर्थात या बाबतीत गावाची लोकसंख्या विशिष्ट मर्यादेतच असेल हे गृहीत धरले आहे.

**काही शंका व उत्तरे**

ग्रामपंचायतीची श्रेणी लावण्याच्या व त्या अनुरूप त्यांना अधिकार देण्याच्या या कल्पनेसंबंधी एक दोन महत्त्वाच्या शंका येणे शक्य आहे. प्रथमतः ही कल्पना पंचायतींना सर्व अधिकार देण्याच्या पार्श्वभूमीवर मांडलेली नाही हे ध्यानात ठेवले पाहिजे. सर्व अधिकार देण्याची कल्पना ही चुकीची आहे असाच येथे दावा करण्यात आला आहे. शासनाच्या दृष्टीने ज्या बाबतीत लवचिकपणाचे धोरण धोक्याचे ठरू शकते असे अधिकार देण्याचा प्रश्नही उद्‌भवत नाही. ही मर्यादा ध्यानात घेतली म्हणजे द्यावयाच्या सत्तेची, अधिकाराची एक कमालीची पातळी निश्चित करणे आवश्यक ठरते व त्याबरोबरच एक किमान पातळीही असणे जरूर आहे. श्रेणीनुरूप द्यावयाच्या अधिकारातील फेरबदल या दोन मर्यादांत होऊ शकेल.

याबाबत एक प्रश्न असा उद्‌भवतो की काही ठिकाणी किमान अधिकारांचा वापर करण्याच्या क्षमतेचा देखील अभाव असणे शक्य आहे तेथे काय करायचे ? या ठिकाणी आवश्यक भूमिका व कुवत निर्माण करण्याची जबाबदारी वरच्या पातळीवरील संघटना - म्हणजे ब्लॉक वा तालुका -आणि राज्यशासन यांनी उचलली पाहिजे; व त्यांचे प्रयत्नही प्राथमिक गरज पुरी होण्यासाठी अशा ठिकाणी केंद्रित झाले पाहिजेत. श्रेणी लावण्याचा मार्ग हा पुढारलेल्यांनी पुढे जाण्याचा व मागासलेल्यांनी मागे राहण्याचा मार्ग ठरता कामा नये. सर्वांचा दर्जा सुधारण्याचे ते एक साधन ठरले पाहिजे. ही जबाबदारी कायद्याने टाकणे व ती पार पाडण्याचे प्रयत्न होतील अशी दक्षता घेतली जाणे आवश्यक आहे.

दुसरा प्रश्न म्हणजे सत्तेची कमाल मर्यादा गाठलेल्या पंचायतीचा होय. ही मर्यादा गाठल्यानंतर जर तिच्या कार्यात शैथिल्य येऊ लागले, अनिष्ट प्रवृत्ती घुसू लागल्या तर काय करायचे असा हा प्रश्न आहे. तथापि हा धोका थोडासा कमी प्रमाणात संभवतो. वरची श्रेणी गाठण्याच्या उपक्रमात गावातील जनतेची जाणीव विकास पावेल, जागरूकता व आकलन शक्ति वाढेल. यामुळे अशा स्वरूपाच्या धोक्याविरुद्ध आवश्यक ती सामाजिक व सांस्कृतिक हमी ग्रामीण समाजात निर्माण झाली असण्याचा संभव आहे. तरीदेखील ही शक्यता सर्वस्वी नाहीशी होईल असे समजण्याचे कारण नाही. यामुळे खालच्या पायरीवरून वर जाण्याच्या संधी बरोबरच वरून खाली येण्याची तरतूदही कायद्याने असणे आवश्यक ठरते. मिळालेल्या अधिकारांमुळे व्यवहार सुधारण्याऐवजी बिघडू लागल्यास ते जाऊ शकतील याची जाणीव ग्रामशासनात सातत्याने असणे यात आक्षेप घेण्यासारखे काहीही नाही असे वाटते.

येथवर विकेंद्रीकरणाच्या प्रश्नाची वैचारिक बैठक तपासण्याचा व त्यासंबंधी काही सूचना पुढे मांडण्याचा प्रयत्न झाला. या प्रश्नांची संख्यात्मक बाजू पुढे विचारात घेऊ.



(पृष्ठ ७२ वरून)

**आव्हाने**

**चालणार नाही. समानतेचा अधिकार असावा यासाठी राज्यसंस्थेकडे मागणी करावी लागेल. पण समानतेचा व्यवहार व्हावा यासाठी सामाजिक मूल्यव्यवस्थेत हस्तक्षेप करावा लागेल. समानतेचा हा लढा तत्त्वैचारिक व सांस्कृतिक असेल.**

**वास्तविक पाश्चात्त्य जगात वंश-वादविरोध ही जशी समाजवादाची प्राथमिक खूण मानली जाते त्याप्रमाणे जातिनिष्ठ विषमतेला विरोध ही भारतीय समाजवादाची प्रारंभिक ओळख बनायला हवी. ते न झाल्यामुळे गेल्या दशकात स्वतंत्र जातवादी राजकारण उभे राहिले.**

**भाषा, चालीरीती, श्रद्धा, जीवन-पद्धती यांची बहुविधता मान्य करून त्यांच्या एकछत्रीकरणाला विरोध करणे हे भारतात समाजवादापुढचे अव्वल आव्हान आहे.**

**- सुहास पळशीकर**

(साधना, १० ऑगस्ट २००२)

# नवभारत, नवे जग आणि नवी दृष्टी

आचार्य शं.द. जावडेकर

(नवभारत प्रथम अंक, ऑक्टोबर १९४७)

सुमारे सव्वाशे वर्षांच्या परकीय अंमलानंतर आज हिंदुस्थान स्वतंत्र होत आहे. इ. स. १८१८ साली हिंदुस्थान देशात ब्रिटिश सत्ता सार्वभौम बनली आणि १९४७ च्या १५ ऑगस्ट रोजी ही सार्वभौम सत्ता या खंडतुल्य राष्ट्राच्या सर्व विभागातून नष्ट झाली. १८१८ सालापूर्वी या देशात अनेक स्वतंत्र राज्ये नांदत होती व त्या सर्वांना आपले सार्वभौमत्व स्वीकारावयास लावू असा विश्वास मराठ्यांना १७५० च्या सुमारास वाटू लागला होता असे म्हणता येईल. पण ही गोष्ट करावयाची तर दिल्लीच्या मोगल बादशहाला पदच्युत करून नव्हे, तर त्याचे संरक्षक बनूनच व त्याच्या नावानेच आपणास करता येईल, अशी त्या वेळच्या सर्व कर्तबगार मुत्सद्यांची व लढवय्यांची कल्पना होती. राघोबादादांनी अटकेवर भगवा झेंडा रोविला, सदाशिवरावभाऊंनी दिल्लीच्या सिंहासनावरील चांदीचे छत वितळवून रुपये पाडिले आणि महादजी शिंदे यांनी निःसहाय्य बनलेल्या दिल्लीच्या बादशहाला दिल्लीस आणून बसविले व सर्व हिंदुस्थानवर बादशहाचे वकील-इ-मुतालक म्हणून सार्वभौम सत्ता गाजवावी अशी सनद मिळविली. तथापि या सर्व गोष्टी त्यांनी मोगल बादशहाचे नोकर या नात्यानेच केल्या हे आपण विसरता कामा नये. या गोष्टी घडेपर्यंत इ. स. १७९० साल उजाडावे लागले आणि त्यानंतर दहाबारा वर्षांच्या आतच हे सार्वभौमत्व ब्रिटिशांच्या हाती गेले. १८०३ साली पुण्याचे पेशवे ब्रिटिशांच्या तैनाती फौजेच्या सहाय्याने पुण्यात राज्य करू लागले आणि दिल्लीचा बादशहाही ब्रिटिशांनीच आपल्या छत्राखाली घेतला. आधुनिक युगात स्वातंत्र्याने व सन्मानाने नांदावयाचे असेल तर मध्ययुगीन संस्कृती सोडून आधुनिक संस्कृतीचाच स्वीकार केला पाहिजे असा या घडामोडीचा खरा अर्थ होता.

## १. तेव्हाचे जग आणि आजचे जग

इ. स. १८१८ सालचे जग आणि आजचे जग यांची जर आपण तुलना करू लागलो तर आपणास काय दिसेल. १७९० च्या सुमारास महादजी शिंदे आणि नाना फडणीस हे 'दिल्लीचा बादशहा आपल्या ताब्यात आला, आता त्याच्या नावाने आपणास अटकेपासून रामेश्वरापर्यंत आणि सिंधपासून बंगालपर्यंत जे जे राज्यकर्ते होते, त्या सर्वांवर आपली सत्ता गाजविता येईल' अशी मनोराज्ये रचीत होते. पण ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्दी यावेळी निराळ्याच विचारांचे चिंतन करण्यात गर्क झाले होते. फ्रेंच राज्यक्रांती नुकतीच झाली होती आणि त्या राज्य क्रांतीतून निर्माण झालेली प्रचंड शक्ती नेपोलियनच्या रूपाने सर्व युरोपातील सरंजामशाही राज्ये पादाक्रांत करून स्पेन-पोर्तुगालपासून रशिया-इजिप्तपर्यंतचा युरोपखंड हादरून सोडीत होती. नेपोलियनचे राजकारण टिपू सुलतानपर्यंत येऊन पोहोचले असून महादजी शिंदे व नाना फडणीस यांना ब्रिटिशांना हिंदुस्थानातून हाकलून द्यावयाचे झाल्यास फ्रेंचांचे दास्य पत्करावे लागणार आहे, हे नेपोलियन जाणून होता. ब्रिटिशांना माहित होते की, युरोपात नेपोलियनचा पाडाव करणे व हिंदुस्थानात मराठ्यांचा पाडाव करणे या गोष्टी परस्परावलंबी असून या लढ्यात जो विजयी होईल त्याला सर्व जगावर शेदोनशे वर्षे निष्कंटक सार्वभौमत्व गाजविता येईल. केवळ हिंदुस्थानच काय, सर्व आशिया, आफ्रिका व अमेरिका ही तीनही खंडे यावेळी युरोपच्या परसातील भाजीच बनू लागली होती. त्यावेळच्या जगाची वास्तविक स्थिती अशी होती. पण ह्या वास्तव जगाची आम्हास कल्पना नव्हती. हिंदुस्थानात हिंदुपदपातशाही स्थापन होणार की, मुसलमान पाशाहर पुनरुज्जीवित होणार या काल्पनिक प्रश्नांचे चिंतन करण्यात आम्ही निमग्न होतो. आमचे त्यावेळचे सर्व व्यवहार स्वप्नात चालणाऱ्या झोपाळू मनुष्यासारखेच त्यावेळी घडत होते असे आता वाटते. आमची विचारसृष्टी आणि त्यावेळची वास्तव सृष्टी यांचा काही मेळच उरला नव्हता. आमचे विचार जगाच्या विचारांमागे निदान दोन शतके तरी त्यावेळी होते. इ. स. १८०० मधील आमच्या विचारांचे स्वरूप इ. स. १६०० पूर्वीच्या युरोपियनांच्या विचारांसारखे होते.

## दोन संस्कृतीची वाढती झुंज

आता त्यावेळच्या जगाचा विचार बाजूस ठेवून आजच्या जगाचा विचार करूया. १८१८ साली मराठ्यांचा आणि त्याच सुमारास नेपोलियनचा पाडाव करून ब्रिटिश साम्राज्य शंभर वर्षे सर्व जगभर आपल्या पूर्ण प्रतापाने आणि पूर्ण वैभवाने गाजले. १९१४ पासून या साम्राज्याचा प्रचंड कोट ढासळण्यास सुरुवात झाली, असे

अनुक्रमणिका






म्हणण्यास हरकत नाही. ब्रिटनमध्ये उदय पावून सर्व जगभर फैलावलेली भांडवलशाही संस्कृति आज मरू लागली आहे. युरोपातील सरंजामदार आणि भांडवलदार यांच्यातील वर्गकलहाच्या रूपाने या संस्कृतीचा उदय झाला, असे म्हणा किंवा या संस्कृतीच्या आश्रयाने युरोपीय भांडवलदार वर्गाने सरंजामदारांचा पाडाव करून आपले प्रभुत्व सर्व जगभर प्रस्थापित केले म्हणा, आधुनिक युगात युरोपात निर्माण झालेली संस्कृती ही आज भांडवलदारांची भांडवलशाही संस्कृती ठरली आहे. १९१४ ते १९१९ आणि १९३९ ते १९४५ अशी दोन जागतिक महायुद्धे होऊन तीस-चाळीस वर्षांपूर्वी सर्व संस्कृतीचे व संपत्तीचे आगर मानिले जाणारे युरोपखंड आज बेचिराख आणि उध्वस्त होऊन जमीनदोस्त झाले आहे. सर्व जगातील पहिल्या प्रतीचे प्रबल साम्राज्य म्हणून शंभर वर्षे वाढलेले व गाजलेले ब्रिटिश साम्राज्य आज तिसऱ्या प्रतीचे राष्ट्र बनले आहे. सर्वात मागासले गणलेले रशियाचे प्रचंड राष्ट्र पहिल्या प्रतीचे बलाढ्य राष्ट्र बनले असून बर्लिनपासून पेकिंगपर्यंत व मॉस्कोपासून पामीरच्या पठारापर्यंत त्याचे हातपाय पसरलेले आहेत. आमच्या देशात नवीन निर्माण होणारे पाकिस्तान आणि काश्मीर संस्थान यांच्या सरहद्दीला त्याची सरहद्द मिळाली असून, रशियात निर्माण झालेली अथवा प्रथम अधिकाररूढ झालेली समाजवादी संस्कृती सर्व जगभर फैलावणार अशी आशा धरून ती सफल करण्यासाठी आपल्या जीविताचा होम करणारा समाजवादी संप्रदाय प्रत्येक देशात पसरू लागला आहे. या समाजवादी संस्कृतीची शास्त्रीय मीमांसा करणारा कार्ल मार्क्स इ. स. १८१८ सालीच जन्माला आला होता. त्याने १८४७ साली कम्युनिस्ट जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्यात भांडवलशाही संस्कृतीत निर्माण होणारा वर्गविग्रह सर्व जगात फैलावेल आणि त्यात सर्व जगातील कामगार एकजूट होऊन सर्वत्र समाजवादी क्रांती यशस्वी करतील, असे भाकित केले आहे. यानंतर सत्तर वर्षांनी १९१७ साली रशियात समाजवादी क्रांती यशस्वी झाली आणि त्यानंतर तीस वर्षांच्या आत समाजवादी संस्कृतीने मंडित असे प्रचंड रशियन राष्ट्र आज जगातील पहिल्या प्रतीचे राष्ट्र बनले आहे. त्याचा दरारा अमेरिकेलाही वाटावा इतके त्याचे सामर्थ्य वाढले आहे. आजच्या जगात अमेरिका आणि रशिया ही दोनच खरी बलाढ्य राष्ट्रे नांदत असून ती राष्ट्रे अनुक्रमे भांडवलदार संस्कृती आणि समाजवादी संस्कृती यांची पुरस्कर्ती समजली जातात. आता यापुढे जर तिसरे महायुद्ध झाले, तर या दोन बलाढ्य राष्ट्रांच्या नेतृत्त्वाखालीच होणार, हे सर्वांना समजून चुकले आहे. या महायुद्धात जर अमेरिकेचा विजय झाला तर काही काळ तरी समाजवादी संस्कृती नामशेष होईल अशी आशा अमेरिकेला वाटत असून असे युद्ध पेटल्यास सर्व युरोपात व आशियात शेतकरी कामगार वर्ग समाजवादी क्रांतीच्या झेंड्याखाली गोळा होईल अशी आशा जगभर पसरलेल्या कम्युनिस्टांना व रशियाला वाटत असणे साहजिक आहे. तात्पर्य, आजच्या जगात समाजवादी संस्कृति आणि भांडवलशाही संस्कृती यांचा लढा चालू असून या लढ्यातून आणखी एखादे महायुद्ध पेटेल आणि जगातील सर्व राष्ट्रात ते पसरत गेल्यास सर्वांचीच राखरांगोळी होण्याचा व सर्व राष्ट्रांत वर्गकलहात्मक क्रांत्यांचे उठाव होण्याचाही संभव आहे. युरोप व आशिया या खंडातील रशियाच्या कक्षेत न येणाऱ्या देशात आपले भांडवल कर्जरूपाने पेरावे आणि या सावकारीच्या जोरावर या देशांवर आपले राजकीय प्रभुत्व प्रस्थापून तेथे समाजवादी संस्कृतीने आपले वर्चस्व स्थापू नये असे प्रयत्न अमेरिकन भांडवलशाही करीत आहे.

**२. ब्रिटनचे समाजवादी मंत्रिमंडळ**

इंग्लंडात आज समाजवादी मंत्रिमंडळ अधिकारावर असून रशिया व अमेरिका यांच्या दरम्यान शक्य तो महायुद्ध होऊ नये, निदान झालेच तर ते जगभर पसरू नये आणि आपण त्यात गोविले जाऊ नये असे त्याला मनापासून वाटत असणे साहजिक आहे. कारण अशा युद्धात अमेरिकेचा विजय झाला व भांडवलशाहीला काही काळ जीवदान मिळाले, तरी आपले राष्ट्र त्यात अमेरिकेच्या आर्थिक दास्यांतच जाणार व कदाचित माऱ्यात होरपळूनही जाण्याचा धोका आहे, याची जाणीव ब्रिटनमधील आजच्या मंत्रिमंडळाला असेल. तसेच आपण आपल्या साम्राज्याचा बचाव करू शकत नाही, याचा अनुभव गेल्या महायुद्धात त्याला आला असून आजही साम्राज्यरक्षणाचा खर्च आणि त्याला लागणारे मनुष्यबळ आपणापाशी नाही, याचीही जाणीव त्याला होऊ लागली आहे. यामुळेच हिंदुस्थान आणि आशियाखंड यांच्यामधून आपल्या साम्राज्याचा पसारा आवरून घ्यावा, असे धोरण ते आखीत आहे. त्या मंत्रिमंडळाचे धोरण व एकंदर दृष्टिकोन समाजवादी असल्याने भांडवलशाही संस्कृती आपल्या आंतरविरोधांनी कोलमडून पडणार असून तिला चिरंजीव करण्याचा अमेरिकेचा प्रयत्न फोल ठरणार आहे, अशीही ब्रिटनमधील समाजवादी पुढाऱ्यांची खात्री झाली असली पाहिजे. यामुळे अमेरिकेचा साम्राज्यवादी अहंकार आणि भांडवलशाही संस्कृती चिरंतन करण्याची तिची आकांक्षा ब्रिटिशांच्या आजच्या मंत्रिमंडळाला समंजस वाटण्याचा फारसा संभव नाही. जगाच्या अशा अवस्थेत आज हिंदुस्थान स्वतंत्र होत असून त्यात हिंदी संघराज्य व पाकिस्तान अशी दोन स्वतंत्र सार्वभौम राज्ये अस्तित्वात येत आहेत. तेव्हा आजच्या जगाकडे पहाण्याची व








अनुक्रमणिका

नवभारताची दृष्टी कोणती आहे व कोणती असावी?

### ३. आजचे भारतीय नेतृत्त्व व त्याचे महत्त्व

पाकिस्तानचा विचार क्षणभर बाजूस ठेवून हिंदी संघराज्याचाच विचार आपण करू लागलो, तर आपणास काय दिसते? हिंदी संघराज्याचे क्षेत्रफळ व लोकसंख्या यांचा विचार केल्यास जगातील कोणत्याही राष्ट्रापेक्षा हे मोठे ठरेल. अर्थात, केवळ क्षेत्रफळाच्या दृष्टीने रशियाची बरोबरी कोणीच करू शकणार नाही. पण रशियाची लोकसंख्या हिंदी संघराज्याहून कमी आहे व चीनची एकदंर लोकसंख्या अधिक असली तरी त्यात आज जी दोन राज्ये नांदत आहेत, त्यांच्यापैकी कोणत्याही एका राज्यापेक्षा हिंदी संघराज्याची लोकसंख्या अधिक आहे. या राज्याची सूत्रे आज एकाच प्रचंड राष्ट्रसभापक्षाच्या हाती एकवटली असून या पक्षात म. गांधी व पं. जवाहरलाल नेहरू हे दोन प्रभावी नेते आहेत. हे दोघेही समाजवादी संस्कृतीला अनुकूल असून राष्ट्रसभा शेतकरी-कामकरी राज्य स्थापन करण्याच्या ध्येयाला अधिकृतपणे वचनबद्ध झालेली आहे. या ध्येयाचा अर्थ मार्क्सवादी दृष्टीने लावणारा पण लोकशाही समाजवादाचा व शांततामार्गानेच हे ध्येय गाठण्याचा प्रयत्न करणारा एक पोटपक्ष या संस्थेत गेली दहा बारा वर्षे एकसारखा वाढत आला असून देशातील तरूण वर्गावर त्याची छाप पडली आहे. यामुळे ही राष्ट्रसभा जुन्यानव्या पुढाऱ्यातील मतभेद विकोपास जाऊन दुभंगली नाही, तर देशात पूर्ण लोकशाही राज्यघटना नांदत असूनहि पुढील दहा बारा वर्षे या हिंदी संघराज्यातील राज्ययंत्र याच एका समाजवादी पक्षाच्या हाती रहावे आणि तो म्हणेल ती पूर्व दिशा सर्व बाबतीत व्हावी अशी संधी सव्वाशे वर्षांच्या पारंतत्र्यातून स्वातंत्र्यात येणाऱ्या जगातील पहिल्या प्रतीच्या या राष्ट्राला लाभणार आहे. हिंदी राष्ट्रसभेत सत्याग्रही किंवा गांधीवादी राजकीय परंपरेत वाढलेला पक्ष बहुसंख्य असून आज समाजवादी पक्ष अल्पसंख्य आहे. तथापि गांधीवादी म्हणविणारांना आता अहिंसावादाच्या बंधनात राहून राज्य चालविणे शक्य नसल्यामुळे प्रत्यक्ष गांधी नेतृत्वाचा लाभ मिळू शकत नाही. आणि देशातील तरुण पिढीत समाजवादी विचारांचा जोराने फैलाव होत आहे. यामुळे राष्ट्रसभेतील या पक्षांच्या वजनाचा समतोल होण्यास व लवकरच राष्ट्रसभेचे नेतृत्व पूर्ण समाजवादी बनण्यास फार अवकाश लागण्याचे कारण दिसत नाही. ही चिन्हे लक्षात घेतल्यास राष्ट्रसभेचेच रूपांतर समाजवादी संस्थेत होणे अगदी स्वाभाविक आहे व तसेच ते व्हावे हे सर्व दृष्टीने इष्ट आहे. राष्ट्रीय स्वातंत्र्य संपादन करण्यात यशस्वी झालेली ही संस्था समाजवादी बनेल, तर तिला पुढील दहा बारा वर्षात आपल्या देशात शांततेच्या मार्गाने एक सर्वांगीण सामाजिक क्रांती घडवून आणता येईल, इतकेच नाही तर सर्व आशिया खंडाचे नेतृत्त्व स्वीकारून भावी महायुद्ध व सार्वत्रिक क्रांत्याचे स्फोट यांच्या आपत्तीतून जगाला वाचविता येईल अशी आमची कल्पना आहे. तसे व्हावयाचे तर ज्या तत्त्वावर आमच्या नव्या राष्ट्राची उभारणी करावयाची त्यासंबंधी त्यातील सर्व पक्षांचे मूलभूत ऐक्य कायम राहिले पाहिजे. तेव्हा भारताची राष्ट्रनिर्मिती करताना आपण मानवसंस्कृतीसंबंधी कोणता दृष्टिकोन स्वीकारणार, याची शास्त्रीय मीमांसा आपण केली पाहिजे आणि आपल्या राष्ट्राचे आजच्या जगातील स्थान व कर्तव्य कोणते यासंबंधीही आपणामध्ये बरीच एकवाक्यता असावयास हवी.

### ४. राष्ट्र, राज्य आणि समाज

सव्वाशे वर्षांपूर्वी आम्ही परतंत्र झालो आणि आता आम्ही स्वतंत्र होत आहो. या काळात राष्ट्र, राज्य व समाज यासंबंधीच्या आमच्या विचारात एक प्रचंड क्रांती झालेली आहे. त्यावेळीही आम्ही आमच्या राज्यांचे रक्षण करण्यासाठी लढत होतो व आजही लढणार आहो. त्यावेळीही आमचा समाज व आमची संस्कृति यांच्याबद्दल आदर व अभिमान वाटत होता व तसा तो आजही आपणास वाटत आहे. पण यासंबंधीचे आमचे विचार अगदी पालटून गेलेले आहेत. त्यावेळी आमचे राष्ट्र म्हणजे केवळ हिंदूंचे राष्ट्र आहे, असे हिंदू लोक मानीत होते, तर या देशावर सार्वभौमत्व गाजविण्याचा हक्क केवळ मुसलमान बादशहांनाच असला पाहिजे, अशी आकांक्षा मुसलमान समाजात बद्धमूल अथवा दृढ बनली होती. आज हे सर्व विचार आम्ही सोडून दिले आहेत व आपले राष्ट्र, हिंदू, मुसलमान, ख्रिस्त, शीख, पारशी इत्यादी सर्व धर्मांच्या लोकांचे बनले पाहिजे, अशी थोर आकांक्षा आमच्या अंतःकरणात उदय पावली आहे. इतकेच नाही तर ही भावना व्यक्त करणारा एक राष्ट्रध्वजहि आज आपण सर्वानुमते मान्य केलेला आहे. धर्मवार राष्ट्रभावना ही भावना आपण मध्ययुगीन व आधुनिक युगास अनुरूप अशी ठरविली असून आमचे राष्ट्र हे जातिभेदातीत बनले पाहिजे व त्या व्यापक भावनेच आम्ही त्याची भक्ती केली पाहिजे, अशी आपली राष्ट्रिक नीती बनली आहे.

#### जातिसंस्था मोडून पडली आहे

एकेकाळी जातिसंस्था ही आपल्या संस्कृतीचे वैशिष्ट्य समजून हिंदु लोक तिला प्रेमाने कवटाळून होते आणि ब्राह्मणापासून क्षूद्रापर्यंत अनेक जाति व पोटजाति कल्पून त्यात जन्म पावणाऱ्या लोकांना ते उच्चनीच मानीत होते. काही जातींना तर जन्मतः








अस्पृश्यच मानीत होते व त्यांना स्पर्श करणे हे पाप कल्पीत होते. आज ही जातिसंस्था अजिबात मोडून पडली असून कोणत्याही जातीत जन्म पावल्याबद्दल एखाद्यास अस्पृश्य मानणे व तसे वर्तन करणे हा आमच्या राज्यघटनेने गुन्हा ठरविला आहे. हिंदूंच्या सर्व जातीत आज रोटीबेटीव्यवहार होण्यास कोणी प्रत्यवाय करीत नाही आणि भिन्नधर्मीय स्त्रीपुरुषही परस्परांशी विवाहबद्ध होऊन समाजात प्रतिष्ठा व मानमान्यता मिळून सुखाने संसार करू शकतात.

### स्त्री-पुरुषातील सामाजिक विषमता अन्याय्य

धर्म व जाती यांच्या भेदाप्रमाणे स्त्रीपुरुष यांच्यातील सामाजिक विषमताही आपण आज अन्यायाची समजतो. बालविवाह-प्रतिबंध, प्रौढ विवाहविचार, स्त्रीशिक्षण, घटस्फोट व विधवाविवाह, स्त्रियांचे आर्थिक स्वातंत्र्य व वारसा हक्क, स्त्रियांचे सामाजिक व राजकीय नेतृत्व इत्यादि सर्व बाबतीत आमचे विचार आमूल पालटून गेले आहेत. आमच्या स्त्रिया आता केवळ घरात कोंडून रहात नसून वाटेल तितके शिक्षण घेऊन हवा तो व्यवसाय करू शकतात, राजकारणात पडून मंत्रिमंडळात जाऊ शकतात आणि परराष्ट्रात जाऊन आपल्या राष्ट्राचे प्रतिनिधित्वही करू शकतात व त्याबद्दल आम्हास आनंद व अभिमान वाटतो. आमच्या संस्कृतीचे ते एक भूषण आहे असे आम्ही आज मानतो. एकेकाळी या सर्व गोष्टी आमच्या संस्कृतीस मारक समजत होती.

### प्रजेचे प्रभुत्व

राष्ट्रभावना आणि समाजघटना यासंबंधीच्या आमच्या विचारांप्रमाणे आमच्या राज्यविषयक कल्पनेतही या काळात एक क्रांती घडून आलेली आहे. त्यावेळच्या आमच्या राजकीय विचारात राजनिष्ठा व स्वामिनिष्ठा यांनाच अग्रस्थान होते आणि अनियंत्रित राज्यसत्तेपलीकडे आमचे विचार गेलेले नव्हते. आज आमच्या देशात जे अनियंत्रित राजे होते अणि आमच्या मागासलेल्या संस्कृतीचे अवशेष असून त्यांना ताबडतोब सत्ताहीन बनविणे हे आमचे आद्य कर्तव्य आहे असे आम्ही मानतो. आम्हास या राजांचा व सरंजामदारांचा आता तिटकारा आला असून त्यांच्या जुलमातून त्यांच्या प्रजेला मुक्त करणे हे जसे हिंदुस्थानातील इतर भागातील लोकांचे कर्तव्य बनले आहे, तसेच तेथील प्रजेनेही आपल्या प्रभुत्वासाठी राजाविरुद्ध बंड करणे हे आम्हास न्याय्य वाटत आहे. तात्पर्य, राजाला आपला प्रभु मानण्याचा काळ आता उरला नसून आता प्रजेचे प्रभुत्व प्रस्थापित करण्याचा काळ आला आहे अशी आमची दृष्टि व निष्ठा बनली आहे. अशाप्रकारे राष्ट्रभावना, राज्यघटना आणि समाजघटना यासंबंधी आमच्या विचारात क्रांती घडून आली असली तरी समाजाच्या आर्थिक घटनेसंबंधी मात्र आमचे विचार आद्यापि संदिग्ध राहिलेले आहेत व त्यासंबंधी आम्ही घोटाळत आहोत.

### ५. आर्थिक घटना व एकवर्ग समाज

धर्मभेदातीत राष्ट्र निर्माण करावे, जातिभेद व अस्पृश्यता यांचा उच्छेद करावा, राज्यघटनेत प्रजेचे प्रभुत्व प्रस्थापित व्हावे, या सर्व तत्त्वांना मान्यता देणारे लोक आपल्या समाजाची आर्थिक घटना समाजवादी बनवावी आणि मालक व मजूर हा वर्गभेद नष्ट करून एकवर्ग समाज स्थापन करावा, असे म्हणण्याची वेळ आली की कचरू लागतात ! हे एक आमच्या सांस्कृतिक मागासलेपणाचे लक्षण असून आम्ही वरील सर्व विचारक्रांती ब्रिटिश साम्राज्याच्या गुलामगिरीत घडवून आणिली असल्याने आम्हाला ब्रिटिश संस्कृती, ब्रिटिश समाजघटना व ब्रिटिश राज्यघटना यांची मोहिनी पडली आहे, असेच हे दृश्य पाहून वाटू लागते आम्ही आजपर्यंत ब्रिटिशांची विरोधी भक्ति केली आणि त्यांच्याशी भांडत असतानाही त्यांच्या संस्कृतीसंबंधीचा आमचा आदर वाढत गेला व आम्ही स्वतंत्र झाल्यावर त्यांच्यासारखेच आपण व्हावे, ही आकांक्षा आमच्या अंतःकरणात रुजत गेली. शंभर वर्षांपूर्वी जातिभेद मोडणे व वर्णसंकर करणे यासंबंधी आम्हास जशी भीती वाटत होती, तशीच भीती आमच्या देशातील अनेक आधुनिक विद्वानांस अद्यापि आर्थिक घटनेतील वर्गभेद मोडण्यासंबंधी वाटू शकते. धर्माविरुद्ध अथवा परमेश्वराविरुद्ध बंड उभारण्याची भाषा आज आमच्या परिचयाची झाली आहे. पण मालकशाही किंवा भांडवलशाही वर्गाविरुद्ध क्रांतीची भाषा आमच्या पोटात अद्यापि धास्ती उत्पन्न करू लागते. अद्यापि मालमत्तेचा मालकी हक्क हा आम्ही परमेश्वरनिर्मित अथवा निसर्गसिद्ध समजतो. भांडवलदार लोकशाही ही वस्तुतः धनिकशाही आहे, याची आम्हास पूर्ण कल्पना येत नाही आणि आम्ही अध्यात्मिक संस्कृतीचे उपासक असल्यामुळे आमच्या देशातील भांडवलदार वर्ग जनतेचे रक्तशोषण करणार नाही, असा भ्रम आम्हास होतो.

### साध्य समाजवादी लोकशाही

पण हे घुटमळणे आम्ही आता सोडून दिले पाहिजे. जन्मसिद्ध जातिभेद व अस्पृश्यता मानणे हे पाप आहे अथवा तो आमच्या धर्मभावनेस लागलेला कलंक आहे, असे आम्हास जसे वाटते, तसेच कोणतेही काम न करता केवळ स्वामित्वावर व्याज, खंड व नफा या रूपाने द्रव्यार्जन करण्याचे मार्ग कायदेशीर मानणे हे चूक आहे असे आपण जाणिले पाहिजे. श्रम, अस्तेय व असंग्रह ही

अनुक्रमणिका






तत्त्वे केवळ वैयक्तिक आत्मोन्नती साधणारांची खाजगी व्रतेच न राहता समाजाच्या आर्थिक घटनेत योग्य ते स्थान त्यांना करून दिले पाहिजे. श्रम, अस्तेय व असंग्रह ही तत्त्वे केवळ वैयक्तिक आत्मोन्नती साधणारांची खाजगी व्रतेच न राहता समाजाच्या आर्थिक घटनेत योग्य ते स्थान त्यांना करून दिले पाहिजे. श्रमिक वर्गाने आपल्या कष्टाने निर्माण केलेल्या संपत्तीचा उपभोग घेणारा जमीनदार, सावकार व कारखानदार वर्ग हा परान्नपुष्ट वर्ग असून त्याची समाजधारणेला यत्किंचितही आवश्यकता आज उरलेली नाही, याची स्पष्ट व निःसंदिग्ध जाणीव आपणास झाली पाहिजे. ही तत्त्वे आमच्या समाजाच्या आर्थिक घटनेत कायदेशीरपणे समाविष्ट करून एकवर्ग समाजघटना व समाजवादी लोकशाही हेच आमचे साध्य आहे व ते आम्ही दहा-पाच वर्षात गाठणार असा निर्धार आज आपल्या राष्ट्रातील सर्व विचारवंतांनी व राष्ट्रभक्तांनी केला पाहिजे. तीस कोटींहून अधिक लोकसंख्येचे एक प्रचंड, प्राचीन व सुसंस्कृत राष्ट्र शांततेच्या मार्गाने परकीय साम्राज्यशाहीतून आपण मुक्त केले आहे, येवढ्यातच समाधान मानण्याचा हा काळ नसून या राष्ट्रात ब्रिटिश साम्राज्यशाहीच्याच आश्रयाने वाढलेली धनिकशाही लोकशाही राज्यावर आपली हुकमत चालवू लागणार नाही याबद्दल आपण दक्ष राहिले पाहिजे व पाच-दहा वर्षांच्या आत या राष्ट्रीय लोकशाहीचे समाजवादी लोकशाहीत रूपांतर घडवून आणले पाहिजे.

**नामी संधी**

केवळ आपल्याच देशातील धनिकशाही नव्हे तर ब्रिटन-अमेरिकेतील धनिकशाहीदेखील आपल्या लोकशाहीवर कुरघोडी करण्याचा व भांडवलशाहीविरुद्ध कामगारशाही असे महायुद्ध पेटल्यास त्यात आमचे सहाय्य घेऊन जगातील समाजवादी संस्कृती नष्ट करण्याचा अथवा भांडवलशाही संस्कृती चिरंतन करण्याचा प्रयत्न केल्यावाचून राहणार नाही. ही आपत्ति टाळून जगात तिसरे महायुद्ध व मानव संहार न होता शांततेच्या मार्गाने समाजवादी लोकशाही स्थापन करण्याची नामी संधी आज आपणास लाभली आहे. सर्व युरोपखंडातील भांडवलशाही महायुद्धाने होरपळून निघाली आहे. ब्रिटिश राष्ट्र स्वतःच कर्जबाजारी बनले असल्याने जगावर सावकारीचे पाश निर्माण करण्यास व भांडवलशाही संस्कृतीला जीवदान देण्यास पूर्णपणे असमर्थ झाला आहे. अमेरिकेला ही महत्त्वाकांक्षा निर्माण झाली असली, तरी जगाच्या राजकारणात नवीनच पदार्पण करणारे हिंदी संघराज्य रशियाबाहेरच्या आशियाचे नेतृत्व करू लागेल व समाजवादी लोकशाहीचा पुरस्कार करू लागेल तर सुवेझपासून सिंगापुरपर्यंत पसरलेल्या हिंदी महासागरातून ब्रिटिश व अमेरिका आरमारांना बाहेर काढून लावण्याचे सामर्थ्य त्यात येऊ शकेल. चीनलाहि अमेरिकेच्या सावकारी पाशातून मुक्त होण्यास आपणास सहाय्य करता येईल. आता एकदा अमेरिकेचा भांडवलशाही भस्मासुर पॅसिफिक महासागराच्या पलीकडे गेला म्हणजे रशियातील समाजवादहि लोकशाही स्वरूप धारण करून आपले हुकूमशाही स्वरूप सोडून देईल. पण या सर्व गोष्टी आम्ही आमच्या राष्ट्राची राज्यघटना, समाजघटना, आर्थिक घटना समाजवादी बनवू, तरच होऊ शकतील हे जाणून आम्ही आमच्या लोकशाही राज्याला समाजवादी बनविण्याची त्वरा केली पाहिजे.

**नवसंस्कृति व नवा मानव**

आपणास आज एक नवी संस्कृति निर्माण करावयाची आहे याची जाणीव आम्ही सतत ठेविली पाहिजे. तीनशे वर्षांपूर्वी युरोपखंड आधुनिक युगात आले, भौतिक विद्येत त्याने आघाडी मारली. भौतिक सत्याचे संशोधन करीत असतांना आप्तवाक्य व शब्दप्रामाण्य यांच्यापुढे जाऊन बुद्धिवाद आणि आत्मप्रामाण्य यांचा आधार त्याने घेतला. बुद्धिवादातून बुद्धिस्वातंत्र्य जन्मास आले आणि या बुद्धिस्वातंत्र्यासाठीच व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार प्रथम करण्यात येऊ लागला. बुद्धिवाद व व्यक्तिस्वातंत्र्य यांच्या संरक्षणासाठी राज्यक्रांत्या कराव्या लागल्या व तशा राज्यक्रांत्या ब्रिटिश, अमेरिकन व फ्रेंच लोकांनी केल्याहि. पण त्या क्रांत्या केल्यानंतर व्यक्तिस्वातंत्र्य आर्थिक व्यवहारात प्रभावी बनले. सत्यसंशोधन आणि समाजसेवा ही व्रते घेणारांना जे स्वातंत्र्य हवे होते, ते तितके हितावह होते तितकेच हे आर्थिक व्यवहारातील व्यक्तिस्वातंत्र्य अनर्थावह ठरले आहे. प्रत्येक व्यक्तीला वाटेल तितका धनसंग्रह करण्याचे स्वातंत्र्य दिले आणि सर्वांना सर्वांशी अनिर्बंध स्पर्धा करण्याची पूर्ण मुभा दिली म्हणजे समाजाचे, राष्ट्राचे व जगाचे हित आपोआप होईल हे तत्त्व अर्थशास्त्रात अनर्थावह ठरले आहे. आर्थिक व्यवहारांचे अनियंत्रण आणि आयोजित आर्थिक घटना, हेच आजच्या सर्व मानवी अनर्थाचे आद्यकारण आहे. हे तत्त्व अर्थशास्त्रात आता सुप्रतिष्ठित झाले असून आर्थिक नियंत्रणवाद व नियोजित आर्थिक घटना अशा घोषणा सर्वत्र ऐकू येत आहेत. आपल्या संघराज्यातील राज्यघटनेतही ही तत्त्वे अंतर्भूत झाली आहेत. आमच्या सरकारने हे धोरण जाहीर केले आहे. पण अद्यापि एकवर्ग समाजघटनेचे ध्येय आमच्या आर्थिक व राजकीय घटनेत सुप्रतिष्ठित झालेले नाही. ते होईपर्यंत आपण मानवसंस्कृतीच्या निर्मितीस योग्य असा पाया घातला आहे असे म्हणता येणार नाही. हे करावयाचे तर व्यक्तिस्वातंत्र्याला आर्थिक क्षेत्रात नियंत्रण घातले पाहिजे आणि आर्थिक घटनेचा पाया स्वार्थ व स्पर्धा यांवर न घालता

सेवा व सहकार्य या तत्त्वांवर घातला गेला पाहिजे.

**नियंत्रण व नियोजन ही तत्त्वे आधारभूत**

संग्रहबुद्धि आणि स्पर्धा या तत्त्वांना मोकाट सोडल्याचे परिणाम पाहून आता नियंत्रण व नियोजन ही तत्त्वे आर्थिक घटनेला आधारभूत मानण्यात येत आहेत. या पायावर उभारण्यात येणाऱ्या संस्कृतीतच सत्यनिष्ठा, प्रेमभावना आणि सेवावृत्ती ही जीवनमूल्ये टिकू शकतात, याची जाणीव आम्हास होऊ लागली. म्हणूनच हिंदी संस्कृतीचा पूर्ण अभिमान बाळगणारे म. गांधी "सत्य व अहिंसा यांचे मूर्त स्वरूप समाजवादच होय." (Truth and nonviolence must incarnate in Socialism) असे म्हणू लागले आहेत. मानव समाजाला सत्यसंशोधनापासून केवढे सामर्थ्य प्राप्त होऊ शकते, याचा पुरावा युरोपीय संस्कृतीने जगाला आणून दिलाच आहे.

**सत्यनिष्ठेइतकेच प्रेमभावनेचे महत्त्व**

भौतिक सत्याच्या क्षेत्राप्रमाणे सामाजिक सत्याच्या क्षेत्रांतहि आधुनिक युरोपने आघाडी मारली आणि बुद्धिस्वातंत्र्य, सामाजिक समता व राजकीय लोकसत्ता यांचा शोध लाविला. तथापि स्वार्थ व स्पर्धा या आसुरी तत्त्वांवर आर्थिक घटना केल्याने समाजघटनेतील प्रेमाचा झरा आटत गेला आणि सर्व राष्ट्रे अंत:कलह आणि आंतरराष्ट्रीय महायुद्धे यांच्या खाईत लोटली जाऊ लागली. सत्यशोधनाइतकीच प्रेमभावनेची आणि सेवावृत्तीची मानव संस्कृतीला आवश्यकता आहे. इतकेच नाही तर प्रेमभावना व सेवावृत्ति यांच्या अभावी सामाजिक व आत्मिक क्षेत्रातील सत्यसंशोधन खुंटून जाते, असा अनुभव आधुनिक युरोपच्या इतिहासावरून येत आहे. म्हणून सत्यनिष्ठेच्या आग्रहाइतकाच प्रेमभावनेचाहि आग्रह धरला पाहिजे आणि प्रत्येकाने आपापला धंदा चालवितांना समाजसेवेचे व्रत अंगिकारिले पाहिजे असे सांगणारे सत्याग्रही तत्त्वज्ञान प्राचीन भारताच्या संस्कृतीचे अमृतमंथन करून आधुनिक भारताचे निर्माते म. गांधी यांनी जगापुढे ठेविले आहे.

**समाजसेवेलाही स्थितप्रज्ञतेची जरूरी**

सर्व जुन्या अध्यात्माचे सार ज्ञान, प्रेम आणि सेवा या त्रयीत साठविलेले आहे. ज्ञानसंशोधनाचे कार्य केव्हाच पूर्ण होत नाही व कोणतेही शास्त्र मग ते भौतिक असो, सामाजिक असो की अध्यात्मिक असो- केव्हाही पूर्णता पावत नाही. तसेच मनुष्याच्या प्रेमाला कोणतीही मर्यादा घालता कामा नये. माझे कुल, माझी जात, माझा वंश, माझे राष्ट्र, माझा वर्ग अशी कोणतीही मर्यादा ठेवून आपण सामाजिक व नैतिक सत्याचा अथवा सत्-असत्-चा विवेक करू शकत नाही. सद्सद्विवेक करताना बुद्धी पूर्ण निरंहकार व निर्मम झाली पाहिजे आणि प्रज्ञा स्थिर झाली पाहिजे. यासाठीच निर्विकार मनाची व इंद्रियसंयमाची मनुष्याला आवश्यकता आहे. स्थितप्रज्ञता, ब्राह्मी स्थिती आणि निर्वाणप्राप्ती यांची अंत:शांतीला जशी गरज आहे, तशी ती समजोन्नतीला व समाजसेवेलाही आहे. त्यावाचून खरी समाजधारणा होणार नाही व जगात खरे सुख व खरी शांति यांचीही स्थापना होणार नाही.

**बुद्ध अथवा मुक्त मानव**

अशी संस्कृत निर्माण करावयाची, तर सर्व विश्वाचे ज्ञान करून घेण्यात, सर्व विश्वावर प्रेम करण्यात आणि सर्व मानवजातीची सेवा करण्यातच आपल्या जीविताचे साफल्य व मोक्ष आहे असे मानणारे मानव आपणास निर्माण केले पाहिजेत. सर्व धर्मांचा व धर्मसंस्थापकांचा हाच खरा व एकच एक संदेश आहे. सत्याहून दुसरे कोणतेही परब्रह्म जे मानीत नाहीत, आपल्या प्रेमाला जे कोणतीही मर्यादा ठेवीत नाहीत आणि प्रत्येक कर्म करीत असताना त्यांचे जगावर सुखदायकच परिणाम घडावेत, याबद्दल जे सदैव जागृत व दक्ष असतात, असे बुद्ध अथवा मुक्त मानव या जगात पुन: अवतीर्ण व्हावेत हीच आकांक्षा आधुनिक भारताच्या अंत:करणात आज उदित झाली आहे. हीच त्याची आजच्या जगाकडे पहाण्याची नवी दृष्टी होय. ही दृष्टी अगदीच नवी नाही. पण तिची विस्मृति आधुनिक मानवाला झाली होती. भौतिक ज्ञानाने प्राप्त झालेल्या सामर्थ्यामुळे त्याला प्रेमाच्या प्रभावाचा व सेवेच्या तपश्चर्येचा विसर पडला होता. परार्थाला लाथाडून स्वार्थ साधणे यातच मोठेपण आहे, सहकार्य सोडून स्पर्धा करणे हाच निसर्गाचा नियम आहे आणि सेवावृत्तीपेक्षा संग्रहबुद्धिच श्रेष्ठ आहे, असा भ्रम मानवाला झाला होता. तो भ्रम दूर करून मानवाला खरा आदर्श कोणता, ते आज जगाला म. गांधींच्या जीवनाकडे पाहूनच कळू लागले आहे आणि श्रीकृष्ण व गौतमबुद्ध, येशू ख्रिस्त व महंमद पैगंबर या सर्वांचा हाच जीवनसंदेश होता असे जगाला पटू लागले आहे. लोकशाही समाजवाद हाच समाजधारणेचा आजचा युगधर्म असला तरी सत्य, अहिंसा व तप हा मानवाचा सनातन धर्म आहे. त्याचा प्रकाश केव्हाही मंद होऊ देता कामा नये. अशी सर्व विचारी लोकांना आज खात्री पटू लागली आहे. या प्रकाशात आपण वावरत असलो म्हणजे आपण कोणत्याही सामाजिक, आर्थिक, राजकीय व धार्मिक संस्थांत क्रांती करू शकू व आपली ऐहिक प्रगती व उन्नती साधू शकू आणि हे सर्व करूनच आमचा सनातन मानवधर्म जिवंत ठेवू.







# वेदनेतून नवभारताकडे

## प्रा. देवदत्त दाभोलकर

आपण मला लोकप्रतिनिधीसाठी मी काही लिहावे असे सुचवावयास आलात त्या वेळी मी लिहीन ते कदाचित तुम्हाला रुचणार नाही व माझ्या लेखनात कमी-अधिक फेरफार केलेले मला रुचणार नाही असे मी तुम्हाला म्हटले; तरीही श्री. मोहन धारिया यांच्या अनुमतीने तुम्ही परत आग्रह धरला म्हणून हा प्रयत्न. हा लेख लिहावयास सुरुवात करण्यापूर्वी मे १९७४ चा लोकप्रतिनिधीचा अंक नुकताच हाती आला होता, तो अथपासून इतिपर्यंत मी संपूर्णपणे वाचून काढला. प्रथम केवळ स्थूल जिज्ञासा म्हणून; परंतु नंतर सर्व विचार व त्यांचे प्रकाशन प्रामाणिकपणाचे वाटले म्हणून, (यापूर्वीचे अंकही आपण स्नेहभावनेने माझ्याकडे पाठविले; परंतु ते मी तसे वरवरच पाहिले ही रुखरुख आता मनात आहे. असो.)

माझ्या आजच्या विवेचनाच्या दृष्टीनेही या वाचनाचा मला लाभ वाटला. माझ्या मनात असणाऱ्या किंबहुना आज प्रत्येक नागरिकाच्या मनात असणाऱ्या अनेक प्रकारच्या अस्वस्थतेचे दर्शन या लेखांतून-मुलाखतीतून होते. यापैकी काही त्या त्या क्षेत्रातील भारतात आज वरिष्ठ स्तरावर वावरणाऱ्या व्यक्तींकडून लिहिले गेले होते. विविध स्तरांवरील व्यक्तींना त्यापैकी प्रसंगपरत्वे किंवा अप्रासंगिकपणे भेटण्याचा योग येतो त्या वेळी एक गोष्ट जाणवते ती ही की ही अस्वस्थता, ही तीव्र चिंता सर्वांच्या मनात आहे. केवळ स्वार्थबुद्धीने प्रेरित झालेल्या व्यक्ती, जरी घेतल्या तरी हे असे किती दिवस चालू शकेल, कदाचित आपले निभावून जाईल, परंतु आपल्या मुलाबाळांचे काय होईल. अशा स्वरूपाची चिंता त्यांच्या मनात आहे. या व्यक्ती आपापल्या कर्मांची फळे भोगतील असे म्हणून त्यांचा विचार मनातून काढून टाकावयास हरकत नाही. परंतु नाहीतर, अस्वस्थतेसाठी अस्वस्थता, क्रांतीची जननी म्हणून, ज्यांना इष्ट वाटत नसेल व या अस्वस्थतेतून अखेर काही श्रेयस्कर निर्माण होईल की आपण अधिक दुर्गतीला जाऊन पोहोचू अशी शंका स्वाभाविकपणे ज्यांच्या मनात निर्माण होत असेल अशा सर्व लोकांना या अवस्थेतून बाहेर पडण्याचा मार्ग शोधण्याची निकड वाटल्याखेरीज राहणार नाही. अशी निकड सर्वांना वाटते; परंतु मार्ग कोणालाच सुचत नाही अशी आजची दुर्दैवी परिस्थिती आहे. एखाद्या राष्ट्राचे वैचारिक आणि व्यावहारिक क्षेत्रातील कर्तृत्व, संपूर्ण एका पिढीच्या कालखंडाच्या काळात, काळाच्या गरजेच्या मानाने इतके थिटे पडल्याचे उदाहरण सहसा आढळणार नाही. यात कोणत्याही एका व्यक्तीला, पक्षाला दोषी धरण्याचा हेतू नाही. 'Passing the buck' पद्धतीचा राजकीय खेळ खेळून ज्यांच्या मनाचे समाधान होत असेल किंवा असा खेळ खेळण्यातच ज्यांचे अस्तित्व टिकून रहाण्यासारखे असेल त्यांनी तो खेळ अवश्य खेळावा. परंतु इतरांनी अधिक अंतर्मुख होऊन विचार केला पाहिजे.

पंडित जवाहरलाल नेहरू यांच्याबद्दल माझ्या मनात नितांत आदर आहे. या आदराला वैचारिक बैठक आहे, त्याचप्रमाणे भावनात्मकही आहे. परंतु स्वातंत्र्योत्तर कालखंडात परिस्थितीच्या आव्हानाच्या संदर्भात त्यांचे नेतृत्त्व दुर्दैवाने फार अपुरे पडले ही माझ्या मनाची खंत आहे. याचे काही विवेचन पुढे येईल. आता या ठिकाणी मी हा निर्देश अशासाठी करतो की केवळ निष्ठेच्या भावनेने मी त्यांचे विचार उद्धृत करण्याचा प्रयत्न करीत आहे असे वाटू नये. १९५८ च्या सुमारास लिहिलेल्या आपल्या लेखात जवाहरलालजी म्हणतात: (आशय-भाषांतर नव्हे.)

'हिंसाचाराने आपण प्रश्न सोडविता कामा नये ही गांधीजींची आपल्याला शिकवण होती. हिंसाचाराने प्रश्न खऱ्या अर्थाने सुटूच शकणार नाहीत. साधने आणि साध्य यात मेळ असला पाहिजे; दुष्ट साधनांनी मंगल ध्येय साध्य करता येणार नाही, हे विधान आज केवळ नीतिशास्त्रातील तांत्रिक विचारांचा विषय राहिलेले नाही; ते एक निखळ व्यावहारिक सत्य आहे.'

'लोक विचारतात, मोठ्या प्रमाणावर हिंसा टाळली, परंतु आज अल्प प्रमाणावर हिंसा केली तर चालू शकेल की नाही ? असे चालू शकणार नाही. अल्प प्रमाणावरील हिंसा मोठे प्रमाण घेतल्याखेरीज राहणार नाही. या सर्व उलथा-पालथीतून शेवटी पुरोगामी क्रांतिकारक शक्तींचाच विजय होईल असे समजण्याचे कारण नाही. जगाचा इतिहास तसे सांगत नाही. जर्मनीमध्ये साम्यवादी आणि समाजवादी यांच्या झगड्यात शेवटी राक्षसी





अनुक्रमणिका

नाझींच्याच हातात सत्ता गेली व त्यांनी साम्यवादी व समाजवादी असा दोघांचाही निःपात केला. भारतात इतके भेद व इतक्या फुटीर प्रवृत्ती अस्तित्वात आहेत की भारताने हा धोका कधीही स्वीकारता कामा नये.

हिंसाचाराविषयीचे जवाहरलालजींचे हे विश्लेषण मी पूर्णपणे मान्य करतो. आजच्या अस्थिर वातावरणाविषयी व साठत येत चाललेल्या हिंसक स्फोटाविषयी मला चिंता वाटते ती याचमुळे. या विश्लेषणाचा आधार घेऊन या अस्वस्थतेला जे जे प्रकट वाट देतात त्यांच्यावर दोषारोप लादून मोकळे होणे ही एक यानंतरची प्रतिक्रिया होऊ शकते. ही प्रतिक्रिया एकतर मूर्खपणाची असते किंवा सध्याच्या परिस्थितीतच ज्यांचा स्वार्थ साधला जात आहे, अशा लोकांची स्वार्थीपणाची असते. या अस्वस्थतेलाच प्रकट वाट देणाऱ्या-इतकेच, किंबहुना त्याहून कितीतरी पटीने अधिक, या अस्वस्थतेला कारणीभूत अशी परिस्थिती निर्माण करणाऱ्यांचे या बाबतीतले उत्तरदायित्व आहे. भारतात अधिकारारूढ राजकीय पक्षाला ही जबाबदारी टाळता येणार नाही. अजूनही हा पक्ष प्रामाणिक आत्मपरीक्षण व कठोर आत्मपरिवर्तन करू लागेल तरच आशेला काही जागा आहे. एरवी विनाशाची चर्चा करताना कोणास किती दोषी ठरवावयाचे हेच काम दहा वर्षांनंतर या कालखंडाचा इतिहास लिहिणाऱ्यालाच करावे लागेल.

आज भारतीय लोकशाही एका विलक्षण कोंडीत सापडल्यासारखी झालेली आहे. कोंडीत सापडलेले मांजरदेखील वाघासारखे क्रूर बनते, तर लोकशाहीची तशाच अवस्थेत तशीच तीव्र प्रतिक्रिया आली तर नवल ते कोणते? भारतात शासनाचा आणि जनतेचा मतदानापुरता संबंध राहिलेला आहे. परंतु शासनाच्या आणि जनतेच्या प्रश्नांचा, आशाआकांक्षांचा अनुबंध राहिलेला नाही. यामुळेच जनता निवडणुकीत ज्यांना निवडून देते त्यांच्याविरुद्ध मोर्चे, घेराव, निदर्शने, बंद या मार्गांनी प्रभावीपणे उभी राहते. आपल्यावरील करांचा बोजा ज्यामुळे वाढणार असतो अशा मागण्यांसाठी संप करणाऱ्यांनाही ती सहानुभूती दाखवते. शासनाने आपल्यावर लादलेला अगतिकतेचा, असहाय्यतेचा वैताग प्रकट करण्याचे मार्ग ह्या दृष्टीनेच ती या कार्यक्रमाकडे पाहते. हा कार्यक्रम करणारे नेते वा राजकीय पक्ष यांचे तिला याहून अधिक काहीच सोयरसुतक नसते. या अशांततेतून आजवर कोणताच विरोधी राजकीय पक्ष बळ घेऊ शकत नाही ही जशी वस्तुस्थिती आहे. त्याचप्रमाणे ही अस्वस्थता अशाच विस्कळित, असंघटित, अशाश्वत परंतु तात्कालिक क्रियाशील अशा विद्यार्थीवर्गाशी संमिश्र होऊन राज्ययंत्रणा उधळून टाकण्याइतकी प्रभावी होऊ शकते हाही आता आपला अनुभव आहे.

या अशांततेतून विरोधी पक्ष कधी अधिकारावर येतील याची सुतराम शक्यता नाही. संमिश्रपणे कोठे अधिकारावर आले तर ते चांगले राज्य चालवू शकतील असा इतिहास नाही. काही वेळा एकेकटा पक्ष एखाद्या प्रदेशात किंवा महानगरपालिकेत अधिकारावर आला तेव्हा त्या पक्षाने आपल्या आचरणात निर्मळपणाच्या दृष्टीने, जनहिताच्या दृष्टीने काही विशेष वेगळेपणा दाखवला असा जनतेचा अनुभव नाही. भारतात सर्वमान्य प्रामाणिक नेत्याचे नाव घ्यावयाचे झाले तर आजही जयप्रकाश यांचेच नाव घ्यावे लागते व तेथेच थांबावे लागते. (त्यांचेही प्रतिमाहनन करण्याचा प्रयत्न होतो, परंतु त्या प्रयत्नाची विफलताही सार्वत्रिक प्रतिक्रियेतून प्रत्ययास येते.) विरोधी पक्षांच्या या उणीवांचा फायदा काँग्रेसपक्ष अर्थातच निवडणुकीत घेतल्याखेरीज रहात नाही.

निवडणुकीच्या मार्गाने काँग्रेसपक्ष हटणे हे भारतात अत्यंत दुर्घट आहे. एकाच पक्षाच्या विरोधाने हटणे हे तर अशक्य आहे. या सामर्थ्यात काँग्रेसला खरा अभिमान वाटावा असे मात्र फारच थोडे आहे. किंबहुना काही नाही असे म्हटले तरी चालेल. कोणताही पक्ष अशा बहुमताने अधिकारावर असता तर कालगतीने ज्या प्रगतीचे श्रेय आज काँग्रेसला मिळते ते श्रेय त्या पक्षाला मिळाले असते. तेव्हा तो भाग काँग्रेस पक्षाचा विशेष श्रेयाचा असे मानण्याचे कारण नाही. इतर कोणता पक्ष अधिकारावर असता तर या प्रगतीत काही डावेउजवे जरूर झाले असते; परंतु प्रगती झालीच नसती असे मानावयाचे काहीच कारण नाही. परंतु तरीही या प्रगतीच्या श्रेयाचा लाभ काँग्रेसपक्षाने उठवण्याचा प्रयत्न केला तर ते स्वाभाविक व क्षम्य मानले पाहिजे, जात-पात, धर्म आदि भावनांचा वापर भारतात सर्वत्र राजकीय पक्ष प्रकट-अप्रकटपणे करतात; त्यामुळे त्या निकषावरही कोणाला विशेष उणेअधिक म्हणावयाचे कारण नाही.

परंतु पैशाकडे पैसा जातो, सत्तेकडे सत्ता जाते, बहुमताकडे मते जातात या पद्धतीने राज्यसत्तेत अधिकारावर असल्याच्या घटनेचाच फायदा काँग्रेस पक्षाला मिळतो. परंतु त्याहीपेक्षा सर्वात महत्त्वाची व लोकशाहीच्या दृष्टीने अतिशय धोक्याची गोष्ट अशी की निवडणुका यशस्वीपणे लढण्यासाठी लागणारा अपार पैसा शासनकर्ता पक्ष सहजपणे व मोठ्या प्रमाणावर उभा करू शकतो. भारतीय राजकारणाची या ठिकाणी अर्थव्यवस्थेशी असणारी सांगड ही अत्यंत भयावह आहे. काळाबाजार ही केवळ व्यापारी धनिक वर्गाचीच गरज राहिलेली नाही तर ती राजकारणी लोकांचीही गरज झालेली आहे. निवडणुकीसाठी किती खर्च झाला याचा हिशोब ठेवणे

शक्य नसते, इष्टही नसते. त्यामुळे त्याचा हिशोब कोणी मागणार नाही, कोणाला द्यावा लागणार नाही, कोणी घेण्याचा प्रयत्न केला तरी सापडणार नाही असा पैसा हाताशी असणे हे निवडणुकीच्या दृष्टीने आवश्यक असते. काळ्या बाजारातील पैसा या सर्व अपेक्षा पूर्ण करतो. पैसा हे निवडणुका जिंकण्याचे साधन व काळाबाजार हा असा पैसा गोळा करण्याचे साधन अशी ही साखळी आहे. व्यापारी वर्ग, भांडवलदार वर्ग जो पक्ष निवडून येण्याची निश्चिती असते त्याला हा पैसा सहजच पुरवतो. त्याच्या दृष्टीने ही भांडवल-गुंतवणूक असते. (इतर कोणत्याही पद्धतीने गुंतवता येण्यासारखे नसलेल्या भांडवलाची ही गुंतवणूक असते हे वेगळेच) या धनिकांचे ऐकू येणारे दुःख एवढेच असते, हे लोक पैसा मागावयास आमच्याकडेच येतात आणि परत व्यासपीठावर आमच्यावरच टीका करतात. पैसा आमचा, परंतु सत्ता, प्रतिष्ठा मात्र या राजकारणी लोकांची. अशा रितीने Black Money नंतर Black mail money म्हणून पुढे सरकत असतो. या सर्व व्यवहारात राजसत्ता व धनसत्ता यांचा तोल कसा राहतो त्याचे विवेचन या ठिकाणी करण्याचे कारण नाही. परंतु जनतेच्या हिताचा विसर या दोघांनाही पडलेला असतो हे मात्र निश्चित. या पैशाच्या प्रभावापुढे जनतेलाही आपल्या हिताचा विसर पडतो हे भारतीय परिस्थितीचे सर्वात मोठे दुर्दैव आहे.

या परिस्थितीत अशीच कोसळत भारतीय लोकशाही शेवटी रसातळाला जाणार काय? हे घडणारच नाही अशी ग्वाही आज कट्टर आशावादीदेखील देऊ शकणार नाही. या परिस्थितीतून बाहेर पडावयाचे तर भारताच्या दृष्टीने दोन गोष्टी आवश्यक आहेत असे मी सतत मानत आलेला आहे. १) ज्या नेत्यावर सर्व भारतातील जनतेचा आंतरिक विश्वास आहे अशा नेत्याचे अस्तित्व २) या नेत्याचे आदेश कार्यवाहीत आणण्याची कुवत असलेल्या ध्येयप्रवण समर्थ संघटनेचें अस्तित्व. यापैकी पहिली गोष्ट भारतातील राष्ट्रीय एकात्मतेच्या भावनेच्या दृष्टीनेही महत्त्वाची आहे. गांधीजी जवाहरलालजी यांच्या व्यक्तिमत्त्वात ही उंची सहजपणे होती. शास्त्रीजींच्या व्यक्तिमत्त्वाला ही उंची भारत-पाक युद्धांच्या पार्श्वभूमीवर झपाट्याने लाभली. नंतर काही वर्षे निर्नायकीसारखी गेली. परंतु १९७१ नंतर ज्या तडफेने निर्णय घेण्याची व ते निर्णय कार्यवाहीत आणण्याची कुवत इंदिराजींनी दाखविली त्यामुळे पुन्हा एकवार भारताच्या राजकीय क्षितिजावर अशा नेतृत्वाचा उदय झाला. बांगला देश विमोचनाचे जे ऐतिहासिक असाधारण महत्त्वाचे यश इंदिराजींनी मिळविले त्यामुळे तर त्यांच्या या नेतृत्वाचा सूर्य राजकीय आकाशात मध्यान्हीच्या तेजाने तळपू लागला. इंदिरा हवेने अनेकांच्या (यातच मी माझीही समावेश करतो.) आशेचे पतंग स्वप्नाच्या ढगात वावरू लागले. आज ते अगदीच काटले गेले नसले, वा जमिनीला टेकलेले नसले, तरी ते खूप खाली उतरले आहेत व त्यांची दिशा घसरतच आहे, हे स्पष्टपणे जाणवल्याखेरीज रहात नाही.

हा एक तर नेतृत्त्वाने केलेला व्यक्तिगत अपेक्षाभंग असेल ( व तसे असेल तर त्यासारखे दुर्दैव तेच-नेतृत्वाच्या व जनतेच्याही दृष्टीने) किंवा परिस्थितीच्या रेट्यापुढील एकाकी नेतृत्त्वाची असहाय्य शरणागती असेल. स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही आपल्याला अपुरी क्रांती अजून पूर्ण करावयाची आहे याची गांधीजींना स्पष्टपणे जाणीव होती. सत्तेच्या मागे न लागता, लोकसेवक समाजात काँग्रेसचे रूपांतर करा या त्यांच्या सूचनेतील हा मुख्य आशय होता. ही सूचना जशीच्या तशी मान्य करणे व्यावहारिक दृष्ट्या अडचणीचे वाटले तर अधिकारपदापेक्षा ध्येयनिष्ठ कार्यकर्त्यांची संघटना बांधणे हे अधिक महत्त्वाचे आहे व या क्रांतिकारक पक्षसंघटनेचा शासनात अधिकारावर असणाऱ्या व्यक्तीवर सदैव अंकुश राहिला पाहिजे हे जर काँग्रेस पक्षाने लक्षात घेतले असते व त्याविषयी तो दक्ष राहिला असता तर आजची ही दुरवस्था निर्माण झाली नसती. या अवस्थेत या पद्धतीने देश येऊ देण्याविषयीचा दोष जवाहरलालजींपासून ते आजच्या काँग्रेस नेतृत्वापर्यंत सर्वांनी स्वीकारला पाहिजे. यातून बाहेर पडण्याचा एकमेव मार्ग म्हणजे आजही या क्षेत्रात मुळापासून सुरुवात करणे हाच आहे. हा प्रामाणिक प्रयत्न झाला तर आजच्या काँग्रेसमधील आणखी काही व्यक्ती, आणखी काही गट बाहेर फेकले जातील, परंतु नव्या काँग्रेसमध्ये समविचाराचे अनेक लोक येऊन मिळतीलही. मुख्य म्हणजे काँग्रेसचा व जनतेचा आज मतदानाच्या पेटीतूनच जुळणारा दुवा क्रियाशील क्रांतिकारक कार्यक्रमातून भक्कमपणे जोडला जाईल. व्यक्तिगतरित्या यात काही पणाला लावावे लागले तरी क्रांतिकारक नेतृत्त्वाने ते पणाला लावले पाहिजे; परंतु सुदैवाने काँग्रेसमधील पुरोगामी सर्वश्रेष्ठ नेतृत्त्वाने ही हिंमत दाखविली तर व्यक्तिगतरित्या त्या नेतृत्त्वाचे सामर्थ्य कमी न होता उलट अधिकच वाढेल; अशीच आजची परिस्थिती आहे. जनता अशांत आहे ही गोष्ट तर खरीच; परंतु ती केवळ हे सर्व सोसावे लागते म्हणून नव्हे. महाराष्ट्रातील एका मान्यवर मंत्र्याशी याविषयी बोलताना मी म्हटले होते, "लोक सोसावे लागते म्हणून चिडतात एवढीच तुमची समजूत असेल तर ते चुकीचे आहे. सोसावे लागते त्यापेक्षाही अगतिकपणे, असहाय्यपणे, अकारण, कोणाच्या तरी मूर्खपणाने, सहन करावे लागते म्हणून जनता चिडते. भारत-पाक,


अनुक्रमणिका

भारत-चीन युद्धात, बांगला देश विमोचनात जनतेने काय कमी सहनशक्ती दाखविली? वेदना नसावी या मागणीपेक्षा 'वेदनेला अर्थ दे रे' एवढीच जनतेची मागणी असते. वेदनेमुळे माणसे तळमळतात; परंतु चिडत नाहीत. स्त्री किती आनंदाने प्रसूति-वेदना सहन करते हे पाहिले तरी हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. आपल्या वेदनेतून नवभारताची निर्मिती होत आहे - काही व्यक्तींच्या व गटांच्या हितासाठी आपला बळी दिला जात नाही असा विश्वास ज्यावेळी जनतेला वाटेल त्यावेळी जनता असे किंवा याहूनही अधिक कष्ट आनंदाने सोसावयास तयार होईल.

'वेदनेला अर्थ दे रे' ही जनतेची साधी सुयोग्य अपेक्षा अधिकारारूढ नेतृत्त्व पुरी करणार नसेल तर नंतरच्या सार्वत्रिक अनर्थाला आपण सर्वांनीच मनोमन तयार असावे हेच युक्त. काळाने यासाठी देखील आता फार सवड ठेवलेली नाही!



## समाजवादाची भांडवलशाहीवरही आघाडी

शेवटी जी तत्त्वप्रणाली वा राज्यव्यवस्था न्याय्य, समृद्ध आणि आनंदी समाज निर्माण करते व केवळ सैद्धांतिक न राहता तिचा दैनंदिन जीवनात, समाजाच्या सर्व घटकांना समृद्धी, समान संधी देण्यास उपयुक्त ठरते, तीच आदर्श असते. केवळ स्वप्नरंजनावर जगता येत नाही. या निकषांवर समाजवादी राष्ट्रांत काय घडते ते पाहू या.

भांडवलशाहीचा विजय झाला आहे; पैसा हाच परमेश्वर असे मानणाऱ्या उजव्या व मूलतत्त्ववादी लोकांना धक्का देणारे वास्तव पहा -

१. **दरडोई उत्पन्न** - जगात सर्वात जास्त म्हणजे अगदी अमेरिकेपेक्षाही दरडोई ५०० डॉलर्स प्रतिवर्षी जास्त.

२. **तंत्रज्ञानाचा वापर** - जगात सर्वात प्रगत व अत्याधुनिक तंत्रज्ञाननिर्मिती व समाजातल्या सर्व स्तरांना, अगदी पहिलीतल्या मुलालाही उपलब्ध. उदा. उत्तम मोबाईल फोन अमेरिकेत ३५ टक्के लोकांकडे आहेत. तर समाजवादी राष्ट्रांत ७७ टक्के लोकांकडे. एरिस्सन, नोकिया या समाजवादी राष्ट्रातील कंपन्या आहेत, हे तुम्हाला माहीत आहे काय? मुंबईत अमेरिकन वकिलातीत रांग लावून 'सागरा प्राण तळमळला' असे म्हणणाऱ्या लोकांना हे वाचून धक्काच बसेल.

३. **जगात भ्रष्टाचार सर्वांत कमी** - अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या एका जागतिक सूचीत सर्वात जास्त भ्रष्टाचाराची राष्ट्रे इंडोनेशिया, भारत व नायजेरिया होती; तर सर्वात कमी भ्रष्टाचार स्कॅंडिनेव्हियातील समाजवादी राष्ट्रांत होता. समाजवादामुळे भ्रष्टाचार वाढला असा कांगावा करणाऱ्यांचे डोळे यामुळेउघडावेत.

४. **न्याय्य समाजव्यवस्था** - स्त्री-पुरुष समानतेचे आदर्श म्हणून या समाजवादी राष्ट्रांकडे बघण्यात येते. अगदी अमेरिकेतसुद्धा स्त्रियांचे पगार काम करणाऱ्या पुरुषांपेक्षा ३० टक्के कमी असतात. स्त्री-पुरुष समता प्रत्यक्ष दैनंदिन जीवनात अमलात आणण्यात अग्रगण्य राष्ट्रे म्हणून या समाजवादी राष्ट्रांकडे पाहिले जाते.

५. **गुन्हेगारी सर्वांत कमी** - या समाजवादी राष्ट्रांत हिंसक गुन्हे तर होत नाहीतच, पण साधे भुरटे गुन्हेसुद्धा जगात सर्वांत कमी आहेत.

६. **धर्म व समाजकारण यांची पूर्ण फारकत** - जगभर जिथे जिथे धर्म व समाजकारण, राजकारण यांची गल्लत झाली तिथे तिथे त्या समाजाचा पूर्ण विनाश झाला, असे इतिहास सांगतो. त्याला एकही अपवाद नाही, या समाजवादी राष्ट्रांत धर्माचे अजिबात अवडंबर नाही. धर्म ही वैयक्तिक बाब आहे व ती खाजगी वेळी व स्थळी करावी; समाजास त्यासाठी वेठीला धरू नये हे तत्त्व तिथे प्रत्यक्षात आचरणात आणले जाते.

७. **१०० टक्के साक्षरता व अल्पमूल्य उच्च शिक्षण** - १०० टक्के नुसते साक्षरच नव्हे तर उच्चशिक्षित असे जगातील एकमेव उदाहरण म्हणजे समाजवादी राष्ट्रे हे सर्वमान्य आहे. अगदी अमेरिकेतसुद्धा इतकी साक्षरता व उच्च शिक्षण नाही. काळ्या व लॅटिनो लोकांची तर शिक्षणाची परवडच आहे. म्हणजे ज्ञानाधिष्ठित समाज जर आदर्श असेल, तर पुन्हा समाजवादी तत्त्वाचे प्रत्यक्ष दैनंदिन जीवनात आचरण हाच उपाय दिसतो.

८. **आनंदी व सुदृढ समाज** - केवळ तंत्रज्ञानातच नव्हे तर खेळ, नाटके, समाजसेवा यांतही समाजवादी राष्ट्रे आघाडीवर आहेत. आंतरराष्ट्रीय मदत अप्रगत राष्ट्रांना देण्यात या समाजवादी राष्ट्रांतील सेवाभावी संस्था सर्वांत पुढे असतात. अर्थातच आपल्या समाजवाद्यांना आंतरराष्ट्रीय मदतीचा विटाळ असल्याने त्यांनी त्याचा फायदा घेतला नाही. परिणामी प्रतिगाम्यांनीच समाजवादी राष्ट्रांनी पाठविलेली मदत पटकावण्यात पुढाकार घेतला, ही वेगळी.

थोडक्यात, पृथ्वीवर नंदनवन येते ते समाजवाद्यांच्या आचरणाने, दैनंदिन जीवनात समाजवादी समाजरचना राबविल्याने.

**- सुनील देशमुख**

(साधना १७ ऑगस्ट २००२)

अनुक्रमणिका

# गांधी - मार्क्स : तौलनिक मूल्यमापनाची एक दिशा

डॉ. श्रीपाल सबनीस

**गांधीवाद-साम्यवाद : एका प्रेरणेचे भिन्न आविष्कार!**

मानवी कल्याणाच्या अटीतून जन्माला आलेल्या आणि विशिष्ठ आकार घेतलेल्या जागतिक स्तरावरील अत्यंत प्रभावी 'ईझम' मध्ये गांधीवादाचा अवश्य विचार केला पाहिजे. साम्यवाद, समाजवाद, आंबेडकरवाद या विचारधारांनी भारतीय समाजमन प्रभावित झाले आहे ही वस्तुस्थिती असली, तरी गांधींचा 'जीवनविचार' भारतीयच नव्हे तर जागतिक समाजमनाला आजही मोहिनी घालून आहे. अर्थातच, 'विश्वमनाच्या' प्रश्नांची सोडवणूक करण्याच्या कामी म. गांधींच्या विचारधनाची गरज, जगाला आज व उद्याही भासणार आहेच !

नैतिक मूल्यांचा आग्रह हा गांधीवादी विचार-प्रणालीचा आत्मा आहे. 'सत्या'चे विविध प्रयोग व माणसाच्या व्यक्तिमत्त्वातील 'चांगुलपणावर' विश्वास, हा म. गांधींच्या एकूण जीवनदृष्टीचा आधार आहे. प्राकृतिक प्रेरणा या सत्यच होत. पण ह्या अंतिम आणि नियंत्रणबाहेरच्या नसून त्यांवर सांस्कृतिक मूल्यांच्या संस्कारातून मात करून माणूस जागवता येतो, उभा करता येतो. म्हणूनच अन्नक्षुधा व कामक्षुधांच्या नैसर्गिक प्रेरणांच्या दयेवर न जगता, त्यांचे अस्तित्व मान्य करूनही माणसाचा सांस्कृतिक वारसा उन्नत करता येतो, या सत्याचे विसाव्या शतकातील जागतिक स्वरावरील प्रतिनिधी म. गांधी होत. कार्ल मार्क्स आणि फ्राईड यांनी माणसाच्या नैसर्गिक प्रेरणांचे निर्णायक महत्त्व लक्षात घेऊन आपले सिद्धांत मांडले आहेत ते योग्यच आहेत. पण गांधींच्या विचारातील माणसाचे 'देवत्व' हा अत्यंत विलोभनीय असा सामर्थ्याचा आविष्कार आहे.

माणसातील मांगल्यपूजेचा, सत्यप्रियतेसाठी आत्मबलिदान देणाऱ्या पावित्र्याचा, चराचर सृष्टीला कवेत कवटाळणाऱ्या कारुण्याचा आणि संपूर्ण जगाला क्षमा-शीलतेच्या वर्षावाने न्हाऊ घालणाऱ्या उदात्त-व्यापक प्रकृतीचा आवाज, म्हणजे म. गांधी जीवनविचार होय !

परिस्थितीच्या बदलानुसार माणसाच्या वृत्ती बदलता येतात, या दिशेने एकोणिसाव्या शतकातील मार्क्सवादाने सैद्धांतिक मांडणी केली, तर गांधींच्या विचारव्यूहात, माणूस बदलल्याशिवाय व्यवस्था बदलता येत नाही, या सत्याचा आविष्कार आहे. मार्क्सवादाचे केंद्र 'माणूसच' असले तरी साम्यवाद आणि गांधीवाद यांच्या विचार-दिशा भिन्न आहेत. पण अखिल मानवजातीच्या कल्याणाचीच प्रेरणा, या दोन्ही दर्शनांच्या गाभ्यात आहे हे नाकारून चालणार नाही. म. गांधींनी स्वेच्छेने केलेले दान व त्याग यांवर अधिक भर दिला आहे. शासनसंस्थेचा आणि शेवटच्या माणसापर्यंत स्वातंत्र्य, समता व बंधुतेचा प्रत्यक्ष पोहोचलेला अनुभव, हेच साम्यवाद व गांधीवाद यांचे ध्येय आहे. पण साधनाच्या शुद्धीशिवाय केवळ साध्याची शुद्धता पुरेशी नाही, हा गांधीवादाचा आग्रह आहे. म्हणूनच वर्गसंघर्ष आणि त्या अनुषंगाने अपरिहार्य ठरणारा हिंसाचार हा गांधीवादी विचार-वर्तुळात बहिष्कृत ठरविला गेला आहे. या मुद्यावर लोकशाहीची संकल्पना गांधीवादाला सुसंवादी ठरावी. अर्थात समाजवादाच्या प्रेरणा व ध्येय गांधीवादाने नाकारल्या नाहीत, उलट शोषणाचा सैद्धांतिक पातळीवरील विरोध, हे गांधीवादाचे खास वैशिष्ट्य आहे. शोषणप्रक्रियेत शोषक व शोषित यांच्यात न्याय्य संबंध नसतात. म्हणूनच शोषितांच्या न्यायासाठी सत्याचा आग्रह हे प्रत्यक्ष कृतीतील हत्यार गांधीवादाने जगाला दिले.

अन्याय करणारा माणूस हा माणूसच असतो व त्याचे हृदयपरिवर्तन होऊ शकते, यावर गांधींचा विश्वास आहे. आणि सत्याग्रहाच्या मार्गानेच व्यक्ती, समूह, राष्ट्र या स्तरांवरील अन्याय नष्ट करता येतो, ही विवेकनिष्ठ मानवी सामर्थ्याची ज्वलंत जाणीव गांधीवादाच्या विचारधनाची व ऐतिहासिक कृतिपरंपरेची जगाला दिव्य देणगी आहे.

द. आफ्रिकेतील मूठभर गोऱ्यांच्या अन्याय बंधनांनी पिडलेल्या गुलामांच्या मुक्तिलढ्यातून, मोहन करमचंद गांधी महात्मा गांधीमध्ये रूपांतर झाले आणि त्यांच्या अहिंसात्मक सत्याग्रही आंदोलनाने केवळ भारतीय स्वातंत्र्याचाच सूर्य उगवला नाही, तर संपूर्ण जगातील गुलामांच्या अन्यायपीडितांच्या मुक्तीच्या शक्यता निर्माण झाल्या. यातूनच म. गांधींच्या स्थल-कालाच्या संकुचित चौकटी मोडून पडल्या आणि म. गांधी हे प्रत्येक काळातील स्वातंत्र्य मागणाऱ्या कोणत्याही जनसमूहाचे प्रतिनिधी ठरले.

म. गांधींचा विचारव्यूह हा शास्त्रीय बैठकीवर आधारित






नसून त्यांच्या 'आतल्या आवाजा'वर पेललेला आहे. म्हणूनच वेळोवेळी प्रगट झालेले गांधीविचार हे शास्त्रीय चिंतनाचा परिपाक नसून, संपूर्ण जीवनाकडे एका उदात्त भूमिकेतून पाहणाऱ्या साधुत्वाचे दर्शन आहे.

शास्त्रीयतेचे, बुद्धिप्रामाण्याचे महत्त्व सर्वच क्षेत्रात मान्यच व्हावे! पण मानवी कल्याणाची चिंता व चिंतन करणाऱ्या महापुरुषांच्या कृती-उक्ती नेहमीच शास्त्रीय कसोट्यातून समजून घेता येतात असे नाही. कारण शास्त्रीयता-तर्कशुद्धता, बुद्धिप्रामाण्य या चौकटीतच संपूर्ण मानवी जीवन सामावते-वहरते असे नाही. परिहार्य प्रश्नांच्या उत्तरासाठी जगातील सर्व बुद्धिनिष्ठ 'ईझम' उपयुक्त ठरत असले तरी अपरिहार्य प्रश्नांची उत्तरे शोधताना जडवादी व चैतन्यवादी 'ईझम' यांची संपूर्ण बेरीजही कमी पडावी एवढी गुंतागुंत त्यामध्ये आहे.

तेव्हा विश्वमानवाच्या कल्याणाचे स्वप्न पाहण्याचा अधिकार सर्वांनाच आहे. कारण महापुरुष, तत्त्वज्ञ, कलावंत, शास्त्रज्ञ यांचे ऐतिहासिक, सांस्कृतिक संचित ही अखिल मानवजातीची पुण्याई असून उज्ज्वल भविष्याकडे नेणारा तो अमोल ठेवा आहे. भौतिकवादी विचारमीमांसा शास्त्रीय अन्वेषण पद्धतीने मांडून जगाच्या परिवर्तनाची गुरूकिल्ली माणसाच्या हाती देणारा कार्ल मार्क्स हा निर्णायक महत्त्वाचा खराच! पण शस्त्र-अस्त्रांच्या राक्षसी स्पर्धेत माणसांतील पशुत्वाचे सामर्थ्य वाढून संपूर्ण मानवजातीसह चराचर सृष्टीचा संहारही अटळ ठरतो, तेव्हा माणसाचा स्वत:वरचा विश्वास बलशाली करून 'माणूस' हे केंद्र कायम ठेवणारा म. गांधींसारखा मांगल्य आणि कारुण्य शिंपडणारा महापुरुषही तेवढाच महत्त्वाचा ठरतो. महापुरुषांच्या सर्वच 'कृती-उक्ती' या त्यांच्या असामान्यत्वाच्या निदर्शक नसतात. म्हणूनच गांधींच्या अर्थशास्त्रासह अनेक गोष्टी या विवाद्य आहेत. पण म्हणून जगाची गांधीविषयक उपयुक्तता कमी होत नाही. कारण गांधी हा माणसाच्या सर्वांगीण उत्थानाचा प्रेरणास्रोतच आहे. आणि म्हणूनच तो महात्माही आहे !

**गांधी : महात्मा आणि अर्थशास्त्रज्ञ (?)**

गांधी हा भारतासह एकूणच जागतिक इतिहासातील चमत्कार वाटावा असा महात्मा आहे. अर्थातच महात्मा या शब्दाने सूचित होणारे मोठेपण व महान गुण गांधीत जरूर असले, तरी गांधीत सामान्य माणूसही होताच. तो सर्वच असामान्य माणसांत असतोच. महापुरुषाच्या मूल्यमापनातून त्याचे 'असामान्यपण' व 'सामान्यपण' वस्तुनिष्ठतेच्या निकषावर नोंदवता येते.

वैचारिक परंपरेत महापुरुषांच्या कर्तृत्वाची चिकित्सा करताना समर्थकांकडून अतिरिक्त गौरव आणि विरोधकांकडून शिव्याशाप यांची खैरात, इतिहासाच्या नावाने करण्यात आली. वास्तविक कोणत्याही महापुरुषाच्या व्यक्तिमत्त्वात काही दोष-मर्यादा असतातच. त्याचे परीक्षण करण्याची परंपराच आपल्याकडे नाही.

गांधीभक्तांनी 'रक्ताचा एक थेंबही न गाळता भारताला केवळ अहिंसेने स्वातंत्र्य मिळाले' असा गैरसमज करून घेऊन, गांधींच्या नावे अर्धसत्याम इतिहास लिहिला, तर कम्युनिस्टक व आंबेडकरवाद्यांनी गांधींना भांडवलशाहीचा हस्तक मानण्याची चूक केली.

मुसलमानांनी गांधींना 'सनातनी हिंदू' मानून, पाकिस्तानचा विरोधक मानून आपले शत्रुत्व पोसले, तर हिंदुत्ववाद्यांनी गांधींना 'मुस्लीमधार्जिणा' म्हणून गोळी घातली.

अहिंसेचा जप शेवटच्या क्षणापर्यंत करणाऱ्या या महान देशभक्त, मानवतावादी महापुरुषाला हिंसेने गोळी घालून मारले गेले.

गांधीजींचे जीवन आणि त्यांचा मृत्यू-दोन्हीही एक थरारनाट्य आहे. असहकार, सत्याग्रह, चरखा, खादी, स्वदेशी, कायदेभंग, उपोषण ही गांधीवादी साधनसामग्री शांततामय आंदोलनाची ऐतिहासिक कमाई ठरली. व्यक्तीपासून संपूर्ण विश्वात्मक जीवनाच्या अर्थपूर्णतेची मूल्यव्यवस्था गांधीवादी तत्त्वज्ञानातून आकारास आली. गांधींचे 'सत्याचे प्रयोग' तत्त्वत: आणि व्यवहारातसुद्धा मानवी इतिहासात स्वतंत्रपणे लक्ष वेधून घेतात. म्हणूनच समाजवादाच्या यशाचा मार्ग गांधीवादी प्रयोगशीलतेतून जातो की काय या प्रश्नाच्या उद्‌भवापर्यंत जगातील काही विद्वान पोचले आहेत. सत्याच्या संदर्भात सॉक्रेटिस, म. फुले यांचाच श्रद्धाशील वारसा गांधींनी सांभाळला. गांधींची सत्यानिष्ठा ही एक मूल्य म्हणूनच त्यांच्या जीवनात नोंदली गेली. सत्याच्याच श्रद्धेवर गांधींनी आपले संपूर्ण जीवन प्रयोगाच्या रूपात उभे केले. त्यामुळे त्यांच्या जीवनाचा प्रत्येक अनुभव सत्याच्या अटीत आकारास आल्याची जाणीव समजून घ्यावी लागते. सत्याला सामोरे जाण्याचा, सत्याची पूजा बांधण्याचा, सत्यासाठी जीवन उधळून देण्याचा आणि सत्याच्या प्रकाशातच स्वत:च्या व मानवाच्या जीवनाचा अर्थ शोधण्याचा गांधींचा म्हणून एक खास नवा दृष्टिकोन आहे. हाच गांधीवाद म्हणता येईल.

गांधीवादाची भूमिका गांधींच्या आयुष्यातील असंख्य


अनुक्रमणिका

घटना-प्रसंग व लेखन-भाषणांवरून साकार झाली आहे. खुर्ची-टेबलावर बसून गांधींनी त्यांचा गांधीवाद लिहून मांडला नाही. संपूर्ण जगच त्यांचा विचार-आचारांची प्रयोगशाळा ठरली. त्या प्रयोगशीलतेच्या अनुभूतीतून गांधींची उक्ती व कृती पुढे आली. हा गांधीवाद संपूर्णतः उपयुक्त, निर्दोष असून तोच आज जगाचे सर्व प्रश्न सोडवील हा आशावाद भाबडा ठरवला तरी, जगाच्या संस्कृतीची कुरूपता व विकृती नष्ट करण्यासाठी गांधीवादाचा बराच मोठा तपशील आणि काही सूत्रे निश्चितपणे आज आणि उद्याही उपयुक्त ठरणारी आहेत. म्हणूनच गांधीवादाचे सामर्थ्य स्वीकारण्याची धडपड सर्वच मानवतेचे पुजारी पुनः पुनः करताना दिसत आहेत.

भारतीय इतिहासात सर्वच महापुरुषांचे नोंदवले गेलेले आकलन आणि मूल्यमापन कमालीचे एकांगी आहे. त्यांच्या कर्तृत्वाचा इतिहास विविध अंगांनी तपासून वास्तव अर्थ शब्दबद्ध करण्याचा वस्तुनिष्ठ प्रयत्न अद्यापही बाकीच राहिला. राम-कृष्णांनंतर सर्वाधिक लेखन गांधींवर झाल्याची वास्तवता लक्षात घेऊनही, गांधींचे आकलन संपूर्णतः सत्याच्या विविध अंगांनी झालेले नाही, याचे भान नव्या अभ्यासकांनी ठेवणे आवश्यक वाटते.

गांधीवादातील 'विश्वस्त' ही कल्पना चकवा देणारी आहे. समाजातील श्रीमंत हेच गरीबांचे विश्वस्त असावेत. त्यांनी गरिबांचे दुःख लक्षात घेऊन आपली श्रीमंती, दरिद्री लोकांना काही प्रमाणात वाटून द्यावी, अशी काहीशी समजूत गांधींच्या 'विश्वस्त' कल्पनेत आहे. गरिबाचे दारिद्र्य हे समाजाचे भूषण नसतेच !

तेव्हा गरिबी संपलीच पाहिजे याच दारिद्र्याच्या सखोल जाणिवेने, गांधींतला संवेदनशील माणूस आयुष्यभर उघडा राहिला. भारतातील-जगातील कोटी कोटी लोकांच्या दारिद्र्याच्या सहवेदना गांधींच्या फकीर वेषातून सिद्ध झाली. शोषणमुक्तीचे तत्त्वज्ञान जगाला प्रदान करणाऱ्या मार्क्ससह कोणताही महापुरुष स्वतःच्या अंगावरच्या कपड्यांचा त्याग, गरिबांच्या दुःखाच्या बांधिलकीची अट म्हणून मानवी इतिहासात कोरून ठेवल्याची नोंद दिसत नाही. गांधींचे गरीब माणसावरील प्रेम व त्यांची मानवतावादी निष्ठा अशी अस्सल आहे. आणि या निष्ठेचा ध्येयवाद, स्वतःचेच शरीर थंडी-ऊन-वाऱ्याच्या भट्टीत झोकून देणाऱ्या त्यागातून सिद्ध झाली आहे. हे सत्य अर्थपूर्ण आहे. इतर महापुरुषांच्या मानवतावादी निष्ठांचे मूल्य जरूर श्रेष्ठ मानूनही हा अर्धनग्नतेचा संदर्भ, इतिहासात गांधींचे वेगळेपण सांगतो-वजनदार ठरतो! हे गांधींचे खास सामर्थ्य होय.

पण म्हणून त्यांची 'विश्वस्त' ही कल्पना विनाअट उपयुक्त व निर्दोष ठरते, असे म्हणता येत नाही. गांधींना गरिबांचे शोषण पाहवत नाही. त्यांच्या दुःखाने हा माणूस व्याकुळ होताना महात्मा बनतो. पण एक गांधी महात्मा बनल्याने जगातल्या लाखो गरिबांचा प्रश्न सुटत नसतो. कारण गांधींना शोषण नको असले तरी त्यांना शोषणाची प्रक्रिया कळली होती असे ठामपणे सांगणे कठीण आहे. अर्थात इथे मार्क्सचा संदर्भ अटळ आहे. मार्क्सवादाने शोषणप्रक्रियेचे मांडलेले स्वरूप, इतिहास व त्यावरचा उपाय या सर्वच भूमिकेत एक सलग लॉजिक व शास्त्रीयता आहे. ती गांधीप्रणीत 'विश्वस्त' कल्पनेत नाही.

शास्त्रीय सत्यनिष्ठ मांडणी आणि महात्म्याची सत्यनिष्ठ मांडणी यांमध्ये दोन्हींच्या प्रेरणा मानवकल्याणाच्या ठरवूनही, स्वरूप व परिणामकारक फरक उरतोच !

गांधींसमोरचा इतिहास कम्युनिस्टांच्या वर्गीय क्रांतीचा-हिंसेचा आहे. हा बदल अर्थातच गांधींना मानवणारा नाही. कारण गांधींना बदल हवा पण तो विधायक आणि अहिंसेच्याच मार्गाने ! या अहिंसेच्या समर्थनासाठी व हिंसेच्या धास्तीने गांधीतला महात्मा 'विश्वस्त' कल्पनेकडे ओढला गेला असावा! म्हणून हिंसेच्या भीतीपोटी गांधींनी वर्गसंघर्षातून शोषणमुक्तीची वाट नाकारून अहिंसात्मक मार्गाने श्रीमंतांच्या 'ट्रस्टीशिप' चा उपाय सांगितला. या संदर्भात कम्युनिस्टांनी गांधींवर प्रचंड टीका केली आहे. पण गांधींचा मार्ग अशास्त्रीय व अयोग्य असला तरी त्यांची तळमळ मात्र उदात्त आणि मार्क्सएवढीच प्रामाणिक आहे याचे भान या टीकेतून निसटले.

हे खरं आहे की, श्रीमंत लोक हेच समाजातील शोषक असून त्यांनी केलेल्या शोषणामुळेच असंख्य लोक शोषित-गरीब झाले. या समाजशास्त्रीय सत्याचा वस्तुनिष्ठ तपशील गांधींतला बॅरिस्टर महात्मासुद्धा आकळू शकला नाही. म्हणून तर गांधींनी समाजातल्या शोषकांवरच गरिबांच्या उद्धाराची जबाबदारी टाकली. श्रीमंत हे शोषण करूनच श्रीमंत झालेले असतात. शिवाय श्रीमंती टिकविण्यासाठी-वाढविण्यासाठी श्रीमंतांना पुन्हा शोषण करावेच लागते. आणि परिणामतः या प्रक्रियेत गरीब बळी जातात. म्हणून चोरांच्या हातात किल्ल्या देणे जेवढे गैर असते, तेवढेच विश्वस्ताचे काम श्रीमंतावर सोपवणे चूक असणार !

'विश्वस्त' सिद्धांताची अंमलबजावणी प्रत्यक्षात कशी करता येईल या प्रश्नाच्या उत्तरात म. गांधींनी सांगितले की, त्यासाठी मी सर्व साधनांचा वापर करेन. मी अहिंसावादी क्रांतिकारक आहे. असहकार हे माझे साधन आहे. आणि जनतेच्या सहकार्याशिवाय कुणाही व्यक्तीला संपत्ती जमविणे शक्य नसते. (यंग इंडिया, २५-

११-१९३१)

गांधींचा हा विचार वरवर पाहता सहज पटतो. पण आपल्याच समाजातील शोषणव्यवस्थेत पिचलेला सामान्य माणूस 'असहकार' कसा व कुणाशी करणार? समाजात अगोदरच मूठभर श्रीमंतवर्ग आहेच. तो संपत्तीच्या बळावर व मालकीच्या आधारे श्रीमंत राहू शकतो. या अगोदरच श्रीमंत झालेल्या श्रीमंत वर्गाशी सामान्य जनता कसा असहकार पुकारणार? शिवाय श्रीमंत माणसे एका मर्यादेपर्यंत उदार भूमिका घेऊ शकतील. तसेच या उदार होणाऱ्या प्रयोगात गरिबांची फसवणूकही शक्य आहे. कारण दर्शविलेल्या उदारतेच्या बदल्यात अधिक फायदा उपटण्याचा स्वार्थ श्रीमंत वर्ग बाळगणारच नाही याची खात्री कोणी द्यावी ? दुसरे असे की, या श्रीमंतांच्या उसन्या दयेवर सर्व गरिबांचे सर्व भौतिक प्रश्न कसे सुटावेत?

म. गांधींचा भांडवलाला विरोध नव्हता तर भांडवलशाहीला होता! अशी मांडणी काही गांधीवादी करतात, पण भांडवलाचे उत्पादनप्रक्रिया व उत्पादन-व्यवस्थेतील स्थान व मूल्य सरधोपटपणे गांधींना मान्य असले तरी या संदर्भातील अर्थशास्त्रीय तपशील व जाण गांधींच्या भूमिकेत होती म्हणण्यास जागा नाही.

मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाचे आपण विरोधक नाही ही जाणीव स्पष्ट करताना गांधीजी म्हणतात, "खेड्यांतील लोक विनासायास करू शकतील अशा वस्तूंच्या मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाच्या मी विरोधात आहे." खेड्यातील सामान्य माणसाच्या कल्याणाची तळमळ उपरोक्त विधानातून गांधी व्यक्त करतात. नव्या तंत्रज्ञानाचा रेटा व अटळता आणि समाजव्यवस्थेच्या गाभ्यातील अर्थशास्त्रीय संबंधाची वास्तवता, मार्क्स ज्या क्षमतेने आकळतो; ती क्षमता गांधींत नाही. पण तरीही गरिबांचे कल्याण हाच ध्यास दोन्ही महापुरुषांचा आहे. नव्या औद्योगीकरणाची अटळता, ऐतिहासिक, भौतिकवादी भूमिकेनुसार मान्य करून नव्या उत्पादनसंबंधातून शोषणमुक्त समाजाची उभारणी करण्याच्या प्रयत्नात, मार्क्स वर्गसंघर्षाच्या तत्त्वज्ञानाकडे वळला. या मुद्यावर गांधी वर्ग-समन्वयाकडे जातात.

एकूण जगाचीच अर्थव्यवस्था सर्व लहानमोठ्या देशांतील आर्थिक संबंधांवर कमालीचा प्रभाव टाकत असते. तेव्हा खेड्यांतील लोकांचे मूळचे उद्योग व त्यांचे उत्पादन, जागतिक स्पर्धेत व नव्या तंत्रज्ञानात्मक औद्योगीकरणाच्या धुमाळीत टिकणे अशक्यच असते. पण याचे भान गांधींतल्या महात्म्याला असण्याचे कारण नव्हते. कारण गांधी संत होते. राजकारणी नव्हते.

या पार्श्वभूमीवर गांधींची 'विश्वस्त' कल्पना, कल्पना म्हणूनच भावते. तिच्या प्रेरणा उदात्त असल्या तरी व्यवहारतः ही कल्पना उपयुक्त नव्हती-नाही. रशियन क्रांतीचा इतिहास कामगार-शेतकरी वर्गाने श्रीमंतांविरुद्ध संघर्ष करून भाकरी व निवाऱ्याच्या मूलभूत गरजांची पूर्तता केलेल्या वास्तवतेचाच इतिहास होता-आहे. प्राथमिक गरजा रशियन क्रांतीने पूर्ण केल्याच. नंतरची वाटचाल चुकली हे खरेच! पण म्हणून सत्तर वर्षांची कम्युनिस्ट परंपरा भाकरी-निवास देण्यातही फसली, हा निष्कर्ष रशियन क्रांतीचे विरोधकही नोंदवू शकले नाहीत.

गांधींनाही गरिबांच्या अश्रूंची चिंता होती. गरिबांच्या मुक्तीसाठी मार्क्सवादी दर्शन काही उपयुक्त प्रमेय मांडते. प्रत्यक्षात त्या सूत्रानुसार क्रांतीही होते. काही प्रश्नही सुटतात. तेव्हा गांधींच्या इच्छापूर्तीसाठी मार्क्सवादी प्रयोगही काही प्रमाणात, काही संदर्भात उपयुक्त ठरला आहे. आपण मार्क्सवादी प्रयोगालाच गांधींच्या आवडत्या सत्याच्या प्रयोगातील एक प्रयोग का मानू नये ?

मोठ्या उत्पादनपद्धतीसह लघुउद्योग शक्य व पूरक असतील तर अडचण नसावी; पण ग्रामोद्योगाच्या भावनिक श्रद्धेपोटी मोठ्या उत्पादनाला विरोध करणे नव्या काळाच्या संदर्भात अयोग्य ठरविले. गांधींनीही मोठ्या उत्पादनाला 'कंडिशनल' विरोध केलाच. खेड्यातल्या माणसांची उद्योगशीलता, त्यांची उपजीविका व विकास सुरक्षित राहिला किंवा अन्य मार्गाने ग्रामीण समाजजीवन उद्ध्वस्त न होता सुरक्षित राहून विकसित झाले तर गांधींना मोठ्या उत्पादनास विरोध असण्याचे कारण नाही. नवी यंत्रसंस्कृती कमी श्रमात अधिक सुखसोयी प्रदान करणारी असल्याने माणसाचा अधिक वेळ, कला, तत्त्वज्ञानादी सांस्कृतिक विश्वात आनंदाने जाईल. अर्थात मोठ्या उत्पादनसाधनांची मालकी खासगी राहिल्यास नफेखोरीचा व मक्तेदारीचा धोका असणारच ! सहकारी तत्त्वावरील कंपन्या व उद्योगांतील सभासदांचा मालकवर्ग हा उदासीन असतो. त्यातही मूठभरांची मक्तदारी पोसली जाऊन समूहाच्या नावाने शोषणाची प्रक्रिया चालते. सर्वसामान्य माणूस कंपन्या-कारखान्याचा सभासद बनतो म्हणून हा प्रकार समाजवादात मोडणारा समजला जातो. लोकशाहीच्या संरचनेला पूरक ठरणारे पर्यावरण अशा कंपन्यांतून असले तरी या ठिकाणी सामान्य सभासद-मालकांना विशेष महत्त्व नसतेच ! विशिष्ट संचालकांची मक्तेदारीच खरी मालकी इथे भोगत असते.




## गांधी-मार्क्स संवादाचे मूल्य

भांडवलामध्ये 'प्रोपायटरी' व 'नॉन-प्रोपायटरी' असे दोन प्रकार आहेत. भांडवलशाही व साम्यवादप्रणाली राष्ट्रीयीकरणातसुद्धा कुणाची ना कुणाची मक्तेदारी भांडवलावरील नियंत्रणातून-मालकीतून निर्माण होतेच. सोवियत रशियात साम्यवादी राजवटीतही 'कम्युनिस्ट पक्षाची' राष्ट्रीय भांडवली मालकी होती. अर्थातच एका पक्षीय अधिकार मंडळाची मालकी ही सुद्धा मक्तेदारीच असणार, म्हणून रशियन साम्यवादी कॅपिटॅलिझम होता असे म्हणावे लागते. तेव्हा सहकारी क्षेत्रातील व खासगी क्षेत्रातील किंवा राष्ट्रीयीकरण झालेले भांडवलसुद्धा एकाधिकाराला पूरक ठरणारे असते. पण त्याउलट प्रोप्रायटरी स्वरूपाचे भांडवल मात्र एकाधिकार निर्माण करत नाही. या भांडवलातून श्रमाचे शोषणच बंद असते. या प्रकारच्या मालकीचे समर्थन खुद्द मार्क्सही प्रारंभी करताना दिसतो. सर्वच भांडवल व मालकी ही शोषणाला जन्म देणारी नसते हे सूत्र लक्षात घेतले तर, खेड्यापाड्यांतून स्वतःच्या उत्पादनसाधनांवरील मालकीनुसार स्वतःच श्रम करून, नोकर न ठेवता केलेले उत्पादन हे शोषणमुक्तही असेल आणि ते समाजोपयोगीही असेल. एवढ्या संदर्भातील गांधींचा विचार स्वीकारण्यास हरकत नाही. ग्रामोद्योग किंवा लघुउद्योग आणि स्वतःची छोटीशी शेती या आणि अशा प्रकारच्या भांडवलाबाबतचा गांधीवादी अर्थशास्त्रीय विचार टाळण्याचे कारण नाही. याउलट मोठ्या तंत्रज्ञानातून विकसित झालेली उत्पादन-व्यवस्था व त्याचा परिणाम संपूर्ण समाजाच्या कल्याणाशी जुळवून घेताना त्या प्रक्रियेतील मक्तेदारीचा दोष मात्र नष्ट केला पाहिजे.

गांधींच्या अंतःकरणाबद्दल आणि त्यांच्या गरिबां-विषयीच्या कळवळ्याबद्दल आदर बाळगूनही त्यांची 'विश्वस्त' कल्पना ही त्यांच्याच इच्छेविरुद्ध जाणारा व्यवहार आहे या निष्कर्षापर्यंत आपण येतो.

दुसरी बाब अशी की, श्रीमंतांनी 'विश्वस्त' व्हावयाचे नाकारले किंवा त्यात लबाडी केली किंवा ते उदासीन राहिले तर काय ? यावर गांधीवादात 'असहकार' हे उत्तर मिळते. पण सर्व गरिबांनी श्रीमंतांविरुद्ध असहाकार पुकारायचा म्हणजे उपाशी मरण्याचीच पाळी. शिवाय हा प्रयोग कितीवेळा सर्वांनी मिळून करता येईल हा सुद्धा प्रश्नच! म्हणूनच 'विश्वस्त' कल्पनेची व्यावहारिक यशस्विता संशयास्पद आहे.

शोषकांची मानसिकता पशुत्वाने ओतप्रोतच असणार! काही मानवतावादी गुण त्यांच्यात असले तरी त्यांची शोषक प्रवृत्ती व श्रीमंती ही श्रमाच्या चोरीतूनच पोसली गेलेली असते. म्हणूनच श्रीमंत हे अनीतीचे ठेकेदार असतात. हेच त्यांचे अधिष्ठान असते. म्हणूनच त्यांची मदत गरिबांच्या उद्धारासाठी एका मर्यादेपलीकडे होणे अशक्य असते. म्हणूनच 'विश्वस्त' ही कल्पना गांधीवादाची प्रमुख मर्यादा आहे.

मार्क्सने विज्ञान, तंत्रज्ञान, औद्योगिकता यांचे समर्थन करताना जागतिक बदलाच्या इतिहासाची साक्ष महत्त्वाची मानली. त्याचे तत्त्वज्ञानही मानवमुक्तीचाच ध्यास घेऊन उभे आहे. गांधींचा ध्यास व ध्येयवाद मार्क्सपेक्षा वेगळा नाहीच. पण यंत्रसंस्कृतीला गांधींचा मर्यादित व कंडिशनल (सशर्त) विरोध आहे. यंत्र मानवाला गुलाम करते. ही गुलामी गांधींना नको आहे. शिवाय तंत्रज्ञानाच्या प्रगतीबरोबरच भव्य यांत्रिकतेच्या केंद्रीकरणात सत्ता व संपत्ती यांचे केंद्रीकरण होते. म्हणून गांधी या केंद्रीकरणाचे विरोधक आहेत. मोठ्या उद्योगापेक्षा लघुउद्योगांचे समर्थन गांधीवाद करतो, कारण श्रमाचे मूल्य व महत्त्व संपूर्ण समाजात जोपासताना स्वतःच्या कष्टातून स्वतःची भाकरी निर्माण करण्याची व लोकशाहीला उपयुक्त असणारी लघुउद्योगाची विकेंद्रित अर्थव्यवस्था गांधींना महत्त्वाची वाटते.

विशिष्ट परिसरातील साधनसंपत्ती त्याच प्रदेशातील भूमीपुत्रांनी स्वकष्टाने उपयोगात आणून आपल्या क्षेत्रातील जनतेच्या गरजांनुसार उत्पादन निर्माण करण्याची विकेंद्रित व्यवस्था लघुउद्योगांच्या उभारणीतून साकार होते. गरजांच्या संख्येवरही नियमन असावे. अतिरिक्त गरजाही त्याज्यच! हा गांधीवाद आहे. साधी राहणी व अतिरिक्त भोगलालसेपासून मुक्ती, या संदर्भात गांधीवादाचा आग्रह आहे. चंगळवादाला-भोगवादाला मर्यादा न घातल्या तर शेवट समाजाच्या अधःपतनात होऊन संपूर्ण समाजच आत्महत्त्येच्या काठावर येऊन उभा राहत असतो. पाश्चात्त्य जग आज हीच अनुभूती घेत आहे. म्हणून तर भोगवादाच्या वाईट परिणामातून भारतीय संस्कृतीचे आकर्षण-गांधींच्या योगदानासह पाश्चात्त्य जगात आज वाढीस लागले आहे.

गांधींनी चरखा, टकळी चालवली. "शिवणयंत्राचा मी विरोधक नाही" असे म्हणणारे गांधी, यंत्रसंस्कृतीचे विरोधक किती व कोणत्या संदर्भात, याची परखड चिकित्सा समीक्षक-विचारवंत करू शकले नाहीत. यंत्रसंस्कृतीचा उदय, नवे तंत्रज्ञान यांचे स्वागत न करण्याएवढे गांधी अज्ञानी व आंधळे नव्हतेच ! यंत्रसंस्कृतीमध्ये लपलेला अघोरी राक्षस त्यांना नको होता. यंत्राच्या भव्य अशा एकत्रीकरणातून संपत्तीचे केंद्रीकरण होते व संपत्तीचे केंद्रीकरण हे सत्तेच्या केंद्रीकरणास जन्म देते.

अनुक्रमणिका






संपत्ती हे साधन आवश्यक असले तरी ते माणसापेक्षा अधिक श्रेष्ठ ठरता कामा नये, हा गांधींचा आग्रह निश्चितच महत्त्वाचा आहे. त्याचप्रमाणे 'सत्ता' आणि 'सत्य' या दोन्हीत गांधी तर सत्याचेच पुजारी आहेत. म्हणूनच गांधीवाद सत्ता-शासन समाजाच्या विकसित अवस्थेत संपून गेले पाहिजे या मताचा आग्रह धरतो. शासनविरहित समाजाची कल्पना मार्क्सवादाप्रमाणे गांधीवादाचेही एक मूल्य आहे. हा गाभ्याच्या सूत्राचा संवाद मार्क्स-गांधी या महापुरुषांचे मोठेपणे सिद्ध करतो. मार्गाची-साधनांची भिन्नता या दोन्ही वादांमधील फरकाचा मुद्दा असला तरी मानवमुक्तीचा ध्येयवाद, शासनरहित समाजरचनेत समाधी पावताना मार्क्स-गांधींना खराखुरा न्याय मिळतो.

सत्याचे पुजारी दोन्ही महापुरुष असले तरी यंत्रसंस्कृतीतून केंद्रीकरण झालेल्या वैज्ञानिक प्रगत अवस्थेचा मार्क्स समर्थक आहे. पण गांधी मात्र असे समर्थक नाहीत. यंत्र-तंत्रज्ञान वैज्ञानिक प्रगती यांच्या भव्य-दिव्य प्रयोगातून उत्पादनाची मुबलकता अटळ-आवश्यक ठरून त्यातून भौतिक दु:खमुक्ती असल्याचे प्रतिपादन मार्क्सवादी भूमिका करते. पण अर्थातच हे उत्पादन समाजाच्याच मालकीचे हवे. खासगी मालकी, अतिरिक्त श्रमाची चोरी करते आणि नफ्याची प्रेरणा जिवंत राहिल्याने शोषण चालते. हे शोषणही मार्क्सला नको आहे, पण मुबलक उत्पादनाशिवाय सर्व माणसांच्या भौतिक गरजांची पूर्तता कठीण आहे. म्हणून उत्पादनसाधनांची मालकी खासगी न ठेवता संपूर्ण समाजाची करून राष्ट्रीयीकरणाचा उपाय मार्क्सप्रणित भूमिकेने सांगितला.

समाजवाद-राष्ट्रीयीकरण असे समीकरण या चिंतनप्रवासात रूढ झाले. पण प्रत्यक्षात राष्ट्रीयीकरणाचा उपाय मोठ्या प्रमाणावर फसल्याचे दिसते. राष्ट्रीयीकरणात सरकारी नोकरशाहीचे वर्चस्व निर्माण होते. अर्थातच अशा उत्पादनव्यवस्थेत नोकर उत्पादक बनतात. परिणामत: उत्पादन वाढत नाही. खासगी मालक उत्पादकाचे उत्पादन नोकर उत्पादकापेक्षा वाढीव असते. तेव्हा मार्क्सप्रणीत राष्ट्रीयीकरणातून समाजवादाचा मार्ग आज संशयास्पद ठरतो आहे. म्हणून शोषणाची प्रक्रियाच बंद ठेवणारी, स्वत:च्या उत्पादनसाधनावर स्वत:च श्रम करून उत्पादन करणारी छोटी मालकी हीच उत्तम उपाय ठरू शकते. कारण तेथे मजूर ठेवून त्याचे शोषण करण्याची संधीच नसते. गांधीवादाशी जवळीक साधणारा हा मार्क्सवादी उपाय ठरावा!

पण त्यामुळे संपूर्ण समाजच भव्य तंत्रज्ञानाला चुकून मध्ययुगात लोटला जाण्याची भीती आहे. त्यासाठी एकूण समाजाच्या भौतिक गरजा-अत्यावश्यक गरजा लक्षात घेऊन त्या त्या प्रदेशातील-देशातील लोकसमूहांनी नव्या तंत्रज्ञानाच्या आधारे, राष्ट्रीयीकरणाच्या मार्गाने, त्यातील दोष टाळून अधिक उत्पादन करणे व परस्परांच्या गरजेनुसार 'जगा आणि जगू द्या' या सूत्रानुसार मदत करणे आज आवश्यक झाले आहे. हा प्रयोग गांधीवादी अर्थशास्त्र व मार्क्सवादी अर्थशास्त्राच्या संगमातून उभा राहील. त्यात दोन्ही मार्गांतील दोष वजा केले जातील व सामर्थ्याची बेरीज असेल.

रशियातील मार्क्सवादी प्रयोग फसला. कारण खासगी भांडवलशाहीला रशियन कम्युनिस्टांनी राज्य भांडवलशाहीचे उत्तर दिले होते. खासगी भांडवलशाहीत मक्तेदारीचा दोष असतो. तसाच राष्ट्रीयीकरणात सुद्धा नोकरशाहीच्या उदासीनतेचा दोष असतोच! शिवाय नोकरशाहीचा स्वभाव माजणारा असतो. त्यातून अधिकारशाही निर्माण होते. या प्रक्रियेतही शोषण तयार होतेच! म्हणून खासगी भांडवलशाही आणि राज्य भांडवलशाही यांच्या परिणामात मूल्यात्मक फरक उरत नाही.

भांडवली अर्थव्यवस्थेचा विरोध गांधींनीसुद्धा केलाच. 'शोषणमुक्त समाज' आणि 'युक्त तंत्रज्ञान' हा गांधीवादी विचार आहे. ग्रामोद्योगांचे जाळे विणून, आहे त्याच पर्यावरणात तेथील मानवी जीवन समृद्ध व्हावे ही गांधींची इच्छा होती. संपत्तीची समविभागणी गांधींनाही भुरळ पाडत होतीच ! कारण गांधी माणसा-माणसांतील समतेचा पुरस्कार करणारा महात्मा आहे. औद्योगीकरणातून ओसाडीकरण होऊन माणसे यंत्राचे गुलाम बनू नयेत - निसर्गाचा समतोल बिघडू नये म्हणून गांधीतला महात्मा सावध होऊन मानवतेला सावध करीत राहिला.

गांधींचा स्वदेशीवर भर होता. हा मुद्दा केवळ राष्ट्रवादाशी संबंधित नव्हता. देशातील साम्राज्यवादी महासत्ता निर्माण करून गुलामीचे सावट जगभर पसरवताना, त्यांच्या उत्पादनव्यवस्थेला, नफेखोरीला विरोध करून स्वत:च्या देशातील-प्रदेशातील उत्पादित मालच वापरणे, कर्तव्य असण्याचा निर्वाळा गांधींच्या स्वदेशी या सूत्रातून मिळतो. गांधींची आर्थिक दृष्टी इथे शोषणमुक्तीच्या चिंतनातून राष्ट्रवादासह मानवतावादाची अस्मिताही जागवते. इंग्लंडचा माल नफेखोरीच्या व्यवस्थेतून भारतात विकला जात असेल, तर भारतीय नागरिकांचे शोषण बंद करण्यासाठी स्वत:च्या हाताने स्वत:च विणलेली खादी यावर उत्तम उपाय नव्हे काय ? खादीचे मूल्य एकाचवेळी राष्ट्रवादी आणि शोषणव्यवस्थेवर आधारित साम्राज्यवादाशी संघर्ष करणारे क्रांतिकारक तत्त्व ठरणारे आहे.








नफ्याची प्रेरणा देऊन उभ्या असणाऱ्या अर्थव्यवस्थेत किमती वाढवतच नेतो. सामान्य माणसाचे जगणेच अशक्य व्हावे अशी वांझ व राक्षसी व्यवस्था जगात पसरताना भांडवलशाही व साम्राज्यशाही शक्तींकडून हिंसाच घडत असते. अर्थातच उत्पादित मालाच्या किंमती वाढवणारी साम्राज्यशाही अर्थव्यवस्था ही हिंसकच असते आणि जीवनातील सर्व प्रकारच्या हिंसेचा विरोध गांधीवादाने आपले अधिष्ठान म्हणून स्वीकारला आहे. तेव्हा नफ्याची अर्थव्यवस्था हिंसेचाच एक प्रकार म्हणून लघुउद्योग ग्रामोद्योगातून नफामुक्त अर्थव्यवस्थेचा पुरस्कार गांधीवादाने केला आहे.

शहरीकरणाचा, शहरसमृद्धीचा विचार गांधींच्या विकास कल्पनेत बसणारा नाही. अर्थात मूठभर शहरांचा विकास त्यांना खेड्यांच्या विकासाचा बळी घेऊन नको आहे. खेड्यातच भारताचे अस्तित्व व अस्मिता असल्याने, खेडे हेच नियोजनाचे केंद्र असावे असे गांधींना वाटते. खेडे ओसाड होऊन शहरे बहरली तर चूकच होईल. म्हणून 'खेड्याकडे चला' हा गांधींचा संदेश आहे. निसर्गाचे आकर्षण या संदेशात आहेच; पण औद्योगिकरणाच्या कोरड्या संस्कृतीपासून अलिप्त असणाऱ्या स्वतःच्याच क्षेत्रातील साधनसंपत्तीने युक्त असणाऱ्या खेड्याची स्वायत्तता गांधींना महत्त्वाची वाटली.

गांधींचा ईश्वरवाद माणसांच्या नैतिक उत्थानाचा आग्रह धरतो. माणसाच्या समतेचा उद्घोष करतो. म्हणून गांधींचे अध्यात्म ईश्वरी केंद्राच्या सूत्रातूनच उभे राहत असले तरी माणसाच्या विकासाचे, उत्थानाचे, सुरक्षिततेचे मूल्य अबाधित ठेवते. कर्मठ हिंदुत्वाच्या अध्यात्मापेक्षा गांधींचे हे मानवनिष्ठ अध्यात्म वेगळे आहे. गांधींच्या अध्यात्माने माणसाचे मूल्य नैतिकतेच्या भक्कम पायावर सर्वश्रेष्ठ मूल्य म्हणून उद्घोषित केले आहे.

पारंपारिक अध्यात्मवादाचा हा विकास मानता येईल का? ईश्वर आणि अध्यात्माचे वर्तुळ गांधीवाद छेदून, माणसाचे माणूस म्हणून असणारे मूल्य जेव्हा तो अधोरेखित करू लागतो, तेव्हा गांधींचे 'सनातनी हिंदूपण' सुद्धा आंधळ्या हिंदुत्ववाद्याच्या तुलनेत क्रांतिकारक ठरू लागते.

म. फुल्यांची निर्मिक कल्पना हिंदू धर्मातील पारंपरिक ईश्वरी कल्पनाव्यूहाला उत्तर म्हणून पुढे येताना, ती माणसाच्या भौतिक मुक्तीची अट प्रमाण मानू लागते तेव्हा फुल्यांचे क्रांतिकारकत्व इतिहासाला मान्यच करावे लागते. गांधींनी वेदप्रामाण्य मानले, ईश्वर मानला, धर्मसंकल्पना मानली. तरीही या सर्व कल्पना मान्य करणाऱ्या इतर अस्तिकवाद्यापेक्षा गांधींची भूमिका समाजक्रांतीच्या व राष्ट्रीय क्रांतीच्या इतिहासात वेगळी असून तिचा क्रांतिकारक ठसा कायम उमटला आहे. गांधींच्या अध्यात्माचे मूल्य असे हिंदुत्ववादी व म. फुल्यांच्या अध्यात्मापेक्षा वेगळे ठरते.

गांधींची अध्यात्मिकता सर्व धर्मांच्या नैतिक मूल्यांना कवेत घेऊन सर्वच धर्मांच्या नागरिकांना समान मानते. त्यांचे अध्यात्म केवळ हिंदू किंवा कोणत्याही एका धर्माच्या चौकटीत बंदिस्त होणारे नाही. कारण गांधींचा 'ईश्वर' संकुचित नाही.

'ईश्वर' ही संकल्पनाच अशास्त्रीय असल्याचे सत्य गांधींना सांगण्यात अर्थ नसतो. गांधींच्या ईश्वरवादी भूमिकेने राष्ट्राच्या व जगाच्या इतिहासात माणसांच्या भौतिक कल्याणासाठी कोणते विधायक योगदान दिले हाच प्रश्न अधिक महत्त्वाचा ठरणारा आहे. गांधींच्या अध्यात्माने भौतिक जीवनात कोरून ठेवलेल्या क्रांतीचा तपशील फार मोठा आहे, याचे भान ठेवणे नव्या इतिहासाच्या घडणीत महत्त्वाचे आहे.

['परिवर्तनवादी प्रवाहांची तौलनिक समीक्षा' (प्रकाशक : नवीन उद्योग, पुणे) मधून साभार.]



आपली बुद्धिमत्ता ही आपल्या स्वतःच्या मालकीची नसून ती देवाची (किंवा, वाटल्यास निसर्गाची म्हणा) देणगी आहे. ती कोणाला अधिक मिळते, कोणाला कमी मिळते हा केवळ योगायोगाचा भाग आहे. या घटनेचा आनंद मानावा परंतु अहंकार बाळगण्याचे कारण नाही हे आकलन सर्वांना होईल तेव्हा IQ विषयीच्या वादविवादाचे मूल कारणच नाहीसे होईल.

**- देवदत्त दाभोलकर**

(The IQ controversy वरील अखिल भारतीय चर्चासत्राचे उद्घाटन करताना सुमारे दोन दशकांपूर्वी.)

# लोकशाही समाजवादासाठी आचार्य जावडेकर यांची विचारधारा आणि आजचे संदर्भ

**देवदत्त दाभोलकर**

आचार्य जावडेकर यांच्या जन्मशताब्दीच्या प्रारंभ दिवशी (२६ सप्टेंबर १९९३) त्याच्या निवासाच्या गावी इस्लामपूर येथे प्रमुख वक्ता म्हणून माझे विचार मांडण्याचे सद्भाग्य मला लाभले होते. त्यावेळी माझ्या व्याख्यानाचे शीर्षक होते. 'आचार्य जावडेकर यांचे वैचारिक धन : एक न फिटणारे ऋण' आज शीर्षकात थोडा फरक केला असला तरी आशय तोच राहणार हे उघड आहे. माझ्या त्या विधानाच्या मागील काही कारणे लेख लिहिताना मला अधिक विस्ताराने व नेमकेपणाने मांडता येण्याची शक्यता आहे इतकेच.

विचारशलाकेच्या या विशेषकांच्या वाचक वर्गासाठी आचार्य जावडेकर यांच्या विचारधारेची तपशीलाने मांडणी करण्याची आवश्यकता नाही असे मी मानतो. त्यामुळे माझ्या विवेचनाच्या दृष्टीने आवश्यक तितक्याच भागाची मांडणी शक्य तितक्या संक्षेपाने व शक्य तितकी त्यांच्याच शब्दात करतो. वैचारिक वादाच्या दृष्टाने एवढे पुरेसे होऊ शकत नाही आणि त्या स्तरावर या लेखाची ती मर्यादा राहील.

आचार्य मार्क्सला मानत होते; गांधीजींनाही मानत होते. सत्याग्रही समाजवाद या संकल्पनेत त्यांनी त्या दोघांच्या विचार व कार्यपद्धतीचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. यतिवर्गाच्या आवश्यकतेचे प्रतिपादन करून त्याला आपली स्वत:ची अशी विशेष जोड दिली.

'गांधीवाद' या विवेचन मालेतील आपल्या पुस्तकाच्या शेवटच्या परिच्छेदात (द्वितीय आवृत्ती १९४९) आचार्य म्हणतात,

" जसा मार्क्सवादातून शास्त्रीय समाजवाद निघाला व त्याची वाढ लेनिन प्रवृत्तींनी केली, त्याचप्रमाणे गांधीवादातून सत्याग्रह हे जीवनव्यापी तत्त्वज्ञान निघाले असून त्याची वाढ परवापर्यंत महात्मा गांधी करत होते. त्यांच्यानंतर हे कार्य त्याच संप्रदायाचा अभिमान बाळगणाऱ्या इतरांना करावे लागेल. ही वाढ कितीही झाली तरी सत्य व अहिंसा हे अधिष्ठान सुटणार नाही. कारण ते अधिष्ठान सुटेल तर त्याला सत्याग्रह हे नाव देता येणार नाही. या अधिष्ठानाशी सुसंगत अशी गांधीवादाची वाढ महात्मा गांधींच्या नंतरही चालू राहिलीच पाहिजे. कारण या जगात ज्याची वाढ होत नाही ते मृत्युपंथास लागते व ज्याची अखंड वाढ होते ते अमर होते. अशी गांधीवादाची वाढ करणे व सामाजिक जीवनातील सत्याचे व अहिंसेचे संशोधन करून त्यांच्या संस्थापनेचे मार्ग शोधून काढणे हेच गांधीवादी लोकांचे नियोजित कार्य व ध्येय आहे. "

मार्क्स व गांधी या दोघांनाही आचार्य मानत होते. असे असले तरी कालाने, परिस्थितीने व आंतरिक प्रवृत्तीने गांधीजी त्यांना अधिक जवळ होते. त्यांच्या बौद्धिक विचारसरणीत मार्क्स त्यांना कदाचित काहीसा अधिक जवळचा वाटत होता. परंतु त्यांच्या भावनिक व अध्यात्मिक मनोधारणेवर गांधीजींचा अधिक प्रभाव होता. गांधीजींच्या व आचार्यांच्या अध्यात्मिकतेचा रूढ धर्माशी काहीही संबंध नव्हता हे मात्र येथे लक्षात ठेवले पाहिजे. मानवातील मंगल प्रवृत्तीच्या विश्वासावर आधारलेली ती अध्यात्मिकता होती. किंबहुना अध्यात्मिकतेच्या आदर्शाच्या बाबतीत आचार्य गांधीजींच्याही एक पाऊल पुढेच असावेत. (हे म्हणणे इतर कुणाला रुचो वा न रुचो, परंतु आचार्यांना मुळीच रुचले नसते. 'मज पामरासी काय मोठेपणे'- हे तुकारामाचे विनयवचन त्यांना आठवले असते.) हे या ठिकाणी थोडेसे अधिक स्पष्ट करणे युक्त होईल. गांधीजींनी लिहिले आहे:

"सत्यरुपी परमेश्वराच्या शोधरूपी यज्ञामध्ये या शरीराचाही होम करण्याची माझी तयारी आहे आणि शक्तीही आहे, असा मला विश्वास वाटतो. परंतु जोपर्यंत मला त्या निरपेक्ष सत्याचा साक्षात्कार झाला नाही, तोपर्यंत माझ्या अंतरात्म्याला जे सत्यसे वाटते, त्या सापेक्ष सत्यालाच माझा आधार समजून, त्यालाच खुणेचा दिवा करून, त्याच्या आश्रयाने मी माझे जीवन व्यतीत करीत असतो. (सत्याचे प्रयोग अथवा आत्मकथा प्रस्तावना)

गांधीजींच्या अध्यात्मिकतेचा एक दुसरा पदर आहे. एका ख्रिस्त भक्ताशी झालेल्या आपल्या संवादात ते म्हणाले, "पापकर्मांची फळे भोगण्यापासून मुक्ती हाच जर सर्वमान्य ख्रिस्तीधर्म असेल तर तो मला पटण्यासारखा नाही. मला पापकर्मांची फळे भोगण्यापासून मुक्ती नको आहे, मला जी मुक्ती हवी आहे ती पापवृत्तीपासून आणि पापकर्मापासून हवी आहे. पापवृत्तीपासून आणि पापकर्मापासून मुक्त होण्याची माझी मनीषा जोपर्यंत पूर्ण






झालेली नाही तोपर्यंत माझ्या अंतःकरणात जी अस्वस्थता आहे तीच मला तुमच्या शांतीपेक्षा अधिक दिव्य आहे." (आचार्य जावडेकर जीवनरहस्य: महात्मा गांधींच्या जीवनाचे रहस्य आणि महत्त्व.)

परंतु तरीही गांधीजींच्या अध्यात्मिक भूमिकेचा आधार 'राम' होता. तो 'राम' म्हणजे दाशरथी राम नव्हे हे गांधीजींनीच स्पष्ट केले आहे. परंतु तो 'राम' होता. तो त्यांना आंतरिक संदेश देत होता व अंतिम क्षणीही त्यांच्या जीवनभरच्या इच्छेप्रमाणे त्याने त्यांची साथ केली.

हा गांधीजींचा निखळ परिशुद्ध 'राम' आचार्य जावडेकरांना समजला असता, रुचला असता, परंतु त्यांच्या स्वतःच्या अध्यात्मिकतेत त्यांना या 'रामा'चीही आवश्यकता वाटली नसती असे मला वाटते. त्यांची भूमिका बर्ट्रांड रसेलच्या भूमिकेशी (A Free man's Worship) अधिक जवळ राहिली असती अशी माझी धारणा आहे. या रामाचाही आदर सोडल्यामुळे माझ्या अंतःकरणात जी अस्वस्थता तीच मला रामाच्या आधाराने मिळणाऱ्या मनोबलापेक्षा अधिक प्रिय आहे" असे आचार्य कदाचित म्हणाले असते. (ही आपली माझी कल्पना झाली आणि कदाचित मी गांधीजी आणि आचार्य या दोघांवरही माझ्या अपुऱ्या आकलनामुळे अन्याय करीत असेन.) या भूमिकेचे महत्त्व एका यतिवर्गातील एकाकी यती आपले अंतिम मनोबल कशाच्या आधारे सांभाळणार या प्रश्नाच्या उत्तराशी निगडित आहे. आचार्य कदाचित हा पक्ष ज्याने त्याने आपल्या मनःप्रकृतीप्रमाणे सोडवायचा आहे असे म्हणाले असते.

२) भारताला स्वातंत्र्य मिळाले आणि परिस्थितीचे सारेच संदर्भ बदलले. या नवीन संदर्भात नव राष्ट्र रचनेसाठी वेगळ्या पद्धतीने कार्य करावे लागेल याची गांधीजींना जाणीव होती. अनेक प्रश्नांच्या बाबत गांधीजी आणि काँग्रेस कार्यकारिणीचे प्रमुख सभासद यांच्यामध्ये मूलभूत मतभेद होते. हे प्रश्न अखेरपर्यंत निकालात निघाले नाहीत. गांधीजींनी आपले राष्ट्रसभेच्या भावी स्वरूपाविषयीचे मत त्यांनी २९ व ३० जानेवारी १९४८ केलेल्या मसुद्यात स्पष्टपणे मांडले. या मसुद्याविषयी आचार्य जावडेकर यांनी केलेल्या विवेचनातून गांधीजींच्या मसुद्याचा आशय स्पष्ट होतो त्याचप्रमाणे आचार्यांचा मानसिक कल गांधीजींच्या बाजूचा होता हेही स्पष्ट होते, असे आचार्य लिहितात: (गांधीजी : जीवनरहस्य पृ.: ३८४ व ३९०)

"महात्मा गांधींनी राष्ट्रसभेची सध्याची घटना मोडून टाकून अथवा तिचे विसर्जन करून तिला सत्तेच्या संपादनाच्या स्पर्धेपासून अलिप्त ठेवावे किंवा तिचे रूपांतर लोकसेवक संघात करावे, ही मूलभूत कल्पना आधारास घेऊन ही घटना सुचविलेली आहे. सत्तेचे राजकारण व सेवेचे राजकारण असे जर राजकारणाचे भेद केले, तर राष्ट्रसभेने सत्तासंपादनाचे राजकारण सोडून द्यावे आणि लोकसेवेच्या कार्यात करावे लागणारे अपरिहार्य राजकारण तेवढेच करावे, असे या सूचनेमागील मुख्य हेतू आहे असे आम्हास वाटते. हे लोकसेवेचे राजकारण पक्षातीत असू शकते. उदा. लोकशाहीची राज्यघटना कायम रहावी आणि मूलभूत राष्ट्रीय हक्कांना राजसत्तेने धक्का लावू नये, हे राजकारण पक्षातीत असू शकते, राष्ट्रीय हक्कावर गदा आणणारे व लोकशाही राज्यसंस्थेला भ्रष्ट करणारे जुलमी कायदे कोणत्याही पक्षाच्या सरकारने केले तरी त्या कायद्यांचा निषेध करणे अथवा निरूपाय झाल्यास त्या कायद्यांचा सविनय भंग करणे हे राजकारणही पक्षातीत असेच असू शकते. सत्याग्रही राजकारण हे अशाच प्रकारचे राजसत्तेच्या अन्यायाचा प्रतिकार करण्याचे राजकारण असते. प्रजाधर्मातील राजकारणात या राजकारणाचा समावेश होत असून ते राजकारण सेवेच्या भांडवलावर चालत असते. सत्तेचे संपादन हे या राजकारणाचे ध्येय असू शकत नाही. सत्ताधाऱ्यांनी केलेल्या अन्यायाचा प्रतिकार व प्रतिबंध एवढेच हे राजकारण असून जेव्हा सत्ताधारी राज्यकर्ते उन्मत्त व जुलमी बनतील तेव्हा प्रजेचे आत्मबल संघटित बनून त्यांच्याशी अनत्याचारी असहकार करू लागेल तर या सत्याग्रही राजकारणास अशा अवस्थेत क्रांतिकारक स्वरूप प्राप्त होईल. असा क्रांतिकाल मात्र होऊन देशातील राज्ययंत्र आमूलाग्र पालटून गेले तरीही या सत्याग्रही लोकसेवकांनी आपल्या हाती सत्ता घेण्याचा विचार करता कामा नये. सवेच्या तपश्चर्येने लोकांचा विश्वास संपादन करावा. त्याच्या विश्वासाने मिळणारा निधी पुन्हा लोकसेवेच्या कार्यात खर्च करावा आणि लोकातील सत्यनिष्ठा आणि अहिंसावृत्ती वाढवून त्यांना सहकारी जीवन स्वावलंबनाने व्यतीत करण्याचे शिक्षण देत रहावे, एवढेच या सत्याग्रही राजकारणात बसू शकत नाही. धाक दाखवून किंवा लोभ निर्माण करून लोकातील दुष्टांचे पारिपत्य आणि साधूंचे रक्षण करणारा राजधर्म हा आजच्या अवस्थेत समाजाला आवश्यक वाटत असला तरी त्यामुळे लोकातील भय आणि लोभ या वृत्तींना चालना दिली जाते आणि अखेरीस राजकारणात व राज्यसंस्थेत सत्तेचा लोभ, स्पर्धा आणि दहशतवाद यांचा प्रवेश होतो. म्हणून राष्ट्रसभेने निदान यापुढे तरी हे सत्तास्पर्धेचे राजकारण करू नये आणि केवळ लोकसेवेचेच राजकारण करावे, असा गांधीजींचा वरील सूचना करण्यात आशय दिसून येतो. त्याचप्रमाणे या लोकसेवकसंघाच्या कार्यासाठी जो निधी

जमवावयाचा तो खेड्यातील गरीब जनतेकडून जमविण्यावरच भर द्यावा असे सांगण्यात हा लोकसेवक संघ धनिकांच्या पैशावर पोसला जाणारा धनिकांचा आश्रित संघ बनू नये अशी दृष्टी असावी असे वाटते. तसेच गरिबांनी या संघास द्रव्यसहाय्य केले म्हणजे या लोकसेवक संघाची सेवा गरीब जनतेला हवी असून ती मान्य आहे असेही सिद्ध होते. राजसत्तेचा व धनिकांचा आश्रय घेऊन लोकसेवेचे व्रत आचरणारे संघ तत्त्वभ्रष्ट होण्याचा धोका असतो म्हणूनच संघास लागणाऱ्या या निधीसंबंधी वरील सूचना गांधीजींनी केली असावी असे दिसते."

गांधीजींच्या आशयाचे संक्षिप्त आकलन एवढेच या मांडणीचे महत्त्व नाही. आचार्यांच्या अनुकूल अभिप्रायाचे जे अस्तर आचार्यांनी या सारांश निवेदनात केले आहे ते आपल्या विषयाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. त्यांच्या मनातील यतिवर्गाच्या भूमिकेचे संपूर्ण यथार्थ दर्शन या मांडणीत येऊन गेले आहे हे आपण ओळखले पाहिजे.

गांधीजींना व आचार्य जावडेकरांनाही जाऊन जवळजवळ चार दशकांचा कालावधी आता उलटून गेला आहे. (काही पलीकडे, काही अलीकडे). या कालखंडात खूपच काही घडले आणि गेल्या चारपाच वर्षात तर जगात खूपच प्रचंड उलथापालथी झाल्या. वरील विवेचनाच्या दृष्टीने घडावयास हवे होते ते तर फारच थोडे घडले. आचार्यांनी जो आशावाद प्रकट केला होता तो तर पूर्णपणे विफल ठरला. तरी मग आज आपण आजच्या संदर्भात त्यांच्या विचारधारेचा मागोवा देण्याचा प्रयत्न का करतो ?

आचार्यांचा आशावाद तरी काय होता? 'गांधीजी : जीवनरहस्य' या ग्रंथात ते लिहितात.

"सत्तासंपादनाच्या स्पर्धेत केव्हाही भाग न घेणारा, जे निरनिराळे पक्ष सत्तासंपादनाचे प्रयत्न करीत असतील, त्यांच्यापैकी कोणीही मूलभूत राष्ट्रीय स्वातंत्र्य व लोकशाही यांना धक्का लावल्यास त्याला आपल्या आत्मबलाने त्या कामी विरोध करणारा आणि विधायक लोकसेवेने जनतेचे अंत:करण तिच्यावरील उत्कट प्रेमाने वश करणारा सत्याग्रही वर्ग, अथवा लोकसंघ समाजात असावा असे महात्मा गांधींचे मत होते. राष्ट्रसभेनेच यापुढे हे कार्य अंगिकारावे आणि सत्तास्पर्धेपासून अलिप्त राहून ही सामाजिक क्रांती रक्तहीन बनवावी हीच गांधीजींची अखेरची इच्छा असावी. राष्ट्रसभेच्या जीविताचे खरे साफल्य हेच नव्हे काय ? महात्मा गांधींनी राष्ट्रसभेचे ३० वर्षे नेतृत्त्व करून जो हा मार्ग दाखवून दिला, त्या मार्गाचे अनुसरण करूनच ती स्वत: चिरंजीव होईल आणि जगाला शांततामय क्रांतीचा मार्ग दाखवून दिल्याचे श्रेयही तिलाच लाभेल."

ते पुढे लगेच लिहितात: "आज ना उद्या राष्ट्रसभा याच मार्गावर येईल आणि समाजवादी ध्येयाच्या पक्षाला राज्यावर बसवून त्या राज्याला तत्त्वभ्रष्टता प्राप्त होऊ नये आणि त्याला एकपक्षीय लष्करी सत्तेचे स्वरूप प्राप्त होवू नये, असे प्रयत्न करण्यासाठी जनतेचे आत्मबल जागृत, संघटित व प्रभावी करण्यात रमून जाईल अशी आम्हास आशा आहे. असे होईल तेव्हाच राष्ट्रसभेची खरी महती जगाला दिसू शकेल." (पृ. ४३१)

ही आशा सफल झाली नाही हे आपण जाणतो. परंतु यासाठी राष्ट्रसभेला (म्हणजे इंडियन नॅशनल काँग्रेस व तिच्यात झालेल्या फुटी, फेरबांधण्या इत्यादींना) दोष देऊन आपल्याला नामानिराळे राहता येईल अशी ही स्थिती नाही. समाजात राजकीय पक्षांचे अस्तित्व असेल हे या मांडणीत गृहीतच धरलेले आहे. राष्ट्रसभा त्याच पद्धतीचा एक राजकीय पक्ष म्हणून कार्य करीत राहिली याचे गांधीजींना दु:ख वाटले तर ते स्वाभाविक होय. कारण त्यांनी राष्ट्रसभेची काही एक विशिष्ट घडण करावी असा प्राणपणाने प्रयत्न केलेला होता.

पक्षातीत अशा कार्यपद्धतीवर ज्यांचा विश्वास आहे अशा लोकांच्या दृष्टीने महत्त्वाचा प्रश्न हा आहे की अशी कोणतीच अन्य स्वतंत्र संघटना का उभी राहिली नाही ? की उभी करण्याचा प्रयत्न होऊन तसे प्रयत्नही विफल झाले ?

४) असे निखळ शंभर टक्के शुद्ध स्वरूपाचे प्रयत्न झाले की नाही अशा प्रश्नाला उत्तर कदाचित 'नाही' असेच द्यावे लागेल. परंतु त्या दिशेने काहीच प्रयत्न झाले नाहीत असे म्हणणेही योग्य व वस्तुस्थितीला धरून होणार नाही, तशा स्वरूपाच्या एकेका प्रयत्नाचेही नीट विवरण करावयाचे तर स्वतंत्र ग्रंथ लिहावे लागतील. (काहींच्या संदर्भात असे लिहिले गेलेही आहेत) आपल्याला या ठिकाणी केवळ काही अशा प्रयत्नांचा निर्देश करूनच पुढे जावे लागेल.

१) राजकीय पक्ष विसर्जित न करता, सत्तेवर राहण्याचा आग्रह ठेवून लोकशाही व समाजवाद यांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न पं. जवाहरलाल नेहरू यांच्या कालखंडात करण्यात आला. लोकशाही निवडणुकांवर आधारित राज्य व संमिश्र अर्थव्यवस्थेच्या संकल्पनेवर आधारित आर्थिक नियोजन हे या प्रयत्नाचे स्वरूप राहिले. निवडणुकांवर आधारित शासन ही कसोटी भारत आजवर उत्तीर्ण होत आलेला आहे. हे निरक्षर भारतीय जनतेच्या आंतरिक प्रगल्भतेचे लक्षण आहे की, तिच्या इतिहाससिद्ध जडतेचे लक्षण

आहे याची कसोटी अद्याप लागावयाची आहे. काळ लवकरच ही कसोटी तीव्रपणे घेईल अशी चिन्हेही आज दिसत आहेत. आपले आर्थिक नियोजनही संमिश्र वाटचालीच्या दिशेने जात असताना अडखळून पडले. हा मार्गाचा दोष होता असे मानणारे अनेक आहेत. (नेहरूंना वंदन करून - परंतु शासनाचीही - म्हणजे राष्ट्रसभेची - आज तशीच भूमिका असल्याचे भारताच्या नवीन आर्थिक धोरणावरून स्पष्ट होते.) मार्ग बरोबर होता. परंतु आपण जशी जागरूक दमदार वाटचाल करावयास हवी होती तशी केली नाही असे म्हणणारेही काहीजण आहेत. आपण दारिद्र्य हटवण्यात अपयशी ठरलो हे आजही (सरकारी आकडे मान्य केले तरी) भारतात तीस कोटींहून अधिक लोक दारिद्र्य रेषेखालचे जीवन जगत आहेत यावरून स्पष्ट होते. (आपली दारिद्र्यरेषा हीच मुळी दरिद्री आहे हा भाग तर वेगळाच.) नव्या आर्थिक धोरणाने या लोकांचा प्रश्न सुटणार नसून तो अधिक बिकट होईल हे स्पष्ट दिसत असताना ही अवघडलेल्या परिस्थितीत रुग्णाने एका कुशीवरून अगतिकपणे दुसऱ्या कुशीवर वळावे त्या रितीने आपण आता भांडवलशाही अर्थरचनेचा मार्ग स्वीकारू पहात आहोत. जी प्रगत भांडवलशाही राष्ट्रे भारताला या दिशेने लोटत आहेत त्यांना भांडवलशाहीतून निर्माण होणाऱ्या जीवघेण्या अंतर्गत व आंतरराष्ट्रीय स्पर्धेतून स्वतःची मुक्तता करून घेता आलेली नाही; बेकारीच्या प्रश्नाला उत्तर शोधता आलेले नाही आणि कल्याणकारी राज्याच्या मार्गाने आपण दारिद्र्याच्या अभावांच्या प्रश्नांना उत्तर देऊ शकू हा त्यांचा विश्वासही आज स्पष्टपणे डळमळीत झालेला आहे.

परंतु मग मार्ग राहतो तरी कोणता ?

याचे उत्तर जगात आज कोणाकडेही नाही. कृतिशीलांच्याकडे नाही; विचारवंतांच्याकडेही नाही; आपल्याकडे उत्तर असल्याचे दावे मात्र अनेकांचे आहेत.

गांधीवादाने याचे उत्तर कोणत्या पद्धतीने दिले असते याचे काही दिग्दर्शन आचार्य जावडेकरांनी केले आहे. परंतु त्यांच्यानंतरच्या कालखंडात त्यात कितीतरी अधिक तात्विक विचार व व्यावहारिक आचार व्हावयास हवा होता. तसे प्रयत्न अगदीच झाले नाहीत असे नाही. काहीतर फार मोठ्या प्रमाणावर झाले. परंतु मोठ्या प्रमाणावर होऊनही ते फारच अपुरे पडले असा आजवरचा अनुभव आहे.

अशा प्रयत्नांपैकी आपापल्या कालखंडात जगभर गाजलेले असे तीन प्रयत्न झाले. पहिला प्रयत्न विनोबाजींचे भूदान आंदोलन, (ज्याला पुढे पुढे ते आरोहण म्हणत असत), दुसरा प्रयत्न म्हणजे मार्टिन ल्यूथर किंगचे अमेरिकेतील कृष्णवर्णीयांच्या साठी केलेले आंदोलन व तिसरा आज चालू असलेले श्रीमती मेधा पाटकर यांचे नर्मदा बचाव आंदोलन, अशा आंदोलनातून होणाऱ्या उपलब्धींची शक्यता व त्यांच्या यशांच्या अटळ मर्यादाही आता स्पष्ट झालेल्या आहेत. परंतु शोषितांसाठी लोकशाही मार्गाने सामाजिक व आर्थिक न्याय प्रस्थापित करण्यासाठी उचललेली ती प्रभावी पावले होती याविषयी कुणाचेही दुमत नाही.

असा प्रयत्नातील विचाराच्या व कृतीच्या मर्यादांचा विचार करताना विनोबाजींच्या भूदान आंदोलनाचा काहीसा तपशीलाने विचार केला तरी आताच्या विवेचनाच्या दृष्टीने ते पुरेसे ठरावे. अन्य दोन प्रयत्नांविषयी नंतर कधीतरी सवडीने सविस्तरपणे लिहावे लागेल.

वरील परिच्छेदातील 'आताच्या विवेचनाच्या दृष्टीने या शब्दप्रयोगाची थोडीशी अधिक स्पष्टता याठिकाणी करणे उचित होईल' ती अशी.

१) ज्या विचारधारेला अनुसरून आचार्य जावडेकर यांनी आपली मांडणी केली त्या गांधीजींच्या विचारधारेच्या विकासाचे विनोबाजी निकटचे साक्षी होते व गांधीजीही आपले विचार विनोबाजींच्या प्रतिक्रियेच्या कसोटीवर घासून पहात असत.

२) आचार्य जावडेकर यांच्या संकल्पनेतील यतीच्या आदर्शाचे विनोबाजी मूर्तिमंत रूप होते. गांधीजीही त्यांना तसे मानत होते. याची ग्वाही गांधीजींनी त्यांची वैयक्तिक सत्याग्रहाच्यावेळी पहिला सत्याग्रही म्हणून केली त्यावेळी मिळाली.

३) "भूदान आंदोलनाच्या निमित्ताने विनोबाजी व जयप्रकाश यांचे मिलन झालेले पाहून आचार्य जावडेकर यांना परम समाधान वाटले. पं. जवाहरलाल, विनोबाजी आणि जयप्रकाश या त्रिमूर्तीच्या प्रयत्नांनी आणि प्रेरणांनी भारतात नवी समाजरचना होईल आणि ती आधुनिक जगालाही मार्गदर्शक ठरेल असा विश्वास त्यांना वाटू लागला होता." (शं. द. जावडेकर 'समाजवाद आणि सर्वोदय : तुलनात्मक विवेचन' १९५७. प्रस्तावना : आचार्य स. ज. भागवत पृ. ३)

विनोबाजींच्या कार्याचे किंवा भूदान यज्ञ आंदोलनाचे मूल्यमापन याठिकाणी आपल्याला अभिप्रेत नाही. सर्वात अनुकूल परिस्थिती असताना लोकशाही सत्याग्रही समाजवादी विचारधारेच्या आचरणात कोणत्या आणि कशा अनुकूलता किंवा प्रतिकूलता निर्माण होतात हे आपल्याला पहावयाचे आहे. विनोबाजींच्या प्रयोगाच्या दृष्टीने आणखी एक महत्त्वाची अनुकूलता होती. राष्ट्रसभेचे लोकसेवक संघात रूपांतर झाले नाही हे खरे परंतु त्या

दिशेने जाऊ पाहणारा सर्वसेवासंघ उभा राहिला. त्याचे संख्यात्मक बळही तसे कमी नव्हते व विनोबाजी आणीबाणीच्या कालखंडापर्यंत त्या संघाचे एकमेव नेते होते.

या आंदोलनाच्या प्रारंभाचा व विस्ताराचा इतिहासही या संदर्भात महत्त्वाचा आहे. विनोबाजींच्या तेलंगणातील पदयात्रेत त्यांना ही कल्पना एका दानपत्राच्या अनुभवावरून स्फुरली. तेलंगणात त्यावेळी साम्यवादी कट्टरपंथीय लोकांचा जमीनदाराविरुद्धचा हिंसाचार चालला होता. जमीनदार भयभीत आणि त्रस्त होते. भूदानातून या समस्येचे उत्तर सापडेल असे विनोबाजींना वाटले आणि त्यानंतरच्या दोन तीन वर्षांच्या कालखंडातील भूदान यात्रेचा अनुभव अतिशय उत्साहजनक होता. साऱ्या जगाचे लक्ष या आंदोलनाकडे वेधले गेले. भारतात सर्वत्र या यात्रेचे स्वागत झाले. येलवाल येथे सर्व राजकीय पक्षांच्या झालेल्या बैठकीत सर्व राजकीय पक्षांनी या कार्यक्रमाला आपली सहानुभूती प्रकट केली.

भूमिहीनांना जमीन मिळावी, रक्त न सांडता शांततामय मार्गाने मिळावी; बंधुभावाने श्रीमंतांनी ती गरिबांना द्यावी या प्रयत्नात लोकशाही सत्याग्रही समाजवादाची सर्व सूत्रे होती का ? या प्रश्नाचे उत्तर 'बहुतांश होती परंतु पूर्णपणे नव्हती' असेच द्यावे लागेल. या विचारधारेचे मूळ एकादश व्रतातील 'अपरिग्रहात' होते. गांधीजींनी मांडलेल्या विश्वस्तवृत्तीच्या संकल्पनेचा तिला आधार होता व 'दानाने पापाचे व्याज फिटते; त्यागाने पापाचे मुद्दल फिटते' या विनोबाजींच्या विश्लेषणाचीही छाया तिच्यावर होती. परंतु 'आता प्रेमाने दिले नाहीत तर नंतर साम्यवादी हिंसेने हिरावून घेतील' ही प्रच्छन्न भीतीही या आंदोलनाच्या प्रसारामागे होती. १९५५ च्या जगन्नाथपुरीच्या सर्वोदय संमेलनानंतर आम्ही काहीजण पोचमपल्लीला गेलो असता एक जमीनदार वैतागाने सांगत होता : "काय दिवस होते ! रात्री साम्यवाद्यांचा त्रास तर दिवसा सर्वोदयवाद्यांचा."

एखादी महान संकल्पना प्रत्यक्षात व्यवहारात तिचे निखळ शुद्ध रूप ठेवणे सामान्यतः अशक्यच असते. गांधीजींच्या अहिंसेचेही असेच झाले होते. जगन्नाथपुरीला या आंदोलनातील सर्वोच्च कार्यकर्त्यांच्या एका बैठकीस उपस्थित रहाण्याची आम्हा तिघांना (भूदानाचे दोन अभ्यासक व मी) त्या लोकांनी सौजन्याने परवानगी दिली होती. दामोदरदास मुंदडांनी आपल्या एकूण विधायक कार्याचा अहवाल दिला. विनोबाजी म्हणाले, "दामोदरने काय सांगितले याविषयी जर माझी परीक्षा घेतली तर उत्तीर्ण होण्याइतके पस्तीस टक्के गुणही मला मिळणार नाहीत. इतर सर्व कामे सोडून आपण याच कामावर तुटून पडले पाहिजे असे मला वाटते." नंतर चर्चा थोडी गरम झाली. विनोबाजी बैठकीतून उठून गेले. सर्वजण स्तब्ध. जयप्रकाशजी मांडी मुडपून हातात हनुवटी धरून विचारमग्न. थोड्या वेळाने स्वतःशीच बोलल्याप्रमाणे ते थोडे मोठ्याने म्हणाले : 'बाबा तो मंत्र जानते है, तंत्र हम लोगोंको करना पडता है।' ती बैठक तेथेच संपली. (दामोदरदासजींचे निधन होण्यापूर्वी दोन वर्षे त्यांची गाठ पडली असताना मी त्यांना माझे हे स्मरण बरोबर आहे ना, असे विचारले. ते 'हो' म्हणाले.)

लोकशाही सत्याग्रही समाजवादाचा विचार आपण थोडा पिंजून पाहण्याचा प्रयत्न करीत आहोत. भूदान, संपत्तिदान, जीवनदान, ग्रामदान, अखंड दान, तालुका दान, जिल्हा दान अशा क्रमाने आंदोलनाचे आरोहण होत गेले. मंत्र आणि तंत्र यात असणारे प्रासंगिक व्यावहारिक अंतर तर अटळपणेच होते. परंतु सत्याग्रह म्हणजे काय व भूदान आंदोलनात सत्याग्रहाचे स्थान कोणते असावे याविषयीही मतभेद होते.

विनोबाजींच्या मते भूदान कार्यात सत्याग्रहाला स्थान नव्हते. किंबहुना आधीच जडमूढ प्रवृत्तीच्या असलेल्या जनतेच्या मनात सत्याग्रह आंदोलनांनी विकृत अस्थिरता निर्माण करून विकासाच्या प्रक्रियेला खीळ घालणे आपल्याला युक्त वाटत नसल्याचे त्यांनी चांडिल येथील सर्वोदय संमेलनातील आपल्या भाषणात सांगितले आहे. या भूमिकेशी अनेकांचे मतभेद होत व आहेत. परंतु सर्वांनी या बाबतीत विनोबाजींचा अधिकार अनंतपटीने अधिक होता हे मान्य करूनच नम्रपणे नोंदवले पाहिजेत असे मी मानतो. हा वाद निर्माण होण्याच्याही पुष्कळ आधी आचार्य जावडेकरांनी आपली या संबंधीची भूमिका मांडली होती.

आचार्य जावडेकरांनी लिहिले होते (गांधीजी : जीवनरहस्य, पृ. ४३०) :

"सत्याग्रहींनी स्वतः असंग्रही राहिले पाहिजे आणि वरिष्ठ वर्गाच्या स्वार्थाशी झगडत असता त्या वर्गातील व्यक्तीविरुद्ध अद्वेषाची भावना टिकवण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. स्तेयमूलक संग्रहाला पायबंद घालून तो बंद पाडणारे कायदे करावयास सरकारला प्रवृत्त केले पाहिजे, आणिअसे कायदे हे न्यायसंस्थापना करणारे असल्यामुळे वरिष्ठ वर्गालाही त्याला मान्यता देण्यास प्रवृत्त केले पाहिजे. अशाप्रकारे मालक व मजूर हा वर्गभेद नष्ट करून मालक हे समाजाचे सेवक आहेत आणि मजूर हे समाजाच्या संपत्तीचे मालक आहेत, ही भावना वाढवीत नेऊन हा वर्गविग्रह संपवून रक्तपात न करता एकवर्गसमाजाची स्थापना केली पाहिजे."

यानंतर लगेच आचार्य जावडेकर पुढे म्हणतात ते त्यांच्या






सत्याग्रहाच्या आग्रहाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

ते लिहितात : "असे सत्याग्रही नेते स्वतः न्यायनिष्ठ राहिले पाहिजेत. वर्गशोषणाच्या अन्यायाची शास्त्रीय जाणीव त्यांना झाली असलेली पाहिजे आणि सर्व समाजाची न्यायबुद्धी जागृत करून तिला या समाजवादी क्रांतीची न्याय्यता त्यांनी पटवून दिली पाहिजे. अनत्याचारी असहकाराच्या म्हणजे संपाच्या व सत्याग्रहाच्या साधनांनी समाजाच्या न्यायबुद्धीच्या जागृतीचे हे कार्य केले गेले, तर या क्रांतीस निदान लोकशाही राज्यात तरी हिंसक स्वरूप प्राप्त होण्याचे कारण नाही. पण संप, सत्याग्रह किंवा प्रत्यक्ष प्रतिकार या साधनांवाचून केवळ सनदशीर युक्तिवादाच्या साधनाने हे सामाजिक हृदयपरिवर्तन घडून येणार नाही.

स्वतंत्र भारतातील सत्याग्रहाच्या स्थानाविषयी आचार्य जावडेकर यांची ही भूमिका विनोबाजींच्या भूमिकेहून वेगळी आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. या बाबतीत विनोबांशी वाद घालण्याची संधी काळाने त्यांना उपलब्ध करून दिली असती तर त्यांनी हा वाद विनोबाजींचा सर्वश्रेष्ठ अधिकार पूर्णपणे मान्य करून आत्यंतिक नम्रपणे परंतु निश्चयात्मक निर्धाराने घातला असता याविषयी माझ्या मनात शंका नाही.

आचार्य जावडेकर यांनी पुरस्कार केलेल्या यतिवर्गाच्या संकल्पनेतील शक्यता आणि मर्यादा यांचे प्रभावी उदाहरणही विनोबाजींच्याच जीवनचरित्रात मिळण्यासारखे आहे.

७) गांधीजींच्या संकल्पनेतील लोकसेवक संघ प्रस्थापित झाला नाही. परंतु सर्व सेवा संघ अस्तित्वात आला. यतिवर्ग म्हणून सर्व सेवा संघाचा प्रभाव मात्र जनमानसात नगण्यच राहिला. परंतु आदर्श यतिवर म्हणून विनोबाजींना जनमानसात, राज्यकर्त्यातही अतीव आदराचेच स्थान होते. आणीबाणीत विनोबाजींनी पाळलेल्या मौनामुळे जनमानसा-तील त्यांच्या या प्रतिमेला तडा गेला. आचार्य जावडेकर असते तर त्यांचीही विनोबाजींच्या भूमिकेमुळे निराशाच झाली असती परंतु त्यांच्या अंतःकरणातील विनोबाजींच्या विषयीच्या भावनेला ढळ पोचला नसता. कारण जनमानसात आपली प्रतिमा कायम राहील याचा विचार करून जो आपली भूमिका ठरवतो तो खरा यतीच नव्हे ही त्यांची भूमिका होती. निःपक्ष, निर्वैर, निर्भय हेच आचार्य जावडेकरांना अभिप्रेत असलेले यतीचे गुण होते. निःस्वार्थता हा गुण तर या सर्व गुणांचे अध्याहृत अधिष्ठानच होता.

या सर्व कसोट्यांना विनोबाजी शंभर टक्के उतरत होते व अखेरपर्यंत उतरत राहिले असे मानणाऱ्यांपैकी मी आहे. इतरांच्याबाबत विनोबाजी उदार अंतःकरणाने भरपूर सवड देत असावेत असे मला माझ्या व्यक्तिगत अनुभवावरून वाटते. आपले मौन सोडल्यानंतर विनोबाजींनी आणीबाणीचा विचार करण्यासाठी आचार्य संमेलन आयोजित केले होते. तीस एक जणांना आमंत्रण होते. निःपक्ष, निर्वैर व निर्भय असतो तो आचार्य अशी विनोबाजींची व्याख्या होती. निष्क्रिय माणूस निःपक्ष म्हणून गणला जाऊ शकतो व सर्वच गोष्टींना चांगले म्हणणे हाही निर्वैरतेचा एक प्रकार असू शकतो. निवडीतील या पद्धतीच्या चुकांची शक्यता आपण मनात वागविली पाहिजे आणि विनोबाजींच्या छायाछत्राखाली आल्याखेरीज आणीबाणीच्या विषयीचे आमचे विचार मांडण्याचे धैर्य जर आम्हा सहभागी लोकांना झालेले नसेल, तर जनमानसातील किंवा राज्यकर्त्या लोकातील प्रतिकूल अभिप्रायांना भिऊन आपले मत त्याआधी स्पष्ट न करणाऱ्यांना निर्भय तरी कसे म्हणावे ?

आचार्य जावडेकरांच्या यतिवर्गाच्या संकल्पनेचा भारतात आलेला प्रत्यक्ष अनुभव या दृष्टीने हा निर्देश केला. भारतात विनोबाजींच्या नेतृत्वाखाली झालेल्या सर्वात मोठ्या प्रयत्नाच्या जर या मर्यादा राहिलेल्या असतील तर लोकशाही सत्याग्रही समाजवादाने आकाशाला गवसणी घालावयाचा प्रयत्न कशासाठी करावयाचा ?

आजचा प्रश्न तर अधिकच अवघड आहे. तो केवळ आकाशाला गवसणी घालण्याचा नाही तर असंख्य दिशांनी फाटलेल्या आकाशाला ठिगळे लावण्याचा आहे. मग या विचारधारेचा उपयोग काय ?

उपयोग आहे, आणि अत्यंत महत्त्वाचा आहे. वादळात जहाज हेलकावे खात असले की ते बुडू नये म्हणून सुकाणू तीनशेसाठ अंशातून कर्णधाराला अनेकदा कसेही फिरवावे लागते. परंतु त्याची अंतिम दिशा निश्चित करण्यासाठी त्याला ध्रुवताऱ्याचा वेध सतत घ्यावाच लागतो. या गोष्टीचे जे महत्त्व तेच या विचारधारेचे आहे.

१९४५ मध्ये अणुअस्त्राचा स्फोट झाला आणि त्यानंतरच्या कालखंडात जगात उलथापालथ करून टाकणाऱ्या घटनांच्याबाबत स्फोट (Explosion) हा शब्द वापरणे सुरू झाले. Atomic Explosion अणुचा स्फोट त्याचप्रमाणे लोकसंख्येचा स्फोट (Population Explosion) Knowledge Explosion (ज्ञानाचा स्फोट), Techonological Explosion (तंत्रज्ञानाचा स्फोट), Information Explosion (माहितीच्या उपलब्धीचा स्फोट) असे अनेकविध स्फोट जगाने गेल्या पाच दशकात अनुभवले. केवळ एक तीव्र गतीचा धक्का एवढेच या स्फोटांचे स्वरूप नव्हते. संख्यात्मक [illegible] मोठ्या प्रमाणात झाला की तो

गुणात्मक बदलही घडवून आणतो अशा स्वरूपाची ही प्रक्रिया होती. (ढोबळ उदाहरण घ्यावयाचे तर पाण्याचे अंशमान क्रमाने उतरवत नेले की शून्य सेल्सिअस अंश तापमानावर ते शून्य तापमानाचे पाणी रहात नाही त्याचे बर्फ होते. तपमान चढवत नेले तर शंभर सेल्सिअस अंश तापमानावरही त्याची वाफ होते.) या कालखंडात आरोग्यविषयक अनेक सुविधा सर्वसामान्य जनतेला उपलब्ध झाल्यामुळे दुष्काळ, देवी, प्लेग यासारख्या रोगांच्या साथींचे पूर्णपणे निर्मूलन करण्यात आले व कुटुंबनियोजनाचा प्रसार मात्र जितका व्हावयास हवा होता तितका झाला नाही. भारताचीच लोकसंख्या या कालखंडात जवळजवळ तिप्पट झाली. इतर अप्रगत राष्ट्रातूनही असाच अनुभव आला. युद्धाच्या काळात युद्धाची गरज म्हणून विज्ञान-तंत्रज्ञानाचा विकास झपाट्याने झाला व तो तसाच किंबहुना त्याहूनही अधिक गतीने त्यानंतरच्या कालखंडातही चालू राहिला. दर दशकात ज्ञानाचा साठा दुपटीने वाढत होता असे याचे वर्णन करण्यात येते. मानवाने चंद्रावर पदार्पण केले या घटनेलाही आता तीन दशकाहून अधिक काळ उलटून गेला आहे आणि मंगळावर पाय ठेवण्याची अंटार्क्टिकाप्रमाणे चंद्रावरही वसाहती करण्याची मानवाची ईर्षा एकदोन दशकातच सफल होईल अशी स्पष्ट चिन्हे दिसत आहेत. आज जगातील कोणत्याही ठिकाणी असणारे ज्ञान अन्य ठिकाणी एक तासाभराहूनही कमी अवधीत पोचवले जावू शकते. इराकच्या रणभूमीवर काय घडत आहे हे आपण घरबसल्या तत्क्षणी पाहू शकतो. या अशा सर्व गोष्टी आपण प्रत्यक्ष अनुभवत आहोत. परिवर्तनावरचा मानवाचा काबू सुटल्यासारखे दिसत आहे. उपयोगासाठी साधनांची शक्यता वाढली आहे. त्याच्या विविध प्रकाराविषयी आकर्षण उत्पन्न झाले आहे. योग्य त्या गोष्टीच निर्माण होतील व हितकारक दृष्टीनेच त्यांचा वापर होईल अशी शक्यता उरली नाही व या सर्वांवर नियंत्रण राखू शकेल अशी एखादी संघटना यंत्रणाही अस्तित्वात नाही. यामुळे जगातील सर्वच विचारी लोक (यात अप्रगत राष्ट्रातील व प्रगत राष्ट्रातीलही विचारवंतांचा समावेश आपण करावयास पाहिजे) चिंतेत पडले आहेत.

काळाच्या पोटात काय काय दडलेले आहे याचा आपल्याला अंदाजही लागू शकत नाही याचे भान करून देणाऱ्या घटनाही गेल्या दशकात घडल्या. रशियाचे या पद्धतीचे परिवर्तन व विघटन होईल याचा कोणी आधी अंदाज केला होता. इच्छा अनेकांचा होती, अनेक टिकाणी रशियाचा अभ्यास चालू होता, अमेरिका तर युद्धाच्या शक्यतेमुळे डोळ्यात तेल घालून सर्व प्रकारचे अभ्यास करून व हेरगिरीही वापरून रशियावर नजर ठेवून होती. परंतु कोणालाही याविषयीचे भविष्य वर्तवता आलेले नव्हते. तशीच दुसरी घटना म्हणजे प्रभावीपणे उफाळून आलेल्या धार्मिक मूलतत्त्ववादाच्या (Fundamentallism) पुनरुज्जीवनाची. या हटाग्रहांच्या पलीकडे मानवसमाज आता जाऊन पोचलेला आहे असेच आपण समजत होतो. या दोन्ही धक्क्यांची आंतरिक सुप्त तीव्रता किती असू शकेल व त्यांचे अंतिम परिणाम काय होतील याचेही अंदाज आपण बांधू शकत नाही. प्रश्न सामाजिक असल्यामुळे आपापल्या तद्‌विषयी भूमिकाप्रमाणे आपण आशावादी किंवा निराशावादी अंदाज बांधतो इतकेच, भौतिक भूकंपाचे शास्त्रदेखील आज जितके अप्रगत आहे त्याहूनही या अशा घटनामागील मानवी वृत्तींचे शास्त्रीय ज्ञान अप्रगत आहे.

आपण सर्वच एका विलक्षण भांबावलेल्या स्थितीत आहोत. (आणि जे नसतील ते सुदैवी म्हटले पाहिजेत कारण त्यांना परिस्थितीच समजलेली नाही.) यातून मार्ग काढण्याचा प्रयत्न तर करत राहिलेच पाहिजे.

परंतु परिस्थिती जर इतकी बदलली असेल तर पूर्वीच्या मार्क्स, गांधीजी आदींच्या विचारांचा उपयोग तरी काय आणि कोणी त्याचा ऊहापोह केला असेल तर त्याला महत्त्व तरी कशासाठी द्यावयाचे? लोकशाही सत्याग्रही समाजवादाची संकल्पना हे एक दिवास्वप्नच नाही काय?

या प्रश्नाचे उत्तर 'होय आणि नाही' असे विचित्र वाटणारे दुहेरी द्यावे लागेल. 'होय' अशासाठी की ते स्वप्न साकार झाले तरच 'Unto this last' या दलितातील अंतिम दलितालाही न्याय मिळू शकेल. यामुळे ते स्वप्न अस्तित्त्वात आणण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करणारे काही लोक तरी सदैव अस्तित्त्वात असतील. 'नाही' अशासाठी की परिस्थितीवर मात करू शकेल अशा प्रमाणात या लोकांची संख्या व त्यांच्या कार्याची व्याप्ती वाढू शकेल अशी शक्यता आज कमी दिसते. परंतु समाजमनाचे विध्वंसक स्फोट होऊ शकतात तसेच विधायक जागृतीचे होणारच नाहीत अशी निराशा तरी आपण का बाळगावी? आपापल्या सूत्रांच्या आधारे धर्म किती झपाट्याने प्रसार पावले होते. साम्यवादाने किती द्रुतगतीने अर्ध्या जगावर आपला प्रभाव टाकला होता आणि भारतात देखील सत्याग्रह म्हणून काही चीज जनतेला संघटित करून स्वराजापर्यंत नेण्याइतकी प्रभावी होईल असे १९२० साली कोणाला वाटले होते?

मूलभूत प्रश्न जी तत्त्वे आपण आचरणात आणावीत असे म्हणतो ती युक्त आहेत की नाहीत याचा विचार करणे व त्या दिशेने जाण्यासाठी प्रयत्नशील राहणे. गांधीजींची विचारधारा विशद






करताना आचार्य जावडेकर यांची हीच भूमिका होती. ते विचारशील होते व कृतिशीलही होते.

आजही काही कालबाह्य झालेले नाही. दलितातील दलितालाही न्याय मिळेल अशीच समाजरचना असली पाहिजे हा विचार कालबाह्य झालेला नाही; तो कधी तसा होऊच शकत नाही, प्रत्येक व्यक्तीला मानाने स्वाभिमानाने जगता येईल, आपली आत्मप्रतिष्ठा सांभाळता येईल असेही समाजरचनेचे स्वरूप असले पाहिजे हा विचारही कालबाह्य झालेला नाही. मानवाची आंतरिक स्वत:सिद्ध प्रेरणा तसे कधी होवूच देणार नाही. समाजरचना कशी घडली, कोणी घडविली, ती कोणाचे हितसंबंध सांभाळते, कसे सांभाळते, ती बदलावयाची तर काय केले पाहिजे यावर वादविवाद होऊ शकतात, परंतु यावर चर्चा करणे म्हणजे वेळेचा अपव्यय आहे आणि प्रगतीच्या गतीला धोकादायकही आहे असा आमच्या सत्ताधारी राष्ट्रांच्या किंवा राष्ट्रांतर्गत आपले हितसंबंध राखण्यासाठी इतरांवर आक्रमण करणाऱ्या गटांच्या आपमतलबी प्रचाराला प्रभावी उत्तर देण्याची आज गरज आहे. जगातील सर्वच विचारवंतांच्या पुढे आज हे काळाचे आव्हान आहे. याचे उत्तर देणाऱ्या विचारवंतांचा अजून उदय व्हावयाचा आहे.

आचार्य जावडेकर यांनी तर विचारवंतांपुढे अधिक प्रखर आव्हान ठेवले होते. आज सत्याग्रहाच्या संकल्पनेचे तात्त्विक आणि कृती संशोधन होण्याची गरज आहे. या संदर्भात गांधीजी विनोबाजो यांचे कार्य तर न्याहाळावे लागेलच परंतु या क्षेत्रात अन्य अनेक प्रयोगवीरांचे अनुभवदेखील विचारात घ्या.वे लागतील.

आचार्य जावडेकरांची विचारवंतांच्या संदर्भात असलेली अंतिम अपेक्षा तर आपल्या आकलनाच्या कक्षेबाहेर नसली तरी आचरणाच्या कुवतीच्या बाहेरची आहे. विचारशीलाने कृतिशील असले पाहिजे आणि ही कृती यतिधर्माला साजेशी असली पाहिजे अशी त्यांची अपेक्षा होती.

जागतिक संदर्भ कितीही आणि कसेही बदलले तरी या मार्गक्रमणाच्या दिशेत फरक पडू शकत नाही. मार्गावरील धुक्यातून कसा मार्ग काढता येईल हा विचाराचा व दमदार पावले कशी पडत राहतील हा कृतीचा भाग राहील. आचार्य जावडेकर यांची छाया या प्रवासात साथीला असेल.



## समता व समृद्धी

देशकालानुसार संपूर्ण समतेची काही व्यवहार्य रूपे व कार्यक्रम सांगण्याचा मी प्रयत्न करतो...

१. सर्व प्राथमिक शिक्षण एकाच दर्जाचे आणि समान पद्धतीचे असावे. सर्व शाळांवर होणारा खर्च आणि शिक्षकांचा पगार समान असावा. प्राथमिक शिक्षणाच्या सर्व खास श्रीमंती शाळा बंद केल्या जाव्यात.

२. तोट्यात चालणाऱ्या शेतीवरचा सारा अथवा मालगुजारी नष्ट व्हावी. शेतीवरचे सर्व प्रकारचे कर आणि सारा नष्ट होऊन शेतीवरदेखील उत्पन्नकर बसवला जाईल, असे धोरण यातूनच परिणत होऊ शकेल.

३. सर्व शेतीला पाणीपुरवठा होईल अशी पाच अथवा सात साली योजना बनवावी. ते पाणी फुकट मिळावे किंवा प्रत्येक शेतकऱ्याला परवडेल अशा दराने किंवा कर्जाने मिळावे.

४. सार्वजनिक जीवनावरील प्रत्येक क्षेत्रातून माध्यम म्हणून इंग्रजी भाषेचे उच्चाटन व्हावे.

५. मासिक पंधराशे रुपयांपेक्षा अधिक खर्च कोणाही कुटुंबाला करता येऊ नये अशी व्यवस्था करावी.

६. पुढील वीस वर्षे मोटार-कारखान्यांचा पूर्ण उपयोग केवळ बसेस, यांत्रिक नांगर, ट्रक किंवा टॅक्सी बनविण्यासाठी करावा आणि खाजगी गाड्या बनवू नयेत.

८. एकाच हंगामात धान्यभावातील चढ-उतार शेकडा २० टक्क्यांपेक्षा जास्त असू नये; आणि आवश्यक अशा यंत्रोत्पादित वस्तूंच्या विक्रीचा भाव त्यांच्या उत्पादनखर्चाच्या दीडपटीपेक्षा जास्त असू नये.

९. दलित समाज म्हणजेच आदिवासी, अस्पृश्य, स्त्रिया आणि हिंदू व इतर मागास जातींना सार्वजनिक जीवनातील ६० टक्के जागा विशेष संधी देऊन उपलब्ध कराव्यात. ज्यांत विशेष कौशल्य लागते अशा शस्त्रक्रियातज्ज्ञ (सर्जन) वगैरे बाबतींत अशी खास संधी देता येणार नाही. परंतु पोलिसांपासून आमदार-खासदारां-पर्यंतच्या बाबतीत विशेष संधी दिली जावी.

१०. दोन घरांपेक्षा जास्त स्थावर मालमत्तेचे राष्ट्रीयीकरण.

११. जमिनीची परिणामकारक फेरवाटणी आणि त्यांच्या किंमतीवर नियंत्रण.

**- डॉ० राम मनोहर लोहिया**

(साधना, १७ ऑगस्ट २००२)










# स्मरण, सर्वेक्षण आणि संकल्प

## एसेम यांच्या स्मृतिदिनानिमित्त भरलेल्या संकल्प मेळाव्यातील व्याख्यान

ना. ग. गोरे

आपल्या सर्वांचे लाडके नेते एसेम जोशी ऊर्फ अण्णा यांच्या देहावसानाला एक एप्रिल रोजी एक वर्ष पुरे होत आहे. मी अण्णांचा उल्लेख नेते म्हणून जरी केला असला तरी नेता आणि अनुयायी यांच्या संबंधांचा विचार करीत असताना जे नाते आपण गृहीत धरतो, तशा स्वरूपाचे आपले अण्णांशीच नाते नव्हते. त्यामध्ये एक अनोखा जिव्हाळा होता. आपुलकी होती. म्हणून त्या नात्याचे वर्णन 'नेतृत्त्व' या शब्दाने न करता 'पितृत्त्व' किंवा 'भ्रातृत्त्व' या शब्दाने करावेसे वाटते ! कॉलेज जीवनापासून ते जवळ जवळ अखेरच्या क्षणापर्यंतचे आपले उभे आयुष्य त्यांनी एखाद्या अगरबत्तीप्रमाणे जाळले. अन्यायाचा प्रतिकार करावा ही त्यांच्यातील सहजप्रवृत्तीच होती, असे मानले पाहिजे.

पण समाजामध्ये जे अन्याय असतात, त्यांची रूपे विविध असतात. ब्रिटिशांनी भारतावर केलेला अन्याय हा जर अन्यायाचा उघडा राजकीय प्रकार म्हटला, तर आपल्याकडील चातुर्वर्ण्य पद्धतीमुळे दलित वर्गावर होणारा अन्याय किंवा पुरुषप्रधान संस्कृतीमुळे स्त्रीवर्गावर होणारा अन्याय हा अन्यायाचा छुपा समाजांतर्गत प्रकार म्हणावा लागेल. परंतु अन्याय उघड असो वा छुपा, अण्णांना तो सहन होत नसे. हे त्यांचे जीवनचरित्र नजरेखाली ज्याने घातले असेल त्याच्या लक्षात येईल. या सामाजिक छुप्या अन्यायाचे नाते बहुशः धर्माशी जोडलेले असल्यामुळे अशा अन्यायाविरुद्ध झगडणे म्हणजे धर्माशी लढणे, असा त्याचा अर्थ सहजच लावला जातो, परकीय सत्तेशी झगडणे त्यामुळे एकवेळ सोपे ठरते, परंतु स्वकीयांनी स्वकीयांवर केलेल्या अन्यायाविरुद्ध उभे राहणे भल्याभल्यांनासुद्धा परवडत नाही ! अण्णांचे वैशिष्ट्य अथवा असामान्यपण असे की, त्यांनी सर्व आयुष्यभर दोन्ही प्रकारच्या अन्यायांच्या विरुद्ध लढा चालू ठेवला; आणि सर्व प्रकारच्या अन्यायामध्ये एक प्रकारची सलगता असते, हे सत्य आपल्या जीवनामध्ये उत्तरवून दाखविले.

अण्णांच्या जीवनामध्ये ही जी प्रखर अन्यायाविरोधी वृत्ती दिसून येते, तिची मूळ प्रेरणा मात्र क्रोधात नसून करुणेत होती, ही गोष्ट दृष्टिआड करून चालणार नाही. येथे करुणेचा अर्थ दया-कीव अशा अंगाने लावायचा नसून सहानुकंपन या अंगाने लावायचा आहे. अखिल मानवजात हे एक विश्वकुटुंब असून त्यामधील निरनिराळ्या मानवसमूहांचे संबंध प्रेमाचे, सहकार्याचे व बंधुभावाचे असले पाहिजेत, असा त्यांच्या भूमिकेचा आशय होता.

'अयं निजः परोवेति गणना लघुचेतसाम्
उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम्'

ही 'वसुधैव कुटुम्बकम्' वृत्ती त्यांच्या मनामध्ये जसजशी विकसत गेली, तसतसे ते क्रमशः समाजसुधारक, मार्क्सवादी, मानवतावादी आणि गांधीवादी विचारांचे रंग पांघरीत गेले. मात्र करुणा वृत्ती म्हणजे लुळेपणा किंवा मानसिक अपंगत्व अथवा कृतिशून्यता असे त्यांनी कधीही मानले नाही. थिट्या मनाचे लोक महात्मा गांधी, साने गुरुजी किंवा विनोबा यांच्याबद्दल हा असत्य प्रचार नेहमी करीत आलेले आहेत की, त्यांची करुणा म्हणजे वीरवृत्तीचा अभाव होता. हे जसे या थोर लोकांच्या बाबतीत असत्य, त्याचप्रमाणे अण्णांच्याही बाबतीत असत्य. अण्णा आपले सारे जीवन 'जीवनवीर' म्हणूनच जगले आणि अखेरपर्यंत ते जीवनवीरासारखेच वागले. अखेरपर्यंत म्हणजे कॅन्सरसारख्या रोगाशी मृत्यूपर्यंत झुंजतानासुद्धा.

अण्णांच्या जीवनातील अजिबात दुर्लक्ष करता न येण्यासारखा एक भाग म्हणजे त्यांच्यामधील विधायक प्रवृत्ती. सतत लढत राहणे म्हणजे वीरता, असे समीकरण त्यांनी कधीही मांडले नाही. विरोध किंवा लढा हा थोड्या कालापर्यंतच असतो; सहविचार, सहभाग, सहकार यांना जीवनामध्ये लढ्याच्या बरोबरीचे पण अधिक शाश्वतीचे स्थान असते, नव्हे असायला हवे, असेच त्यांनी आपल्या जीवनात मानले. अशा विधायक वृत्तीवाचून लोकसत्ताक शासन केवळ अशक्यच ठरेल. त्या दृष्टीनेसुद्धा अण्णांच्या ठिकाणचा मोठेपणा नजरेत भरतो. हिऱ्याची पारख करणारे असे सांगतात की, हिऱ्याचा दर्जा चार 'C' वर ठरतो - कॅरट, कट, क्वालिटी आणि कलर! म्हणजे वजन, पैलू, निर्मळपणा आणि रंग. हा हिऱ्याचा निकष जर अण्णांना लावला, तर अण्णांची गणना मनुष्यरत्नांत करावयास हरकत नसावी.

तथापि, आज अण्णांचे केवळ गुणसंकीर्तन करण्यापेक्षा किंवा त्यांच्या निधनाबद्दल आपण किती शोकाकुल झालो आहोत याचे जाहीर प्रदर्शन करण्यापेक्षा त्यांच्या प्रेरणादायी नेतृत्त्वाचे स्मरण

करून भारतीय समाजासमोर चालू घडीला ज्या ज्या विविध समस्या उभ्या राहिल्या आहेत, त्यांचे स्थूल स्वरुप समजावून घेऊन त्यांना तोंड कसे द्यावे, इतकेच नव्हे तर त्यांच्यावर मात कशी करावी याचा विचार करणे आवश्यक आहे.

गेल्या ५० वर्षात भारतामध्ये व जगामध्ये ज्या घडामोडी घडल्या, त्यांचा वरवर जरी विचार केला, तरी हे मान्य करावे लागेल की दुनियेच्या उदयाचलावर येऊन ठेपलेले एकविसावे शतक चालू शतकापेक्षा अगदी वेगळे राहणार आहे. विज्ञाननिष्ठ, वेगवान आणि संकराभिमुख. जेव्हा नामीबिया नामक स्वतंत्र व सार्वभौम असे काळे राष्ट्र प्रस्थापित झाले, त्यावेळीच एक प्रकारे जगामधल्या साम्राज्यशाही युगाचा अस्त झाल्याचा अंतिम संकेत जणू जगाला मिळाला. वास्को-द-गामा कोचीनच्या किनाऱ्यावर १४९८ साली उतरला, तेव्हापासून पाश्चात्त्य राष्ट्रांचा साम्राज्यवाद सुरू झाला, असे म्हटले तर आज तो पाचशे वर्षांनी समाप्त होत आहे, असे म्हणता येईल. या अभूतपूर्व साम्राज्यशाहीच्या अंतास सुरुवात झाली, ती १९४७ साली भारत स्वतंत्र झाला तेव्हापासून. म्हणजे जवळजवळ साडेचारशे वर्षे पाश्चात्त्य राष्ट्रांच्या साम्राज्यशाहीची जी कमान सतत वाढत होती, ती ढासळावयास भारताच्या स्वातंत्र्यापासून प्रारंभ होऊन अवघ्या ४३ वर्षांत त्या साम्राज्यशाहीचा विश्वव्यापी इमला पार ढासळून गेलेला दिसतो. परंतु या काळात एवढेच घडलेले आहे असे मात्र नाही. गेल्या १०० वर्षांमध्ये राजकीय आणि त्याचबरोबर वैचारिक क्षेत्रात जी परिवर्तने घडलेली आहेत, ती कमी आश्चर्यकारक आहेत असे म्हणता येणार नाही. १०० वर्षांपूर्वीचे चित्र डोळ्यांसमोर आणले तर भांडवलशाही समाजव्यवस्थेत अत्यंत पुढारलेल्या समजल्या जाणाऱ्या ब्रिटिश साम्राज्यात भांडवलशाही विचारांचा जो अप्रतिहत प्रभाव होता, त्याला पहिल्या महायुद्धामध्ये जबरदस्त तडा जाऊन १९१७ मधील बोल्शेविक कम्युनिस्ट क्रांतीने तर तिच्यावर मर्मांतिक प्रहार केला. त्यानंतरच्या ६० वर्षांत सर्व जगभर कम्युनिस्ट विचारसरणीला देखील झपाट्याने ओहोटी लागली असून तिची जागा ज्या नव्या व्यवस्था घेत आहेत, त्यांचे चेहरे अद्यापि स्पष्टपणे रेखले गेलेले नाहीत. पूर्णपणे भांडवलशाही नाही आणि पूर्णपणे कम्युनिस्ट एकाधिकारशाहीही नाही असे त्यांचे स्थूलमानाने वर्णन करता येईल. 'लोकशाही समाजवाद' अशा संयुक्त नावाने त्यांचे अस्पष्ट स्वरूप सूचित करता येईल. पुढील दहा वीस वर्षात त्याला कोणताही आकार प्राप्त होवो, एवढे निश्चित म्हणता येईल की, भांडवलशाहीने 'पुष्कळांचे पुष्कळ सुख' असे आपले जे घोषवाक्य बनविले होते ते ज्याप्रमाणे निष्फळ ठरलेले आहे, त्याचप्रमाणे कामगारांच्या अधिसत्तेमुळे वर्गरहित व शोषणरहित समाज स्थापन करण्याची कम्युनिस्टांची प्रतिज्ञाही निरर्थक ठरलेली आहे.

या दोन्हीही विचारसरणींपासून अगदी वेगळा असा जो गांधीप्रणित सर्वोदयवाद होता, तो तर कोणत्याही देशाने प्रयोगावस्थेतसुद्धा आणलेला नाही. अशा परिस्थितीत त्याचा श्रेष्ठपणा अथवा फोलपणा सिद्ध झाला आहे, असे म्हणण्याचे धाडस मला करवत नाही. त्यामध्ये खूपसे काही स्वीकरणीय आहे, असे मात्र मला ठामपणे वाटते.

ते कसेही असो, हे निरनिराळे वाद किंवा या जीवनदृष्टी मुळातच निरर्थक होत्या, असे मात्र मला म्हणावेसे वाटत नाही. आपण सुखी रहावे ही जशी माणसामधील एक मूलप्रेरणा आहे, तशीच सर्वांनी सुखी रहावे हीदेखील त्याच्या मनातली एक मूलप्रेरणाच समजली पाहिजे. 'सर्वेऽपि सुखिनः सन्तु, सर्वे सन्तु निरामयाः। सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखमाप्नुयात्।।' या आप्त वाक्यात विश्वकुटुंबाची जी कल्पना शब्दबद्ध केलेली दिसते, ती साकार करण्यासाठीच मानवाची अखंड धडपड चालू आहे, असे मी मानतो आणि ज्या वादांचा आताच मी उल्लेख केला, ते सर्व वाद आपापल्या परीने सर्वकल्याण साधण्याचे प्रयोग करीत होते; आणि ते जरी फसले असले तरी मानवाच्या अखंड वाटचालीत त्यांनी महत्त्वाचे टप्पे निर्माण केलेले आहेत, याबद्दल शंका असू नये. 'मंझिल आणि मार्ग ' यांच्यातला भेद मात्र आपण लक्षात ठेवला पाहिजे. सर्वांचे सुख हा जरी अखेरचा मुक्काम असला, तरी त्या मुक्कामापर्यंत पोचण्याचे विविध मार्ग मानवाने आत्तापर्यंत वापरून पाहिलेले आहेत. त्यापासून काही बोध घेता येईल का, याचा आपल्याला या निमित्ताने विचार करावयास हवा. हा बोध घेताना आणखी एक विचार डोळ्यांसमोर ठेवावयाला हवा तो असा की, विश्वकुटुंबाच्या कल्पनेपर्यंतची झेप आपण एकदम घेऊ शकणार नाही. ती कल्पना डोक्यात सदैव असू द्यावी, परंतु आज तरी परिस्थिती अशी दिसते की राष्ट्रैक्यासह लोकशाही संकल्पनेला जरी आपण साकार करू शकलो, तरीदेखील आपण पुष्कळ साध्य केले, असे मानण्याची या पिढीने तरी तयारी ठेवली पाहिजे.

आज तर परिस्थिती अशी आहे की, आपल्या देशामध्ये राष्ट्रैक्याच्या कल्पनेलाच तडा जातो की काय, अशी साशंकता निर्माण झालेली आहे. ज्या थोर राजकारणधुरीणांनी किंवा समाजधुरीणांनी अठरापगड जाती-जमाती-धर्म-भाषा आणि परंपरा असलेल्या या समाजाला एका राष्ट्राच्या कवेमध्ये सामावून घेण्याचे

अनुक्रमणिका

ध्येय उराशी बाळगले आणि ते साकार करण्यासाठी वेळप्रसंगी ज्यांनी आत्मबलिदान करण्यासही कमी केले नाही, त्यांचे हे ध्येय वास्तवतेच्या प्रखर उजेडात विरून जाण्याचे स्वप्न ठरते की काय, अशी परिस्थिती निर्माण झालेली आपण पाहतो आहोत. एकविसाव्या शतकातील मस्तक आणि चौदाव्या पंधराव्या शतकातील देह यांचा सांधा जमविण्याचे हे खडतर आव्हान आपण १९५० च्या संविधानाने स्वीकारले आहे. हे आव्हान आपण जोपर्यंत पेललेले नाही, तोपर्यंत विश्वबंधुत्वाच्या कल्पना या केवळ वल्गनाच ठरतील. अशा अवास्तव अथवा निरर्थक कल्पना करण्याची आमच्या भारतीय मनाला जुनी खोड आहे हे आपण विसरता कामा नये. ' यत्र विश्व भवति एकनीडम्' असे उद्गार ज्या या भारतभूमीतून निघाले, त्याच भूमीत 'अमंगल भेदाभेदांचे' तण आज हजारो वर्षे जसेच्या तसे राहिलेले आहे. हे कशाचे द्योतक म्हणावयाचे? माणसा-माणसांमधील अत्यंत उग्र अशी उच्चनीच्चता, समाजामधील स्त्रियांचे नगण्य स्थान, संपत्तीची कमालीची विषम वाटणी इत्यादी गोष्टींना कर्मविपाकाच्या सिद्धांताचा आणि ईश्वरी संकेताचा आधार देऊन आपल्या पूर्वजांनी त्यांच्यातील अपरिवर्तनीयता पक्की करून टाकलेली होती. असली चिरेबंदी रचना लोकशाही समाजवाद तर सोडाच, परंतु परंपरागत साधी लोकशाही स्थापन करण्याच्या मार्गातीलसुद्धा धोंड ठरू शकते.

परंतु या मूलधर्मवादी, पुराणमतवादी अथवा स्थितिवादी विचारांना केवळ नगण्य लेखून अथवा शिव्याशाप देऊन लोकशाहीचा किंवा समाजवादाचा मार्ग मोकळा होईल, अशी आपण जर कल्पना केली, तर ती फोल ठरेल. त्याचे सरळ साधे कारण असे आहे की, बंधमुक्त होण्याची प्रेरणा माणसाची जशी एक सहजप्रेरणा आहे, तशीच श्रेष्ठत्व गाजवण्याची, दुसऱ्याला क्लेश देण्याची माणसांतील प्रवृत्तीदेखील त्याची एक सहजप्रवृत्तीच असते; आणि तीच कधी वंशश्रेष्ठत्वाच्या, कधी वर्णश्रेष्ठत्वाच्या तर कधी धर्मश्रेष्ठत्वाच्या रूपाने प्रकट होते. केव्हा केव्हा तर हे तिन्ही अहंकारांचे पेड एकत्रच प्रकट होताना दिसतात. त्यांचे उत्कट राजकीय-आर्थिक प्रकटीकरण म्हणजेच फॅसिझम किंवा ठोकशाही. कोणी कोणाला ठोकायचे ते देश कालपरत्वे ठरत असते. इतिहासात अशीही विपुल उदाहरणे आढळतात की, जे लोक स्वदेशात पूर्ण लोकशाही मानतात ते आपल्या अंकित असणाऱ्या देशांमध्ये मात्र ठोकशाही मार्गांचा बिनदिक्कत वापर करून त्यांचे एक तत्त्वज्ञानही बनवतात. पॅक्स ब्रिटानिया, पॅक्स अमेरिकाना, कम्युनिस्ट इंटरनॅशनल ही स्वश्रेष्ठत्ववादाचीच बुरखाधारी रूपे होत. भारतामधील इस्लामवादी, खलिस्तानवादी, हिंदुत्ववादी हे सगळे यांचे परंपरेमधील समुदाय आहेत. त्यांची नाळ मनुष्याच्या स्वाभाविक अहंकाराशी जोडलेली असल्यामुळे ते वारंवार सजीव होऊन उठताना दृष्टीस पडतात.

जाती, धर्म, परंपरा यांच्या कुंपणात अडकून राहिलेल्या भारतातील जनांच्या मानसिकतेला भारताच्या सरहद्दींइतके तरी व्यापक बनवावे, इतके जर आपणांस करता आले तरच आगामी काळातील सर्व प्रकारची आव्हाने भारताला एक राष्ट्र म्हणून पेलता येतील, या पोक्त धारणेनेच आपल्या संविधानाच्या शिल्पकारांनी भारताचे संविधान बनविले. त्याच्यामध्ये टिळक ते सुभाषचंद्रां-पर्यंतच्या स्वातंत्र्यवाद्यांच्या आकांक्षा जशा प्रतिबिंबित झालेल्या आहेत, तशाच फुले ते आंबेडकरांपर्यंतच्या सामाजिक परिवर्तनवाद्यांच्या मानवतावादी विचारांचे प्रतिबिंबही शब्दांकित झालेले आहे. विज्ञानयुगीन लोकशाहीचा, परंपरानिष्ठ आणि अंधश्रद्ध अहंकारामुळे विचका होईल याची अनुभवसिद्ध जाणीव त्यांच्या ठिकाणी होती. इंग्रजांचा विजय आणि आपला पराभव कोणत्या समाजव्यवस्थेपायी झाला, याचे मर्म जसे त्यांनी जाणले होते, तसेच त्यांनी हेही ओळखले होते की स्वातंत्र्यपूर्वकाळात ज्या चुका भारताकडून झाल्या, त्यांची पुनरावृत्ती जर आपण करीत बसलो नाही, तर भारतासमोर फार श्रेष्ठ असे भवितव्य साकारेल. बळकट केंद्र असलेले जे लोकशाही संघशासन त्यांनी बनवले, ते इतिहास, वर्तमान आणि भवितव्याविषयी काही सिद्धांत मनात पक्के करूनच बनवले. ते शासन राखण्याची जबाबदारी आता आपल्यावर आलेली आहे आणि ती आपण स्वखुशीने पत्करलेली आहे असे मी समजतो.

साम्राज्यवादामध्ये अंगभूत असलेले दोष भारतामधील ब्रिटिश शासनामध्ये होते हे जरी खरे, तरी चातुर्वर्ण्याधिष्ठित समाजरचनेत शेकडो वर्षे अडकून पडलेल्या भारतीय समाजाला त्यांनी आधुनिक युगातील विविध क्षेत्रांतल्या नव्या विचारांची ओळख करून दिली, यात शंका नाही. त्यामुळे भारतीय समाजाची जी एक लोखंडी चौकट बनलेली होती ती ढिली होऊ लागली, वितळू लागली आणि त्यामध्ये अडकून पडलेली अनेक सामाजिक द्रव्ये मोकळी झाली. ब्रिटिशांच्या सर्वच वसाहतींमध्ये सारख्याच प्रमाणात हा प्रकार घडला असे म्हणता येणार नाही. त्यांच्या आफ्रिकेतल्या अनेक वसाहतींमध्ये असे घडलेले दिसते की, त्या मुक्त झाल्यानंतर नव्या धर्तीची स्वायत्त शासनव्यवस्था प्रस्थापित करण्यासाठी आणि ती चालविण्यासाठी जरूर ते प्रशिक्षित मनुष्यबळच त्यांच्यापाशी







नव्हते. भारतामध्ये मात्र अशा प्रकारच्या मनुष्यबळाची चणचण भासली नाही. त्याबाबत काही गुण सोन्याचा तर काही सोनाराचा असे म्हणता येईल. भारताच्या अनघड सोन्याच्या लडीला राष्ट्रीयत्वाच्या आणि लोकशाहीच्या अलंकारात रुपांतरित करण्याचे श्रेय थोड्याफार अंशाने तरी ब्रिटिशांना द्यावयास हवे. तसा परस्पर्श जर भारतीय समाजाला झाला नसता तर सूरदास, चोखामेळा, जनाबाई असे संत येथे निर्माण होत राहिले असते पण महात्मा फुले, राममोहन रॉय, डॉ. आंबेडकर, आगरकर किंवा पंडिता रमाबाई यांच्यासारख्या विभूती निर्माण झाल्या असत्या की काय, याची मला शंका वाटते. ब्रिटिशांच्या उदार शासनसंकेतांचा आधार घेऊन आम्ही स्वायत्तता मिळवू, अशा अर्थाचे उद्‌गार टिळकांनी काढले होते त्यांची येथे आठवण होते.

हा किंचित दीर्घ वाटेल असा आढावा घेण्याचे कारण असे की पाश्चात्त्य साम्राज्यशाहीशी आपला मुकाबला झाल्यानंतर आणि त्यामध्ये आपला पराभव झाल्यानंतर, गमावलेले स्वराज्य परत मिळवीपर्यंत जो शंभर वर्षांहून अधिक काळ गेला, त्या काळामध्ये आपल्या राजकीय नेत्यांनी व जननेत्यांनी भारताची कुंडली कशाप्रकारे मांडली आणि त्याच्या होष्यमाणाचे चित्र कशा तऱ्हेने रंगवले, हे लक्षात यावे आणि त्या दृष्टीने आपण कार्यकर्त्यांनी कशा प्रकारचे प्रयत्न सातत्याने चालू ठेवले पाहिजेत याचा अंदाज यावा. आपल्याला कमवावयाचे ते पूर्वीचे फुटकळ सरंजामदारी स्वराज्य नव्हे, तर नवे समताधिष्ठित शोषणरहित देशव्यापी संघराज्य, जे भारताने पूर्वी कधीच अनुभवलेले नव्हते.

देश स्वतंत्र होऊन आता चाळिसांहून अधिक वर्षे उलटली आहेत. ब्रिटिशांच्या हाती केंद्रीभूत झालेली सत्ता, स्वातंत्र्यलढ्याची साठ वर्षांची परंपरा ज्या काँग्रेस पक्षाच्या पाठीशी होती तिच्याच हाती पडावी, यात नवल वाटण्याजोगे काही नव्हते. उमेदीच्या पहिल्या वर्षात देशभर निवडुंगाच्या बेटाप्रमाणे पसरलेली पाचशेंहून अधिक संस्थाने विलीन करून टाकणे, सर्व देशाच्या आर्थिक विकासासाठी व्यापक योजनांची मालिका सुरू करणे, औद्योगिक युगासाठी आवश्यक ती यंत्रसामुग्री उपलब्ध करणे, ज्या क्षेत्रात खाजगी उद्योगधंदे पाऊल टाकण्यास धजावत नव्हते, असे उद्योगधंदे शासनामार्फत प्रस्थापित करणे आणि सर्वाधिक महत्त्वाचे म्हणजे इतिहासात प्रथमच एक राष्ट्र म्हणून देश उभा रहावा यासाठी संघराज्याचे संविधान तयार करणे : अशी परमावश्यक कामे काँग्रेसने पार पाडली, यात शंका नाही. पंतप्रधान इंदिराजींनी निर्माण केलेला आणीबाणीसारखा दीडदोन वर्षांचा काळ सोडला तर काँग्रेसने आणि अल्पकालीन जनता पक्षाने लोकशाहीची बूज बऱ्याच अंशी राखली. या चार दशकांच्या काळात उद्योगधंद्यांची, दळणवळणाची, विज्ञानाच्या विविध अंगांची बरीच वाढ झाली, हेही लक्षात येईल. परंतु त्याचबरोबर, सात योजना पार पडूनसुद्धा व अन्नवस्त्राच्या बाबतीत देश जवळजवळ स्वावलंबी झाल्याचे दृश्य दिसत असतानासुद्धा राष्ट्रहितासाठी नितांत आवश्यक असे जनमानस अद्याप तयार झालेले नाही; आणि भारतामधील सुमारे ७० टक्के जनतेचे प्रश्न तसेच दुर्लक्षित पडलेले आहेत, हेसुद्धा कबूल केले पाहिजे. रोजगार, शिक्षण, आरोग्य, पर्यावरण, स्त्रीमुक्ती, दास्यविमोचन, अंधश्रद्धा आणि रुढींची कुंपणे अशा एक ना शेकडो समस्या जशाच्या तशा असल्याचे आपण सभोवार दृष्टी टाकली तर आपल्याला दिसून येतील. एकीकडे राष्ट्रीय एकात्मतेची भाषा बोलली जात असते तर दुसरीकडे मूलधर्मवादाचा उद्‌घोष चाललेला असतो. एकीकडे स्त्रीमुक्ती चळवळी चालू असलेल्या दिसतात तर दुसरीकडे हुंडाबळी आणि पाशवी बलात्कार अशा घटना घडतात. एकीकडे फुले-आंबेडकरांचा जयजयकार चालू असताना दुसरीकडे दलितांना पायाखाली तुडवल्याचे वृत्त कानांवर येते. एकीकडे वृक्षसंवर्धनाची स्वप्ने रंगवली जातात तर दुसरीकडे बेगुमान वृक्षतोड चालल्याचे दृश्य आपण पाहतो. एकविसाव्या शतकात मोठ्या उमेदीने पाऊल टाकण्याची प्रतिज्ञा आपण करतो; पण त्याचबरोबर तज्ज्ञ मंडळी आपल्याला बजावतात की भारतात लौकरच अमर्याद लोकसंख्यावाढीमुळे आणि पर्यावरणाच्या प्रदूषणामुळे दारुण परिस्थिती निर्माण होण्याचा धोका आहे. मोठमोठी धरणे बांधण्याचे संकल्प चालू असतानाच, बांधून झालेल्या धरणांचे पाणी वारेमाप वापरले जात आहे आणि हजारो एकर जमिनी खारवट बनून निकामी होत आहेत. 'वैज्ञानिक मनोवृत्ती' बद्दल आग्रह चालू असताना समाजामध्ये पुराणमतवाद बोकाळत असून महंत-भगवंत, ज्योतिषी, भानामती यांचे प्रस्थ वाढत आहे. जातीपातींची कुंपणे आणि धर्मवादाच्या विषवल्ली तोडण्याचे प्रयत्न नेटाने होण्याऐवजी त्यांना नवे बळ प्राप्त करून दिले जात आहे. संपत्तीचे केंद्रीकरण झपाट्याने चालू असून पैसा म्हणजे सर्व काही-असे समीकरण वेगाने प्रचलित होत आहे.

आपण कार्यकर्त्यांनी या संदर्भात ठामपणे समजून चालले पाहिजे की सर्व लोकशाही मूल्यांना झाकोळून टाकणारी ही रानटी वाढ रोखण्याचे सामर्थ्य राजसत्तेमध्ये आहे असे जर आपण मानीत असू, तर ती फार मोठी चूक होईल. ज्या तऱ्हेचे समाजपरिवर्तन



अनुक्रमणिका

आपणाला नव्या भारतामध्ये हवे आहे, ते मुख्यत्वेकरून राजसत्ता करणार नसून जागृत जनतेकडूनच ते होणार आहे. पुरेशी जनजागृती आणि जनसंघटनेवाचून केलेले कायदे हे फक्त कायद्याच्या पुस्तकात पडून राहतात आणि सत्ता वा शासन केवळ शब्दांचे बुडबुडे उडवण्यात समाधान मानीत राहाते.

स्वातंत्र्योत्तर भारतामधील गेल्या उण्यापुऱ्या अर्ध-शतकातील यंत्राधारित किंवा तंत्राधारित विकासाचा वेग आणि जनमानसाच्या परिवर्तनाचा वेग व्यस्त राहिल्या कारणाने देशामधील अनेक समस्या निर्माण झालेल्या आहेत. उदा. औद्योगिक आणि कृषीविषयक विकासातून निर्माण होणारी धनराशी सर्व समाजावर पसरली न गेल्या कारणाने, समाजाच्या एका टोकाला डोळे दिपवणारी श्रीमंती तर दुसऱ्या टोकाला असह्य असे दारिद्र्य निर्माण झालेले आपल्याला पाहावे लागते. तसेच सरकार जो खर्च निरनिराळ्या क्षेत्रांमध्ये करते, तेथे काम करणारांची वृत्ती ही केवळ नोकरशाहीची झाल्याकारणाने पैशांची उधळपट्टी होते, परंतु त्या पैशांतून जी अपेक्षित उगवण व्हायला पाहिजे, ती होत नाही. शंभर रुपये एखाद्या क्षेत्रासाठी बाजूला काढले, तर पंधरा रुपयेच खरोखर त्या कामासाठी वापरले जातात; बाकी ८५ टक्के पैसा दुसरीकडेच मुरतो, हा सार्वत्रिक अनुभव आहे, त्यामुळे नवसंपत्तीचा नाश, पाण्याचा नाश, श्रमांचा नाश असे कितीतरी तोटे देशाला सहन करावे लागतात. त्यातच भर म्हणजे परंपरेने चालत आलेल्या भेद भावनांची, अज्ञानाची आणि अंधश्रद्धांची व वैमनस्याची.

देशातील या त्रुटी दूर करण्याचे कार्य शासन अथवा नोकरशाही दूर करू शकत नाही आणि शकणारही नाही. मात्र याचा अर्थ असा नव्हे की, शासनामध्ये कोण आहे वा शासन काय करीत आहे याचा विचार करण्याचेच आपण सोडून द्यावे. सामाजिक जीवनातील व समाजधारणेतील अत्यंत महत्त्वाची शक्ती म्हणजे शासन. ते मतलबी लोकांच्या हातात जाऊ नये याबद्दल आपण दक्ष रहायला हवेच. परंतु त्याचबरोबर त्याच्या मर्यादाही आपल्या लक्षात रहावयास हव्यात. शिक्षण मोफत केले, चांगली पाठ्यपुस्तके उपलब्ध करून दिली, शिक्षकांचा पगार पुरेसा वाढवला, पण जर मनापासून शिकविण्याची आवश्यकताच शिक्षकांना पटली नसेल, तर शिक्षण सुधारणार कसे ? हे एक उदाहरण झाले. दुसरे उदाहरण औद्योगिक किंवा कृषिक्षेत्रांतील देता येईल. त्या क्षेत्रातील कामगारांना जर पुरेशी मजुरी मिळत नसेल तर ती वाढवून मिळण्यासाठी जरूर प्रयत्न व्हावेत. म्हणूनच 'रोजगार हमी' चा पाठपुरावा आपण करीत असतो. पण काम मिळण्याच्या हक्काबरोबरच काम करण्याचे कर्तव्य येते, याची जर जाण नसेल, तर राष्ट्राच्या प्रगतीचा इष्टांक आपण कदापिही गाठू शकणार नाही. अशी अनेक उदाहरणे चौफेर नजर टाकली, तर सहज लक्षात येतील. भ्रष्टाचाराची बाबही अशीच आहे. शासनाने पगारावर मिळणाऱ्या भत्त्याचा मेळ घालून दिला, तरीदेखील कर्मचारी भ्रष्टाचार केल्यावाचून राहत नाही, याचा अर्थ काय समजायचा? समाजात सर्वत्र वाढत चाललेली 'अर्थैक' दृष्टी बदलून कर्तव्यबुद्धीला जर जागे करावयाचे असेल, तर जनतेला सतत जागृतीचे आणि परिवर्तनाच्या दिशेने नेणारे शिक्षण देण्याचे कार्य आपण करावयास हवे. निकोप सत्ताधाऱ्यांची जितकी गरज समाजाला असते, तितकीच निकोप समाजसेवकांची असते. असे समाजसेवक दुर्मिळ होत चालल्याकारणानेच आज सहकारासारख्या संस्थासुद्धा स्वाहाकाराच्या संस्था म्हणून ओळखल्या जात आहेत. विकास म्हणजे केवळ अधिक यंत्रे, अधिक कारखाने नव्हे. विकास म्हणजे कर्तव्य बुद्धीचा विकास, बंधुभावनेचा विकास, स्वच्छ कारभाराचा विकास होय.

सेवावृत्तीने काम करणारे कार्यकर्ते आज अजिबात लोपले आहेत, नव्या पिढीला आदर्श असे काही उरलेच नाहीत, असे मी कधीच म्हणणार नाही. कारण तशी जर खरोखरीच परिस्थिती असेल, तर देशाच्या भवितव्याबद्दल आशाच करावयास नको. सत्ताधाऱ्यांत, शिक्षकांत, नोकरशाहीत आणि कार्यकर्त्यांत आपापल्या क्षेत्राबद्दल इमान ठेवणारे लोक बऱ्याच प्रमाणात अजून आहेत, म्हणूनच देश अजून तग धरून आहे. परंतु या वृत्तीच्या लोकांची पीछेहाट होत आहे की काय अशी शंका मनात येण्याला पुरेशी जागा आहे. काळा पैसा खऱ्या पैशावर जशी मात करताना दिसतो आहे, तशीच लबाडी सच्चाईला खाऊन टाकीत असल्याचा देखावा दिसू लागला आहे. राष्ट्र म्हणून आपण उद्योगी बनत आहोत की कामचुकार ? देशात भ्रातृभाव वाढीस लागला आहे की द्वेषभाव ? देशामध्ये सेवावृत्ती वाढत आहे की स्वार्थ? या प्रश्नांची उत्तरे आपल्याला द्यावीच लागतील.

परिवर्तनवादी किंवा पुरोगामी कार्यकर्त्यांमध्ये मला जो एक दोष आज बऱ्याच वर्षांपासून आढळून येत आहे, तो विस्कळीत-पणाचा दोष आहे. लोकशाहीत जितक्या संख्या जास्त वाढतील तितके लोकशाहीला पोषक वातावरण निर्माण होते, हे जरी खरे असले आणि भरपूर स्वायत्त संस्था हा लोकशाहीचा मोठा आधार असला, तरी त्यांचा परस्परांशी जर काही मेळ नसेल अथवा त्या स्वयंकेंद्रीत बनत असतील तर लोकशाहीवरची आक्रमणे त्यांना







अनुक्रमणिका

एकदिलाने थोपविता येणार नाहीत. रांगोळीचे ठिपके रेषांनी जोडले जातात, त्याचवेळी त्यांतून चित्रकृती निर्माण होते. तेव्हा रांगोळीच्या सुट्या ठिपक्यांप्रमाणे संख्या असून चालणार नाहीत. त्यांना परस्परांशी संलग्न करणारे काही वैचारिक व आचारिक धागे हवेत, असे मला आग्रहाने सांगावेसे वाटते. सत्प्रवृत्तींच्या बरोबर जोपर्यंत संस्थाबलही उभे रहात नाही, तोपर्यंत सत्प्रवृत्तींना संस्थेच्या रेट्यापुढे माघार घ्यावी लागणार हे स्पष्ट आहे.

म्हणून मला असे सुचवावेसे वाटते की, एसेमच्या या स्मृतिदिनाच्या प्रसंगी सर्व कार्यकर्त्यांनी 'संघे शक्तिः युगे कलौ।' या वचनाचा विचार करावा. हा संघ एक नेता, एक विचार अशा स्वरूपाचा असण्याचे कारण नाही. त्याचे स्वरूप 'फेडरल' असले तरी चालेल. परंतु त्यांनी परस्परांना पूरक कामे केली पाहिजेत व आपण भ्रातृसंस्था आहोत असे मनापासून समजले पाहिजे. सर्वोदय मंडळींपासून ते कम्युनिस्टांपर्यंत जे संघ आहेत, जी दले आहेत, त्यांनी एका व्यासपीठावर एकत्र का येऊ नये ? त्यांनी एकत्र का काम करू नये? काही ठरावीक उद्दिष्ट्ये निश्चित करून तेथवर पोहोचेपर्यंत त्यांनी एका मार्गाने संघटितपणे का चालू नये ? ही उद्दिष्ट्ये 'वनराई'सारखी असतील, किंवा अण्णा हजारेंच्या राळेगणशिंदीसारखी असतील; सहकारी उद्योगासारखी असतील, आदर्श शिक्षणसंस्था चालवण्याची असतील किंवा शासनाला निर्भयवृत्तीचे निष्ठावान सेवक उपलब्ध करून देण्याची असतील. प्रामाणिक, कुशल आणि समाजाची बांधिलकी मानणाऱ्या कार्यकर्त्यांची आज सर्वत्र चणचण आहे. ती चणचण दूर करण्याचे काम आपण केले, तर कोठल्याही एका विशिष्ट पक्षाच्या शासनाला आपण मदत करतो, असे न मानता आपण नव्या भारताच्या रचनेला हातभार लावीत आहोत अशी भावना आपल्या सर्वांच्या मनात असावी. हे काम डोंगराएवढे मोठे आहे. ते पुरे करण्यासाठी हजारो डोकी आणि लाखो हात लागणार आहेत.

आजच्या स्मृतिदिनाच्या प्रसंगी राष्ट्रापुढील या प्रचंड समस्येचे भान ठेवून आपण काम करण्यास प्रवृत्त व्हावे, एवढीच इच्छा आहे. त्याचबरोबर भारतामधील सर्व पुरोगामी पक्षांना दलांना विविध क्षेत्रातील विज्ञात्यांना, कलाकारांना आणि समाजसेवकांना एका व्यापक मंचावर एकत्र येण्याचे आणि खऱ्याखुऱ्या अर्थाने नवा भारत घडविण्यासाठी हातभार लावण्याकरता पुढे सरण्याचे नम्र आवाहनही करीत आहे.

◆◆◆

## सांस्कृतिक क्षेत्र

नवनवे संदर्भ लक्षात घेऊन लोकशाही समाजवादाची फेरमांडणी करावी लागेल. राजकारण हा तत्कालिक धर्म आहे तर धर्म हे चिरकालीन राजकारण आहे असे डॉ. राममनोहर लोहिया म्हणत. समाजवादी 'तत्कालिक धर्म' पाळण्यात पटाईत झाले आहेत. शील गमावून बसले आहे. स्वतः डॉ. लोहियांनीच आघाड्यांच्या राजकारणाची तरफदारी केली. भारतीय राजकारणात धर्म-जातीला असाधारण महत्त्व प्राप्त झालेले आहे, ते आघाड्यांच्या राजकारणामुळेच.

माझ्या मते म. फुले, मार्क्स, डॉ. आंबेडकर इत्यादींच्या विचारधारांचा संगम समाजवादाला अभिप्रेत असावा. त्यांतील कडवी मंडळी त्यांना जवळचे मानणार नाहीत; परंतु लोकशाही समाजवादी चळवळ पुढे गेल्याशिवाय राहणार नाही.

धर्मांधता व दहशतवादाने जगात थैमान घातले आहे, जागतिकीकरण, खाजगीकरण, खुलेकरणामुळे देशाच्या अर्थव्यवस्थेचे दिवाळे वाजले आहे. मंडल आयोगामुळे इतर मागासांना राखीव जागांचा कोटा मिळाला असला तरी नोकऱ्याच निर्माण झाल्या नाहीत, तर काय होणार? आपल्यातील यादवी वाढेल. जातिअंतर्गत धुसफूस सुरू राहील. स्त्रियांच्या राखीव जागांचा प्रश्न ऐरणीवर आहे. या सर्व प्रश्नांना सामोरे जावे लागेल. परंतु त्यासाठी ठोस भूमिका आवश्यक आहे. धर्मनिरपेक्ष लोकशाही समाजवादाशिवाय अन्य पर्याय नाही. यासाठी निर्धाराने वाटचाल करावी लागेल.

१९७७ साली समाजवादी पक्ष विसर्जित झाला. नको त्या पक्षाबरोबर त्याचे विलीनीकरण झाले. समाजवादी म्हणवून घेणारी मंडळी आपली चूक ही मनमोकळेपणाने मान्य करीत नाहीत. तळागाळात जाऊन चळवळ वा पक्ष उभा करण्याऐवजी, 'धर्मनिरपेक्ष आघाडी', 'डावी आघाडी' अशा आघाड्यांचे नामस्मरण उच्चरवाने करतात. लोकशाही समाजवादाचा स्वीकार जनमनाने सांस्कृतिक पातळीवर केल्याशिवाय राजकारण यशस्वी होणे शक्य नाही, हे उघडेनागडे सत्य आहे. प्रश्न उरतो सांस्कृतिक पातळीपर्यंत लोकशाही समाजवादी चळवळ नेण्याची जिद्द आहे का? आमच्यासारखी काही मंडळी निष्ठेने वाटचाल करीत आहेत.

**- बाबा आढाव**

(साधना ऑगस्ट २००२)


अनुक्रमणिका






# लोकशाही समाजवादाच्या दिशेने 'पुनश्च हरि ओम्'

देवदत्त दाभोलकर

(नवभारत, एप्रिल १९९८)

रॉबर्ट हाइलब्रोनर हे अर्थव्यवस्थांच्या स्वरूपाविषयी अभ्यास व लेखन करणारे अर्थशास्त्रज्ञ आहेत. त्यांची सुमारे वीस-पंचवीस पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. गालब्रेथ, थरो (Thurow), बर्नस्टाइन आदींच्या सहभागातही त्यांची तीन-चार पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. बिहाइंड द व्हेल ऑफ इकॉनॉमिक्स, मार्क्सिझम : फॉर अँड अगेन्स्ट, ॲन इन्क्वायरी इनटु द ह्यूमन प्रॉस्पेक्ट, बिटवीन कॅपिटॅलिझम अँड सोशालिझम, द फ्युचर ॲज हिस्टरी यासारखी त्यांच्या काही पुस्तकांची शीर्षकेही हाइलब्रोनर यांच्या ट्वेन्टिफर्स्ट सेच्युरी कॅपिटॅलिझम (१९९३) या पुस्तकातील चिंतनाची पार्श्वभूमी म्हणून लक्षात घेण्यासारखी आहेत.

विषय महत्त्वाचा आहे. सार्वत्रिक कुतूहलाचा आहे व आजच्या एकूण परिस्थितीत जागरूक लोकांच्या चिंतनाचा व चिंतेचाही आहे. हाइलब्रोनर कोणत्याही एका निश्चित निष्कर्षाला येऊन पोहोचत नाहीत. प्राप्त परिस्थितीत हे अटळही आहे.

## प्रास्ताविक

एकविसावे शतक जवळ येत आहे यामुळेच हे शीर्षक आपल्या ग्रंथाला द्यावे असे लेखकाला वाटले असणे स्वाभाविक आहे, परंतु याखेरीजही एकदोन युक्त कारणे त्यांनी सांगितली आहेत. विसाव्या शतकात जागतिक स्तरावर आर्थिक व राजकीय क्षेत्रात ज्या घडामोडी झाल्या त्या, प्रचंड भूकंपाचे धक्केच म्हणावे लागेल अशा स्वरूपाच्या होत्या. याचे परिणाम अद्यापही पूर्णपणे स्पष्ट झालेले नाहीत व यानंतरही दीर्घकालपर्यंत त्यांचा प्रभाव जाणवत रहाणार आहे. एकेका पिढीच्या चिंतनाच्या दृष्टीने, दीर्घकाल म्हटले तरी, अतिदूरचा भविष्यकाल आपल्या बुद्धीला पेलणारा नसतो. (असतो असे म्हणेल ती बुद्धीच नव्हे असेही म्हणता येईल. असो.) एका शतकाचे चिंतन - आणि तेही स्थूलमानाने - फारतर आपली बुद्धी करू शकते. या दृष्टीनेच हाइलब्रोनर यांनी एकविसावे शतक ही मर्यादा मानली. तरीही त्यांना मधूनमधून अतिदूर क्षितिजाला स्पर्श करायचा मोह होतो.

शीर्षकातील 'कॅपिटॅलिझम' विषयीही त्यांनी काही खुलासा केला आहे. एक तर, भांडवलशाही रचनेत सर्वात अग्रेसर असलेले आजचे अमेरिका हे राष्ट्र त्यांच्या नजरेसमोर आहे. परंतु त्याचबरोबर (व काहीसे त्याच्या उलटही), त्यांच्या नजरेसमोर एखादी निखळ भांडवलशाही नसून वेगवेगळ्या राष्ट्रात भांडवलशाहीचे होणारे आविष्कारही आहेत असे त्यांनी सांगितले आहे.

प्रश्न निखळ भांडवलशाहीचा नाही तर प्रत्यक्षात तिच्या होणाऱ्या आविष्काराचा आहे. कोठल्याही (अगदी अग्रेसर अशादेखील) राष्ट्रात ती कधी निखळ स्वरूपात अवतीर्ण झाली नाही व आजही तशी अस्तित्वात नाही. स्थलकालपरत्वे तिचे आविष्कार वेगवेगळे झालेले आहेत. यामुळेच विविध राष्ट्रांतील तिच्या संरचनेतही विविध भेद अस्तित्वात आलेले आहेत.

भांडवलशाहीच्या आधीच्या काळात अर्थव्यवस्थेची रचना सरळ सोपी होती. किंबहुना, त्या काळात अर्थशास्त्राची तशी गरजच नव्हती असे हाइलब्रोनर यांचे प्रतिपादन आहे. भांडवलशाही व नंतरचे साम्यवाद - समाजवाद यांच्या आधी आर्थिक व्यवहार कोणत्या पद्धतीने चालत होते? का चालतच नव्हते ? चालत होते, परंतु एकतर ते परंपरानिष्ठ (ट्रॅडिशनॅलिस्ट) समाजव्यवस्थेप्रमाणे चालत होते किंवा एखाद्या अधिसत्तेच्या आदेशाप्रमाणे चालत होते. परंपरागत समाजव्यवस्था अर्थातच प्रत्येक समाजात वेगवेगळी होती. (उदा. भारतात जात आणि व्यवसाय यांचा जोडलेला अभेद्य संबंध) येथे अर्थशास्त्र दुय्यम होते. त्याचप्रमाणे कोणत्याही एखाद्या मध्यवर्ती सत्तेच्या आदेशाखाली असणाऱ्या समाजामध्येही अर्थशास्त्राला विशेष स्थान नव्हते. मग ती सत्ता राजाची असो, उमराववर्गाची असो वा हुकुमशहाची असो. (या संदर्भात साम्यवादाचा निर्देश हाइलब्रोनर यांनी केलेला नाही परंतु द न्यू क्लासमधील जिलास यांची मांडणी मान्य केली तर परिस्थिती तशीच होते.) येथे अर्थव्यवहाराचे स्वरूप सत्ताधीशांच्या स्वार्थासाठी इतरांची शक्य तितकी पिळवणूक इतकेच साधे सरळ सोपे असते.

(या ठिकाणी एक निर्देश करून ठेवणे उचित होईल. आपल्या विवेचनात भारताचा निर्देश लेखक कधीही करत नाही. ते उचितही म्हटले पाहिजे. अविकसित-अर्धविकसित राष्ट्रांच्या समावेशक निर्देशात हा निर्देश गृहीत आहे असे आपण मानावयास

हरकत नाही. माझे या विवेचनाविषयीचे कुतूहल भारतातील परिस्थितीची उकल - निदान आकलन - करण्यात यातून काही सूचना मिळते का हे पाहण्याचे होते. असे सूचन मिळते असे मला अनेक ठिकाणी वाटले.)

अर्थशास्त्र निर्माण झाले आणि मग भांडवलशाही अस्तित्वात आली असे घडले नाही. भांडवलशाही आपल्या क्रमाने आकार घेत गेली आणि मग अर्थशास्त्राला जाग आली. 'उत्तिष्ठत। जागृत।' हे अर्थशास्त्राने ऐकले व त्याप्रमाणे आचरणही केले. 'प्राप्य वरान्निबोधत।' ही पायरी त्याला अद्याप गाठावयाची आहे व कधी गाठता येईल की नाही याविषयी ते स्वत:च साशंक आहे.

### भांडवलशाही परिप्रेक्ष्य

भांडवलशाही आली आणि सर्व परिप्रेक्ष्यच बदलले. मर्चंट कॅपिटॅलिझम, इंडस्ट्रियल कॅपिटॅलिझम, फिनान्स कॅपिटॅलिझम, सेकंड वेव्ह, थर्ड वेव्ह, गन-बोट इंपीरिॲलिझम, वर्ल्ड इकॉनॉमिक इन्स्टिट्यूशन्स अशी अनेक रूपे तिने घेतली व आजही नवनवीन रूपे ती धारण करीत आहे. 'मार्केट इकॉनॉमी' हा तर आज परवलीचा शब्द झाला आहे. साम्यवादाचा जवळजवळ अस्त झाला असे समजावे इतक्या प्रमाणात त्याची पीछेहाट झाली. 'समाजवाद हा आजचा युगधर्म आहे' असे लिहिणाऱ्या माझ्यासारख्यांची तर केविलवाणी अवस्था झाली. (आजही मी समाजवाद हा युगधर्म आहे असे मानतो म्हटले तर ऐकणारे मनातल्या मनात माझ्याविषयी कीव करतात इतकेच.) या पुस्तकाने मला पूर्ण दिलासा दिला असे नसले तरी चिंतनाच्या क्षेत्रात तरी खूपच समस्यांना अजूनही सामारे जाणे आवश्यक व शक्य आहे याचे भान आले.

आजची स्थिती काय आहे ? जगातील पाचषष्ठांश लोकसंख्या अविकसित व अर्धविकसित राष्ट्रांत आहे. जगातील पाचषष्ठांश धन मात्र उरलेल्या एकषष्ठांश लोकांकडे आहे. 'तुमची लोकसंख्या वाढली तर आम्हाला जबाबदार का धरता?' असा आडवा प्रश्न कोणी विचारला तर त्याचे सरळ उत्तर हे आहे की, 'आम्ही तुम्हाला जबाबदार धरत नाही, परंतु भांडवलशाही प्रक्रियेला धरतो.' एका विशिष्ट कालखंडातील परिस्थितीत तुमचा उदय झाला. तुमचे जीवनमान वाढले; आणि जीवनमान वाढले की कुटुंबनियोजन वेग घेते हा सार्वत्रिक अनुभव आहे. अप्रगत राष्ट्रांतही वरिष्ठ वर्गांच्या बाबत तो येत असतो. याउलट, आम्ही मागे राहिलो ते राहिलोच; वर लोकसंख्येवर नियंत्रण आणणारे सर्वश्रेष्ठ साधन - जीवनमानात मध्यमवर्गीय राहणी इतका सुधार - हे आम्हाला उपलब्धच होऊ शकले नाही. नव्या प्रभावी औषधांच्या संशोधनामुळे सरासरी आयुर्मर्यादा मात्र वाढली. हाइलब्रोनर यांनी याचा ओझरता निर्देश केला आहे.

भांडवलशाहीची आजची प्रगततम स्थिती केवळ थक्क करणारी नाही; ती भयप्रद आहे. 'Capitalism has no conscience and no country' (भांडवलशाहीला सर्व देश सारखेच आणि ती नीती-अनीतीचा मुलाहिजा बाळगीत नाही.') असे बर्नार्ड शॉ सुमारे पाऊणशे वर्षांपूर्वी म्हणाला होता. 'कॉंशन्स' चा भाग आपण येथे बाजूला ठेवू. परंतु 'कंट्री' हा निर्देश मात्र उत्तरोत्तर वस्तुस्थितीला अधिकाधिक धरून होत आहे. आंतरराष्ट्रीय कंपन्यांच्या हातात जगाची आर्थिक सूत्रे गेली आहेत. युनायटेड नेशन्स सेंटर ऑन ट्रान्सनॅशनल कॉर्पोरेशन्सच्या अभ्यासाप्रमाणे जगातील तीनशे पन्नास अशा कंपन्यांची १९८५ मधील विक्री सर्व औद्योगिक प्रगत राष्ट्रांच्या राष्ट्रीय उत्पन्नाच्या जवळजवळ एक-तृतियांश इतकी होती व ती जगातील इतर सर्व विकसनशील राष्ट्रांच्या (यात चीनचाही समावेश आहे) एकूण राष्ट्रीय उत्पन्नापेक्षाही अधिक होती. प्रश्नाचे स्वरूप केवढे प्रचंड आहे हे यावरून लक्षात येऊ शकते. या व्यवहारात आणि आंतरराष्ट्रीय व्यापारात फरक आहे. या कंपन्या केवळ तयार माल निर्यात करीत नाहीत तर दुसऱ्या राष्ट्रांतच कारखाने उभारून तेथील कामगारवर्गाला कमी पगार देऊन व तेथे प्रदूषण पसरवून उत्पादन करीत असतात. त्या कंपन्यांची मूळ सरकारेही अनेकदा हतबल होतात. हॉलंड, बेल्जम यासारख्या छोट्या राष्ट्रांची गोष्ट तर सोडाच, परंतु अमेरिकेसारखे राष्ट्रही या कंपन्यांच्या राजकीय प्रभावाच्या दबावगटांपुढे नमते घेते.

### हे सर्व कुठून आले ? कुठे जाणार ?

आजवर हे कसे घडत आले याचा धावता आढावा हाइलब्रोनर घेतात. त्यामागील विचारधारेचाही घेतात. ॲडॅम स्मिथ, मार्क्स, केन्स व शूम्पीटर हे त्यांचे या सिंहावलोकनातील चार टप्पे आहेत.

स्पर्धा, खुली बाजारपेठ ही भांडवलशाहीच्या गतिचक्राची प्रेरणा आहे. हे गतिचक्र अधिक उत्पादन देते परंतु मजुरांना पिळूनही काढते. कोण बेकार होतात याची खंत करीत नाही. स्पर्धकांतलेच किती बळी जात आहेत याचीही चिंता करीत नाही. स्पर्धा तिची प्रेरणा असते; परंतु मक्तेदारीकडे तिचा कल असतो. साम्राज्यशाही आक्रमणाला तिचा विरोध नसतो; इतकेच नव्हे तर विशिष्ट

कालखंडात ती तिची अपरिहार्य गरज असते. आर्थिक लाभाखेरीज इतर मूल्यांची तिला कदर नसते. गॉड अँड मॅमन यामध्ये मॅमन (पैसा) ची पूजा करावयाची हा निर्णय तिने घेतलेला असतो. असे सारे असूनही मधूनमधून गतिचक्र अचानक बंद पडते. मग, हे सगळे मी आधीच सांगितले होते, असे एखादा स्मिथ म्हणतो; या यंत्राची प्रेरणा आणि गिअर्स साफ बदलले पाहिजेत असे एखादा मार्क्स सांगतो; वंगण घालून काही डागडुजी करून हे दुरुस्त होऊ शकते म्हणून एखादा केन्स पुढे सरसावतो किंवा काही सांस्कृतिक दुसरा मार्ग दिसतो का पाहू या विचारात शुम्पीटर पडतो.

हा सारा व्याप-संतापच नको, परत आपले प्राचीन काळाप्रमाणे सुखात राहू हा पर्यायही उपलब्ध नाही. एकतर अपरिवर्तनीय असा हा बदल आहे; आणि दुसरे म्हणजे प्राचीन काळ सुखाचा होता हा एक आभासच आहे.

आहे या स्थितीतून पुढे कसे जावयाचे हा प्रश्न आहे. या प्रश्नाचाच विचार हाइलब्रोनर करतात. आपल्याकडे निश्चित उत्तर नाही असे ते प्रामाणिकपणे सांगतात. (कोणाकडेच ते नाही असे ते म्हणत नाहीत हा त्यांचा नम्रपणा मानावा.)

त्यांनी मांडलेल्या विचारांपैकी केवळ दोन ठळक विचार आपण पाहू.

## शासन आणि अर्थव्यवस्था

मुक्त अर्थव्यवस्था हे प्राणभूत तत्त्व मानले की, शासनाला एकतर पूर्णपणे निष्कासित केले पाहिजे किंवा अगदी कोपऱ्यात नेऊन बसवले पाहिजे असे अनेक वरवरचा विचार करणारे लोक मानतात. हाइलब्रोनर यांची अर्थातच तशी भूमिका नाही. शासनाचा आधार आवश्यक आहे व तो असावयास हवा अशीच त्यांची भूमिका आहे. किंबहुना, भांडवलशाहीच्या विकासाच्या कालखंडात अमेरिकेतही असा आधार उपलब्ध होता आणि आजही अनेक क्षेत्रांत तेथे शासकीय मार्गदर्शन, हस्तक्षेप अस्तित्वात आहे. इतर राष्ट्रांतही साहजिकच कमी-अधिक प्रमाणात अशी परिस्थिती अस्तित्वात आहे. त्यामुळे 'असावा किंवा नसावा' अशा तुकडा पाडणाऱ्या स्वरूपात या प्रश्नाचा विचार न करता, केव्हा, कुठे, कसा, किती प्रमाणात असावा?' अशा स्वरूपात त्या प्रश्नाच्या चर्चेत शिरावे लागेल. ही चर्चा कदाचित आपल्याला मर्यादित स्वरूपाच्या नियोजनाकडे घेऊन जाईल असेही त्यांनी सुचविले आहे. मागे म्हटले त्याप्रमाणे, त्यांनी कुठेही भारताचा निर्देश केलेला नाही व 'मिक्स्ड इकॉनॉमी' (मिश्र अर्थव्यवस्था) असा शब्दप्रयोगही केलेला नाही. परंतु त्यांचे हे विवेचन भारतीय परिस्थितीला पुरेपूर लागू पडते. भारत अडचणीत आला त्याचे कारण चुकीची विचारधारा हे नसून त्या विचारधारेच्या अनुषंगाने युक्त कृती करावयाची आपली अक्षमता हे होते. या अक्षमतेचे वाटेकरी आपले नेते, आपले राजकीय पक्ष, नोकरशाही, भांडवलदार, संघटित वर्ग, विचारवंत, मतदान करणारी जनता असे आपण सर्वच आहोत. मिश्र अर्थव्यवस्थेच्या मार्गाने समृद्धी व समता भारताने साध्य करून दाखविली तर अणुशक्तीच्या शोधापेक्षाही एक महत्त्वाचा प्रयोग जगाच्या मार्गदर्शनासाठी आपण सिद्ध केला असे होईल, अशी माझी मांडणी मी अनेक दशके करीत आलो आहे. यामुळे हाइलब्रोनर यांच्या मांडणीमुळे मला प्रथम थोडे बरे वाटले परंतु त्यांच्या इतर विवेचनानंतर माझा भाबडेपणाही माझ्या लक्षात आला.

प्रत्येक राष्ट्राची स्वतंत्र सांस्कृतिक प्रकृती ही त्या राष्ट्रातील भांडवलशाहीलादेखील एकेक स्वतंत्र आकार देते या हाइलब्रोनर यांच्या विधानांच्या संदर्भात मी हे म्हणत नाही. 'संस्कृतीप्रकृती'च्या जागी 'राष्ट्रीय शील' असाही निर्देश केला जातो आणि जपान, जर्मनी आदि राष्ट्रांचा निर्देश केला जातो. याविषयीही चर्चा होऊ शकते. परंतु तीही या ठिकाणी अभिप्रेत नाही.

मग अभिप्रेत तरी काय आहे ?

मानवाच्या मूलभूत मानसिक प्रकृतीत परिवर्तन घडवून आणणे आवश्यक आहे हे अभिप्रेत आहे.

## मानवाची मूलभूत प्रेरणा

आपले संरक्षण करावे, आपले भौतिक जीवन अधिक सुखी करावे या मानवाच्या, किंबहुना सर्वच जीवमात्रांच्या, मूलभूत प्रेरणा आहेत. युगायुगांच्या विकासक्रमात त्या दृढमूल झालेल्या आहेत. सारे रान मोकळे असेल व स्वतःचे संरक्षण करण्याची खात्री असेल, तर दुसऱ्याकडून मिळेल तितके शक्य त्या पद्धतीने हिसकावून घ्यावे हे कोणाला शिकवावे लागत नाही. तो कल उपजतच असतो. ही जन्मजात वृत्ती इतर प्राणिमात्रात असते त्याप्रमाणे मानवातही असते. इतर प्राण्यात कोणीच संत नसतात, मानवात निदान काही संत असतात एवढाच फरक. प्रत्येक मानवात निदान काही प्रमाणात व काही मर्यादित वर्तुळात यावर मात करून काही काळ सत्प्रवृत्ती जागृत होऊ शकतात हे माणसाने पशुवृत्तीच्या वर जाऊन आजवर मिळवलेले सामूहिक 'माणूस'पण.

अर्थव्यवस्थेच्या क्षेत्रातही हे स्पष्टपणे दिसते. खुली बाजारव्यवस्था याला पूर्ण वाव देते. 'खुला बाजार' हा ईश्वराचा




अदृश्य हात आहे. तो हात कोणत्या दिशेने अधिक लाभ आहे हे अखंड दाखवत असतो. त्या त्या दिशांनी मग सगळी धावपळ नैसर्गिक प्रेरणेने सुरू होते. आडवा आला त्याला पाडला, मागे पडला तो संपला, अशी ही रणधुमाळी असते. पडलेले नाहीसे होतात किंवा बाजूला फेकले जातात. इतर त्यांना विसरून जातात. 'जात्यात भरडले जातात ते रडतात, बाहेर असतात ते हसतात,' याचे भान बाहेर हसणाऱ्यांना राहत नाही व भान येते तेव्हा फार उशीर झालेला असतो.

मग यातच काहीजण गट करतात, गटबांधणी करतात. वर्ग निर्माण करतात. वर्गसंघर्ष होतो इत्यादी. मार्क्सने बिचाऱ्याने हे सर्व सांगितले आहे आणि इतर अर्थशास्त्रज्ञांनाही हे माहीत नव्हते असे नाही.

यातूनच त्या त्या घडीच्या जेत्यांची समृद्धी निर्माण होते परंतु, Where are those that sank ? जे भरडले गेले व नाहीसे झाले त्यांचे काय - हा प्रश्नच कोणी विचारत नाही. जेत्यांना तो अडचणीचा वाटतो. जित तर नष्टच झालेले असतात.

हे असे होता कामा नये व मानवमात्र खऱ्या अर्थाने सुखी होईल असा मार्ग यातून काढला पाहिजे ही सर्वच विचारवंतांची धारणा होती. यात मार्क्सचा समावेश न करणे त्याला अन्यायाचे ठरेल.

वरील वाक्यात 'खऱ्या अर्थाने' असा एक शब्दप्रयोग आलेला आहे. जीवमात्राची प्रेरणा स्वार्थ आहे. मानवतेच्या पायरीवर, मानवाची किमान प्रेरणा, आपला स्वार्थ योग्य प्रकारे सांभाळत का होईना परंतु काही किमान परार्थ साधनाही आपण केली पाहिजे, अशी असावयास हवी.

परमार्थ साधनेचा, मोक्षाचा, मुक्तीचा निर्देश आपण वर केला नाही. परंतु हाइलब्रोनर यांच्या पुस्तकात त्यांनी दिलेल्या एका अवतरणात (पृ. १५८) अध्यात्माचा आधार न घेताही एक आदर्श रंगवला आहे. ते चित्र हाइलब्रोनर यांना मान्य असावे असे दिसते. मला तरी ते अत्यंत युक्त वाटते. ते असे.

"The liberated man is the generous and disinterested man; he is also a creative man, who can express his personality and talents in creative action without constraint, whether in manual, intellectual, or artistic work, or in his relations to other men... He is an individual without idols, dogmas, prejudices or a priori ideas. He is tolerant, inspired by a profound sense of justice and equality, and aware of himself as being at the same time an individual and a universal man.' (पृ. १५८)

("उदार व अनासक्त माणूस म्हणजे मुक्त माणूस. तोच सर्जनशील माणूस. हस्तकौशल्याच्या, बौद्धिक वा कलात्मक कृतीद्वारा या इतर मानवांबरोबरील संबंधांद्वारा, कोणतेही बंधन न घालून घेता केलेल्या सर्जक कृतीद्वारे स्वतःचे व्यक्तित्व व गुणसंपदा अभिव्यक्त करू शकणारा सर्जनशील माणूस. या माणसाच्या मनात दैवते नसतात, दगडावरील रेघ या स्वरूपाचे सिद्धांत नसतात, पूर्वग्रह नसतात वा अनादि कल्पना नसतात. असा माणूस सहिष्णू व क्षमाशील असतो, समत्व व न्यायबुद्धीने प्रेरित असतो आणि एकाच वेळी आपण एक स्थलकालबद्ध विशिष्ट व्यक्ती असूनही विश्वमानव आहोत याचे भानही त्याच्या ठायी असते.")

**गांधीजी ?**

असो. आपण कोठून निघालो आणि कोठे येऊन पोहोचलो. आपणच नव्हे तर हाइलब्रोनरही. हा सगळा प्रांत गांधीजींचा वारसा आहे. हे हाइलब्रोनरना तर माहीतही नाही असे त्यांच्या मांडणीवरून जाणवते. एरवी, जॉन स्टुअर्ट मिलचे विषमतेचे समर्थन करणारे वचन उद्धृत केल्यानंतर तरी, त्यांना उलट टोकाची म्हणून, गांधीजींची आठवण झाली असती, मिल म्हणाला होता: 'while minds are coarse, they require coarse stimuli, and let them have them.' (तामस वृत्तीच्या मनांना प्रेरणाही तामसी आवश्यक असतात. तर त्यांना त्यांचा लाभ घेऊ द्यावा.')

'नर करणी करे तो'- ही गांधीजींची प्रेरणा होती. तो आशावाद होता की भ्रम होता ?

कोणास ठाऊक. परंतु गांधीजी सहस्र वर्षांच्या पार आपली दृष्टी स्थिर करू शकत होते. आपल्याला आजच्या जगात जगावयाचे आहे, आणि फार तर उद्यापुरताच विचार करण्याची आपली कुवत आहे.

**लोकशाही समाजवाद**

'लोकशाही समाजवाद' असा शब्दप्रयोग हाइलब्रोनर यांनी केलेला नाही. परंतु त्यांच्या विवेचनाचा मुख्य गाभा त्याच दिशेचा आहे. विविध भांडवलशाह्यांच्या गुणवत्तेच्या तरतम निकषावर त्यांनी स्वीडनच्या अर्थव्यवस्थेला सर्वांत प्रगत ठरवले आहे. कारण भांडवलशाही आणि समाजवाद यांचा सुवर्णमध्य त्या अर्थव्यवस्थेने जवळजवळ साध्य केला आहे. स्वित्झर्लंडचेही शांतता रक्षणाचे

स्वतःचे असे एक विशेष श्रेय आहे. परंतु या दोन्ही राष्ट्रांची विशिष्ट परिस्थिती वेगळी आहे याचे हाइलब्रोनर यांना भान आहे. इतर राष्ट्रांना आपापल्या परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर त्या दिशेने कसे जाता येईल याचे नेमके उत्तर त्यांच्याकडे नाही. परंतु सर्वांचे अंतिम ध्येय त्या दिशेचे असावे अशीच त्यांची धारणा दिसते.

यासाठी आपल्याला परिचित असलेली संज्ञा 'लोकशाही समाजवाद' ही आहे. स्वातंत्र्य, समता आणि बंधुता ही त्रयीच अशी समाजव्यवस्था निर्माण करू शकते व टिकवू शकते. यापैकी व्यक्तिस्वातंत्र्य हे केवळ भांडवलशाहीतच उपलब्ध होण्याची शक्यता आहे अशी हाइलब्रोनर यांची भूमिका आहे. परंपराग्रस्त समाजात व्यक्तीला बहिष्कृत करण्याचा धाक दाखवून व्यक्तिस्वातंत्र्य दडपले जाते. सर्वंकष हुकुमशाहीत व कडव्या साम्यवादात उपजीविकेची स्वतंत्र साधनेच नसतात व त्यामुळेही व्यक्तीला समाजापुढे शरण जावे लागते. भांडवलशाहीत व मिश्र अर्थव्यवस्थेतही उपजीविकेसाठी व्यक्तीला स्वतंत्र काही क्षेत्रे उपलब्ध असतात. जितक्या प्रमाणात समता अधिक अस्तित्वात असेल तितक्या प्रमाणात हे स्वातंत्र्य सामान्य जनतेला अधिक प्रभावीपणे उपभोगता येईल. समृद्धी साधत साधत हे करावयाचे आहे. यासाठी इतर काही रचना करावी लागेल परंतु त्या सर्व रचनेचा पाया आज समाजात प्रतिष्ठित असलेल्या वरिष्ठ वर्गाला व मध्यमवर्गालाही, धक्का लावल्याखेरीज रचता येणार नाही व तसा धक्का बसतो असे समजले तर ते वर्ग संघटित प्रतिकार केल्याखेरीज रहाणार नाहीत. असा हा तिढा आहे. याचा निर्देश हाइलब्रोनर यांनी केला आहे. याचा अनुभव आज आपण भारतात घेत आहोत व हताशपणे जगतही आहोत.

परंतु हे आपण आज केले नाही तर देशातील शांतता आणि सुव्यवस्थाच धोक्यात येईल याचेही भान - आज भारतात याचा प्रत्यक्ष अनुभव येत असूनही - या वर्गांना येत नाही. स्वतःच्या सुरक्षिततेसाठी व उद्याच्या एकूण राष्ट्रीय अधिक उन्नत स्वार्थासाठीही ही दृष्टी त्या वर्गांनी स्वीकारली पाहिजे. दुर्दैवाने, शतकाचे तर सोडाच, परंतु आपल्या आजच्या पिढीच्या प्रत्यक्ष स्वार्थापलीकडे कोणाची दृष्टी जात नाही.

अशा ठिकाणी बंधुतेची प्रेरणा काही वाटचाल करावयास मदत करू शकते. मानवाच्या मूलभूत हिंसक स्वार्थी वृत्तीवर मात करण्याचा हा प्रश्न आहे. हा एक नवा मानव घडवण्याचाच प्रयत्न आहे. विविध धर्मांनी हा प्रयत्न केला. मानवाने ते संस्कार वरवर स्वीकारले परंतु पोटातील हिंसक स्वार्थी वृत्तीमुळे धर्माधर्मात व प्रत्येक धर्माच्या अंतर्गतही हिंसक स्वार्थी संघटनांना व घटनांना प्रत्यक्षात अधिक गती दिली गेली.

हाइलब्रोनर यांनी या दिशेने विचार केलेला नाही. धर्माचा निर्देश त्यांच्या विवेचनात नाही. विशुद्ध धर्माच्या बंधुतेच्या संकल्पनेतून निघालेली गांधीजींची विश्वस्तवृत्तीची संकल्पना त्यांच्या कानावर आलेली नाही. भूदान आंदोलनाचेही नाव त्यांच्या कानावर आले नसावे किंवा त्यांना त्याचे महत्त्व वाटले नसावे. परंतु बंधुतेतून समता आणण्याचा जगाच्या इतिहासातील तो एकमेव मोठ्या प्रमाणावरील प्रयोग होता. मानवाच्या मूलभूत स्वार्थी प्रेरणांच्या पलीकडे उडी घेऊ पाहणाऱ्या विश्वस्तवृत्तीचा, भूदान आंदोलनाचा पराभव झाला. 'ग्रामस्वराज्य' प्रयोगाचे विधिलिखित काही वेगळे असेल अशी आशा करावयास आज तरी जागा नाही.

हे सर्व हाइलब्रोनर यांच्या विवेचनाच्या कक्षेबाहेरचे परंतु त्यांच्या मांडणीतून स्फुरण मिळालेले चिंतन आहे. 'लोकशाही समाजवादा'ला विचाराच्या व कृतीच्या क्षेत्रात 'पुनश्च हरि ओम्' म्हणून उभे राहिले पाहिजे या आशयाचे अंतर्गत आवाहन हाइलब्रोनर यांच्या विचारधारेत आहे असे मला वाटते. हे अकारणच मी त्यांच्यावर लादत आहे असे तर होत नाही ना याचा निर्णय वाचक या छोट्या पुस्तकाच्या वाचनानंतर घेऊ शकतील.



Earth has enough to provide for every man's need, but not enough to satisfy a single man's greed.

- Gandhiji

पृथ्वी प्रत्येक माणसाच्या गरजा पूर्णपणे भागवू शकते. परंतु एकाही माणसाचा हव्यास पूर्ण करण्याची क्षमता तिच्या ठिकाणी नाही.

- गांधीजी







अनुक्रमणिका

# समकालीन समाजवाद
## संजय संगवई

समाजवाद व लोकशाही समाजवादाच्या प्रमाण व्याख्येची इथे चर्चा करीत नाही. माझ्या मते, समता, न्याय, शोषणमुक्ती, अधिक समृद्ध व निरोगी जीवन, लोकशाही व त्यांच्याशीच संबंधित साकल्याचा प्रदेश वाढविणारे माणसांचे व निसर्गाचे मैत्र यांसारख्या संकल्पना व व्यवहारांची ती एक जिवंत प्रक्रिया आहे. इतिहासातील अनेक टप्प्यांवर या प्रेरणांची अभिव्यक्ती अनेक विचारांमधून व संघर्षातून होत आली आहे. त्याचा स्वतंत्र आढावा घेणे आवश्यक आहे.

भारतीय राजकारणात पारंपरिक समाजवादाची १९८० च्या शतकापर्यंत अनेक कारणांनी पिछेहाट झालीच होती. १९९० च्या दशकामध्ये सोविएत रशियाचा पाडाव व भारतात जागतिकीकरणवादी नव्या आर्थिक-राजकीय धोरणामुळे, समाजवादाला पहिल्यापासूनच विरोध असलेल्या आर्थिक-राजकीय शक्तींचा आत्मविश्वास वाढला आहे. समजावादी पक्ष तर जाऊच द्या, समाजवादाची मूल्येच (समानता, न्याय, शोषणविरोध, आर्थिक-समाजिक लोकशाही इ.) अवास्तव, अव्यवहार्य आहेत अशी सर्वसाधारण लोकांची धारणा करून देण्याच्या भांडवलशाही शक्तींच्या प्रयत्नांना जोर आला आहे. आर्थिक विषमता व शोषण यांत काही गैर आहे, ही भावनाच पुसून टाकण्याचे अनेक आघाड्यांवरून व माध्यमांतून त्यांचे जोरदार प्रयत्न सुरू आहेत. दुसरीकडे, हिंदुत्ववादी शक्तांनी भारताच्या सेक्युलर राष्ट्रस्वरूपाला आवाहन दिले आहे. भारतीय राष्ट्रीयत्वाचे दोन्ही आधार व प्रयोजन - समाजवाद व धर्मनिरपेक्षता - यांना आता अग्निपरीक्षेतूनच पार व्हावे लागत आहे.

मात्र त्याचबरोबर, विसावे शतक सरत असताना व एकविसाव्या शतकाच्या सुरुवातीला, भारतात व जगात लोकशाही समाजवादाच्या भवितव्याबद्दल पुन्हा एकदा आशा वाढल्या आहेत. भारतात लोकशाही समाजवादी पक्षांचा ऱ्हास झाला तरी, १९८० व १९९० च्या दशकांमध्ये अनेक जनआंदोलने, संघर्ष व रचनात्मक कामाच्या चळवळी, पर्यायाने एक बिगरपक्षीय राजकारणाची प्रक्रिया सुरू झाली. संघटना व चळवळींच्या या राजकारणातून अनेक कळीचे मुद्दे, धोरणे व धारणा पुढे आल्या, ज्या पूर्वीच्या समाजवादी वा साम्यवादी आंदोलनात-पक्षात त्या पद्धतीने व तीव्रतेने व जोरकसपणे आल्या नव्हत्या. यापूर्वीच्या म. फुले, म. गांधी, सर्वोदयी विचार, स्वातंत्र्य चळवळ, डॉ. आंबेडकर व पुढे पँथर्सची दलित चेतना, साम्यवादी पक्ष, संघटना, लोकशाही समाजवादाची परंपरा, विशेषतः डॉ. लोहियांची राजकीय-आर्थिक-सामाजिक व सांस्कृतिक मांडणी, सत्याग्रही समाजवादाच्या प्रेरणा, जयप्रकाशांच्या प्रेरणेची लोकशाही समतेसाठीची चळवळ व छात्र युवा संघर्षवाहिनीचे आंदोलन इत्यादी अनेक परंपरांची, त्यांतील गुण-दोषांची वैचारिक-राजकीय पार्श्वभूमी होतीच. नामांतर व मंडल आयोगाच्या चळवळींनी दलित आंदोलनाची व्याप्ती व मुद्दे वाढले.

### १९८० पासूनचे प्रवाह

त्या बिरासतीच्या व १९८० पर्यंतच्या आर्थिक, राजकीय व सामाजिक स्थिती, विकास, नियोजन इत्यादींच्या संदर्भात अनेक नव्या चळवळी-आंदोलने, नवे विश्लेषण आकार घेऊ लागले. आदिवासींची जमीन-जंगल अधिकारांची आंदोलने तीव्र होऊ लागली. १९८० नंतर भारतात अनेक स्वयंसेवी संस्था (एन.जी.ओ.) सुरू झाल्या. त्यांनी विशिष्ट क्षेत्रांतील काहीच मुद्द्यांवर व्यावसायिक पद्धतीने कार्य सुरू केले. त्यांच्यापैकी काहींनी अनेक कळीचे मुद्दे चांगल्या रीतीने उठवले. तरी एकंदरच त्यांची कार्यपद्धती, मुद्दे यांमुळे जनआंदोलनांसमोर अनेक राजकीय व प्रक्रियात्मक पेच-तणाव उभे राहिले. या स्वयंसेवी संस्था (एन.जी.ओ.) व चळवळी यांच्याबद्दल चर्चेची गरज आहे.

या काळात इतर लढ्यांबरोबर, नर्मदा, टिहरी, कोएल-कारो, सुवर्णरेखा, बालियापाल. चिलिका, भोपाळ. छत्तीसगढ, किनारपट्टीवरील मच्छिमारांमधील, छत्तीसगढ मुक्तीमोर्चा, गिरणगाव संघर्ष समिती, शोषित जनआंदोलन, अनेक किसान-मजूर संघटना, भूमीहीनांच्या व असंघटित कामगारांच्या लहान-मोठ्या चळवळी, अशांसारख्या देशभरातील जन-आंदोलनांची आजवरच्या विस्थापनावर, विकासप्रकल्पांवर, धोरणांवर तसेच त्यांमागील विकासाच्या धारणेच्या प्रत्येक अंगावर सवाल करून पर्यायी विकासाच्या राजकारणाचा विचार मांडला. नर्मदेच्या लढ्यात विस्थापनाच्या प्रश्नावर सुरुवात होऊन विस्थापनाला व विकास प्रकल्पाच्या सार्वजनिक वा राष्ट्रीय हिताच्या दाव्यांनाच साधार व जनसंघर्षाद्वारे आव्हान दिले गेले. अशा अनेक लढ्यांमध्ये समता,

अनुक्रमणिका

समान वाटप, लोकशाही हक्क-प्रक्रिया व विस्थापन-विनाशाला विरोध ही सूत्रे आहेत. मात्र, विकासाच्या रूढ धोरणाच्या व प्रारूपाच्या चौकटीतच काही सुधारणा, अशा स्वरूपाची त्यांची मांडणी नाही. केंद्रीकृत व पर्यावरणविरोधी विकासपद्धती व त्याची तंत्रसंघटनपद्धती कायम ठेवून त्याचे परिणाम मात्र वेगळे यावेत, ही अपेक्षा करता येत नाही ; त्याऐवजी आजच्या उत्पादन-वितरण उपभोग पद्धतीलाच मुळातून सवाल करण्याची गरज आहे ही बाब या संघटना-तज्ज्ञांनी आजवरच्या स्वतःच्या आणि व्यापक अनुभव व अभ्यासाद्वारे निडरपणे मांडली. विकासाच्या अंधश्रद्धेला विरोध करून पर्यायाची मागणी-मांडणी करणाऱ्यांना भारतात विकासविरोधी, प्रगतीविरोधी इत्यादी दूषणे दिली जात आहेत. युरोप व जगात अन्यत्र पर्यावरणीय व समाजवादी-साम्यवादी विचारांना जवळचे मानले जाते. मात्र भारतात याच्या विपरित स्थिती आहे.

१९९९ च्या नोव्हेंबरात, सिॲटल येथे जागतिक व्यापार संघटनेच्या बैठकीच्या वेळी झालेली अभूतपूर्व निदर्शने व त्यानंतर वॉशिंग्टन, डावोस, प्राग, व्हेनिस, क्यूबेक आदी ठिकाणी बड्या भांडवली देशांच्या-कंपन्यांच्या, संस्थांच्या विरोधात जबरदस्त निदर्शने झाली. जागतिक व्यापारसंघटना, बहुराष्ट्रीय कंपन्या व जागतिक भांडवलशाहीच्या विरोधात विविध प्रकारच्या संघटना व विचार आकार घेत आहेत. भारतातही डाव्या पक्षांखेरीज अनेक जनसंघटनासुद्धा जागतिकीकरणविरोधी आंदोलनात सक्रीय आहेत. मात्र त्यांची भूमिका अमेरिका व भांडलशाहीखेरीज सध्याच्या विकासप्रक्रियेलाही सवाल करणारी आहे.

या विविध जन-आंदोलनांनी केलेले आजच्या स्थितीचे विश्लेषण व पर्यायी विकासाची मांडणी, त्यांची संघर्ष व रचनेची आंदोलने व राजकारण हा यापुढील लोकशाही समाजवादाच्या उत्क्रांतीचा मार्ग असेल. किंबहुना, या नव्या चळवळींचा सहयात्री म्हणून समाजवाद अधिक समकालीन व जिवंत प्रक्रिया राहील. लोहियावादी समाजवादी, नव-मार्क्सवादी, काही प्रमाणात नक्षलवादी, ट्रॉट्स्काइट्स यांच्याशिवाय, भारतातील समाजवादी-साम्यवादी व पुरोगामी परंपरांतील काही बुद्धिवंत मते यांनी पर्यायी विकासाच्या व पर्यावरणवादी मुद्द्यांबद्दल अधिक जाण दाखवली, या मुद्द्यांबद्दल पुरोगामी बिरादरीमधील आपलेपणा, हळूहळूच, पण वाढत आहे.

ही सर्वच आंदोलने-संघटना अजूनही विकसित होत आहेत; त्यांच्यात खुले वाद-संवाद, आदानप्रदान व बदल होत आहेत. या आंदोलनांची भाषा व त्यांचे मुहावरे-संज्ञा (इडियम्स-जार्गन्स) ही पारंपरिक समाजवादी-साम्यवादी-जातिनिर्मूलनवादी वा अन्य पूर्वसूरींनुसार नाहीत. आपल्या समकालीन प्रश्नांच्या अनुषंगाने, अनुभव-विश्लेषणानुसार त्यांची विचारधारा विकसित झाली. प्रत्येक युगाची व चळवळीची स्वतःची एक भाषा व राजकारण असते, आपल्या संदर्भानुसार व देश-काल-लोक यांनुसार ते आकारत जाते. नव-वर्चस्ववाद्यांबरोबरच ते पुरेगामी परंपरेतील काही धारणा, राजकारणालाही तोंड देत आहेत. उदाहरणार्थ, सर्वंकष राज्य, स्टेट सोशॅलिझम म्हणजे त्यांना समाजवाद वाटत नाही. केवळ अमेरिकाविरोधापेक्षाही अधिक व्यापक, उत्पादन-विकाससंबंधी त्यांची भूमिका आहे. या नव्या लोकशाही समाजवादी प्रेरणांचे, विचारधारा व राजकारणाचे सविस्तर आकलन व त्यावर चर्चा-विचार होणे आवश्यक आहे, जे या लेखाच्या मर्यादेत बसणारे नाही. म्हणून त्यातील काही रूपरेखांची (पॅरामीटर्स) संक्षिप्त मांडणी :

### समतेचा वाढता परीघ

सामाजिक व राजकीय समतेचा आग्रह व त्यासाठी सतत संघर्ष हे समाजवादाशी नाळ असलेल्या सर्वच लढ्यांचे वैशिष्ट्य आहे. जातिनिर्मूलन, असहिष्णू संप्रदायवादाला - विषमतामूलक हिंदुत्ववादी किंवा जिहादी कट्टरवादाला विरोध, स्त्री-पुरुष समानता, कामगार-शेतकरी-शेतमजूर यांचे अधिकार या बाबी आजच्या घडीला अधिक महत्त्वाच्या झाल्या आहेत. जातवास्तवाचे भान ठेवून, त्याचे परिवर्तनकारी शक्तीत रूपांतर करणे व त्यापलीकडे जाणे, याबरोबरच जात व आर्थिक संरचना, भांडवलशाही - जागतिकीकरणाच्या संदर्भात जातिअंताच्या चळवळीचे नवे आयाम आज विकसित होताना दिसत आहेत. त्या-त्या समूहांतर्गत असलेल्या विषमताविरुद्ध, विरोधाभासांविरुद्धदेखील उभे ठाकण्याची गरज जाणवत आहे तसे संघर्षही आकार घेत आहेत. याबरोबरच, अनेक बाबतीत शोषित व अन्यायग्रस्तांचे व त्यांच्या मुद्द्यांचे एकत्रीकरण (कन्सॉलिडेशन) होत आहे. सर्व शोषितांच्या एकतेची किमान गरज तरी वाटत आहे.

धार्मिक मूलतत्त्ववादला विरोध करतानाच धर्मचिकित्सा, धर्मनिरपेक्षता यांबाबत इहवादी, विज्ञानिष्ठ-रॅशनॅलिस्ट ते सर्वधर्मसमभावापर्यंत अनेक भूमिका पुढे आल्या. मात्र, सर्वांमध्ये लोकशाही, सहिष्णुता, समता, जातिअंत व शोषणमुक्ती यांसारख्या मूल्यांबद्दल किमान मतैक्य आहे.

अनुक्रमणिका






लोकअधिकार व साधनसंपदेचे (जसे जमीन, पाणी, जंगल, रोजगार इत्यादी) उत्पादित वस्तूंचे समतापूर्ण व न्याय्य वाटप हा समाजवादी विचारांचा गाभा राहिला आहे. भारतातील अनेक संघटना व संस्थांनी पाण्याचे विकेंद्रित व्यवस्थापन व समतापूर्ण वाटप ही संकल्पना रुजविण्यात महत्त्वपूर्ण योगदान दिले आहे. विकासाच्या नावावर उद्ध्वस्त होऊ घातलेले व झालेले विस्थापित धरणग्रस्त, दुष्काळग्रस्त, मच्छिमार, खाणी-अभयारण्य-कारखाने- महामार्ग पर्यटन यांमुळे आपल्या साधनसंपत्तीवरून देशोधडीला लागलेले समूह, नव्या आर्थिक धोरणांमुळे रोजगारावरून फेकले गेलेले संघटित-असंघटित कामगार, छोटे व्यावसायिक, लहान उद्योजक या सर्वांनाच फटका बसला आहे. समता-शोषणमुक्तीच्या सिद्धांतात व राजकारणात या सर्वांना सामावून घ्यावे लागणार आहे. समतेच्या या वाटचालीत नव्या संदर्भातील विकेंद्रीकरण व ग्रामराज्य या संकल्पनेचे महत्त्व पुढे येत आहे. अर्थपूर्ण लोकशाहीचा पाया घालू पाहणारे हे विकेंद्रीकरण 'जुन्या खेड्याकडे चला' असे सांगणारे नाही. हे बुजुर्ग सर्वोदयीदेखील आवर्जून सांगतात. नव्या विकेंद्रीकरणात समानतेला व व्यक्तींच्या अर्थपूर्ण अधिकार व सृजनशीलतेसाठी, लोकशाही निर्णयप्रक्रियेसाठी आपल्याला आता केंद्रीकृत संरचनेपासून दूर जायचे की नाही, हा आहे. 'ग्रामस्वराज्य' किंवा 'हमारे गाव में हमारा राज' अशा संकल्पनांमागील हेतू हा निर्णयप्रक्रिया व सत्तासंरचनेतील विकेंद्रीकरणाचा असतो. त्याचा आशय व प्रक्रिया ही स्थलकालानुसार अधिक परिष्कृत करावी लागेल.

आपल्या जीवनाशी निगडित, आपल्या परिसरातील निर्णयांमध्ये आपल्याला, परिसरातील जास्तीतजास्त जणांना वाटा व वाव देणारी पद्धती म्हणजे विकेंद्रीकरण असून, लोकशाही, समतेची व वर्चस्वविरोधाची ती पूर्वशक्ती ठरते. हे विकेंद्रीकरण शोषित समूहांच्या सक्षमीकरणासाठी आवश्यक आहे. ते परिणामकारक ठरण्यासाठी माहितीचा अधिकार व लोकांचा संमती देण्या न देण्याचा (सहमतीचा) अधिकार महत्त्वाचा ठरत आहे. देशातील अनेक आदिवासी, शेतकरी व अन्य कष्टकऱ्यांच्या संघटनांची तशी मागणी राहत आली आहे.

### शाश्वत देशी अर्थशास्त्र

स्थानिक स्तरापासून जागतिक पातळीपर्यंत साधनसंपदेचे विषम वाटप, विनाशकारी वापर, प्रदूषण, विषमता, शोषण, पर्यावरणीय सामाजिक समस्या या प्रत्यक्ष अनुभवांचा भाग आहे व त्यावर उपाय शोधण्याची गरज आहे. त्याची जुजबी उत्तरे देणे ही आत्मवंचना ठरेल. आहे त्या प्रारूपाच्या अधिक योग्य व्यवस्थापनापुरता किंवा फारतर फेरवाटपापुरता हा सवाल मर्यादित नाही. त्यापलीकडे जाऊन उत्पादनपद्धती, त्यांचे संघटन त्यांमागील तंत्रज्ञान व विज्ञानाची धारणा, विकास धोरण या सर्वांचा पुनर्विचार करावा लागणार आहे. उत्पादन-पद्धती न बदलता, त्या पद्धतीचे दुष्परिणाम टाळता येतील का? कारणांत बदल न करता परिणामांत बदल करता येणार नाहीत, याची जाणीव तीव्र होत आहे.

ही नवी आखणी वरवरची नसून मूलगामी व एकत्रित (इंटिग्रेटेड) असण्याची गरज निर्माण झाली आहे. उदा. शहरातील प्रदूषण, वाहनांची कोंडी होत असेल तर रस्ते रुंद करणे, त्यांची संख्या वाढवणे, भुयारी - आकाशातील रस्ते करणे इत्यादी उपाय फार तकलादू आहेत. मुळात खासगी वाहनांची - कार, दुचाक्यांची भरमसाठ वाढ, कार उद्योगाचे वर्गीय राजकारण, त्याला सरकारचे उत्तेजन, किंवा सार्वजनिक वाहतुकीचे कार्यक्षम नियोजन व त्याला महत्त्व हे लक्षात न घेता हा प्रश्न आटोक्यात येईल, असे मानणे हा अंध विश्वास किंवा चलाखी आहे. अशी अनेक उदाहरणे व पुरावे सहज देता येतील. जी गोष्ट आणखी दहा-पाच वर्षांनी झक्कत, अर्धीमुर्धी करावी लागेल, तीच बाब नियोजनबद्ध रीतीने आधीच करणे शक्य व आवश्यक आहे. त्यासाठी आजच्या उत्पादन पद्धतीत पर्यायाने विकासपद्धतीत मूलभूत बदल करावे लागतील.

प्रचलित उत्पादन-तंत्र सध्याच्या साधन-संपत्तीच्या, गरजांच्या सामाजिक-राजकीय जागृती व पर्यावरणीय जाणिवेच्या समग्र संदर्भात कालबाह्य व अव्यवहार्य ठरत आहेत. केवळ जगड्व्याळ, केंद्रीकृत व गुंतागुंतीचे तज्ज्ञशाहीचे रूढ (कन्वेन्शनल) तंत्रज्ञान म्हणजे आधुनिक व कालानुसंगत तंत्र नव्हे. हरितक्रांतीचे तंत्र व त्यामागील हायब्रीड, रासायनिक खते-कीटकनाशके व त्याचा बाजार आता कालबाह्य, परोपजीवी व उलटणारे झाले आहे. सरदार सरोवरासारखी धरणे, अनेक नवी-जुनी औद्योगिक उत्पादनपद्धती या कोणत्याही (अगदी प्रचलित) निकषांवर टिकणारी नाहीत. वीज-पाणी-बाजार यांच्या छुप्या सबसिडीच्या आधारेच ते अस्तित्वात आहेत. त्यामुळे हातमागासारखे विकेंद्रित, कमी भांडवलाचे, स्थानिक गरजा भागविणारे व अधिक कौशल्यपूर्ण उद्योग मोडकळीस येऊन विणकरांना आत्महत्या कराव्या लागत आहेत. तरीही एखाद्या अंधश्रद्धेप्रमाणे हे तंत्र-मंत्र टिकविण्याची धडपड आजचे राजकीय-आर्थिक अभिजन व सत्ताधारी वर्ग करत आहेत. जे.सी. कुमारप्पांच्या इकॉनॉमी ऑफ परमनन्स (शाश्वततेचे अर्थशास्त्र) या संकल्पनेनुसार जमीन, शेती, पाणी, ऊर्जा, जंगल,



अनुक्रमणिका

उद्योग, बाजार इत्यादींचे सध्याच्या सामाजिक-पर्यावरणीय संदर्भात जे आवश्यक असेल, त्यासंबंधी नव्या निकषांनुसार, मूल्यांनुसार, उत्पादन, व्यवस्थापन व वितरणतंत्राची समकालीन व चिरंतन (सस्टेनेबल) आखणी करावी लागेल.

अशा उत्पादनपद्धतीत, एत्तदेशीय उत्पादन व निर्मितीक्षमतेचे फार महत्त्व आहे. आजच्या बऱ्याच पर्यायी संकल्पना व कृतींचा संबंध म. फुलेंच्या सामाजिक-आर्थिक विश्लेषणाशी आहे. एतद्देशीयता ही त्यांच्या विचारांतून प्रकट होते. गांधींचा विचार त्याला पुढे नेतो. तेथील माणसांच्या निर्मितीक्षमतेवर, उपजीविकेवर वर्चस्व बसविण्याच्या एकछत्रीकरणाला (हेजीमनी) विरोध करून, प्रत्येक व्यक्ती व समूहाचे स्वातंत्र्य कायम राहावे यासाठी ज्ञान व उत्पादनक्षमतेची बहुलता आवश्यक आहे. ही बहुलता ग्राहकालासुद्धा उपकारक आहे. केवळ वित्तीय भांडवलाच्या जोरावर एका पेप्सी किंवा कोकने येथील आस्वादांचा व किंमतींचा एकाधिकार घेण्याऐवजी प्रत्येक गाव, घर, गल्लीतील पेय, सरबते, पादत्राणे, कापड, तेल इत्यादी उत्पादनांसाठी अवकाश कायम ठेवण्याचा हा प्रयत्न आहे. ही एतद्देशीयता आजच्या काही स्वदेशीवाल्यांपेक्षा वेगळी आहे. यात माणसाच्या जन-रंग-भूमीपेक्षा आर्थिक-राजकीय केंद्रीकरण, वर्चस्वाचा व शोषणाचा मुद्दाच सर्वांत महत्त्वाचा आहे. मग ते शोषण, वर्चस्व माझ्या देशातला, जातिधर्माचा किंवा माझ्याच रंगाचा माणूसही करेना का - त्याला प्रतिकार अभिप्रेत आहे. म्हणूनच, एन्रॉन कंपनीला विरोध करताना जनसंघटनांचा रिलायन्स, अंबानी यांनाही विरोध आहे.

देशात समूहाची ही मूल्ये, प्रक्रिया, उत्पादनपद्धती व उत्पादने अधिक खुल्या, स्वातंत्र्यवादी, स्वायत्त व व्यवहारी, आपल्या समूहाच्या गरजांशी जोडलेल्या अशा सामाजिक-आर्थिक व्यवस्थेचा पाया आहे. तसेच त्यांची त्या भागातील नैसर्गिक साधनसंपदेच्या चिरंतन उपयोगाशी अधिक सुसंगत सांगड राहू शकते. स्वावलंबनाचा व स्वयंनिर्भरतेचा हा अर्थ आहे; इतर जगापासून अलग राहणे असा अर्थ कधीही पर्यायी विकासामध्ये लावला नव्हता. सर्वोदयाची स्वदेशीची संकल्पना व उत्पादन व उपभोगाची स्वायत्तता व नैतकता यांच्याशी जास्त निगडित आहे. स्वदेशी धर्म या लेखात विनोबा म्हणतात, 'स्वदेशी धर्म म्हणजे दयाभावाची अंमलबजावणी... स्वदेशी धर्म मायाळू नाही, दयाळू आहे. दयेला तारतम्य पाहणे भाग आहे. देशी दारू देशी असूनसुद्धा स्वदेशीला ग्राह्य नाही. उलट स्वित्झर्लंडची (खरी जरूर असेल तर) परदेशी असूनसुद्धा विकत घेण्यास बाध नाही.'

आज देशाच्या प्रत्येक भागात पाणी, शेती, अन्नधान्य-खाद्य पद्धती, ऊर्जा, आरोग्य, उद्योग, पर्यायी बाजार, जीवनपद्धती याबद्दल या नव्या दृष्टिकोनातून विविध प्रयोग, अभ्यास, मोहिमा अनेक संघटना-समूह करत आहेत. मानवी जीवन अधिक उन्नत व्हावे यासाठी पारंपरिक उत्पादन तंत्राऐवजी अधिक सहज, अवडंबररहित व सर्वांच्या हाती राहू शकेल असे उत्पादनतंत्र व त्याचे संघटन होऊ पाहत आहे. यातून एका नव्या समकालीन तांत्रिक-वैज्ञानिक व सामाजिक-राजकीय संस्कृतीची चिन्हे प्रत्ययास येत आहेत. या प्रयत्नांची एकत्र माहिती होणे, त्यासंबंधीच्या विविध पैलूंवर विचारमंथन व प्रयोग होणे, त्यात अधिक सुधार (इनोव्हेशन्स) होणे व या विविध प्रयत्नांचा समन्वय हा समाजवादाच्या प्रक्रियेचा विषय होणे गरजेचे आहे.

## नवा पर्यावरणवाद

गेल्या काही दशकांत पर्यावरणीय जाणिवा अधिक प्रगल्भ झाल्या असून, मानवी-सामाजिक जीवनाचा अधिक परिपूर्ण रीतीने विचार त्यांतून पुढे आला आहे. शुद्ध हवा, पाण्याचे शुद्ध व निरंतर स्रोत, स्वच्छ सूर्यप्रकाश, नितळ आकाश वा चांदणे, यासृष्टीबद्दल वा इतर जीवांबद्दल प्रेम-कुतूहल, समृद्ध सांस्कृतिक-सामाजिक जीवन, जंगल-झाडे, प्राणी-पक्षी यांचे अस्तित्व या गोष्टी अधिक समृद्ध जीवनासाठी आवश्यक आहेत. आदिवासी, कष्टकरी, शेतकरी व नैसर्गिक साधनसंपदेवर अवलंबून असलेल्या समूहांसाठी तर त्या अधिक आवश्यक आहेत; त्यांच्या जीवनाचा सहज भाग म्हणून त्या समाविष्ट असतात. जीवनाची गुणवत्ता व सौंदर्य हा सर्वांचाच अधिकार आहे. कष्टकरी वर्गाला फक्त आर्थिक-भौतिक अस्तित्व नसते ; पर्यावरणीय व सांस्कृतिक उन्नयनाचा त्यांच्याशी संबंध नाही असे मानणे, हा भांडवलशाही राजकारणाचा भाग आहे. लोकशाही, अहिंसा यांप्रमाणेच आपल्यासोबतचे अन्य जीव - माणूस व वनस्पती, पक्षी व प्राणी यांच्याबद्दल सहानुभाव असणे हा मानवी विकासाचा, प्रगतीचा महत्त्वाचा टप्पा आहे. अन्यथा, आपल्याहून वेगळ्या वशारीरिक-बौद्धिक बाबतीत कमतरता असलेल्या सर्वच प्राणिमात्रांच्या शोषण व दमनाला समर्थन प्राप्त होईल. पर्यावरणीय विचारांचा असा राजकीय आशय लक्षात घेणे आवश्यक ठरणार आहे. जगातील भांडवली व मूलतत्त्ववादी शक्ती पर्यावरणीय विकासाच्या विचारांवर सर्वांत जास्त प्रहार करतात. त्यांच्या गृहीतकालाच पर्यावरणीय जाणिवांचे आवाहन असते.

भारतासारख्या तिसऱ्या जगातील देशात पर्यावरणा-चा




अनुक्रमणिका

संबंध लोकांच्या साधनसंपदेवरील जल, जंगल, जमिनीच्या - अधिकारांशीही आहे. जंगल, नद्या, तळी, समुद्र, जमीन, सामायिक साधनसंपदा या सर्वांवर पिढ्यान् पिढ्या अवलंबून असलेले आदिवासी, मच्छिमार, शेतकरी, श्रमिक, महिला व मागास जाती इत्यादींचा त्या साधनसंपदेचा सर्वात जास्त व निरंतर पद्धतीने उपयोग करतात, व त्यांचा त्यावर पहिला व निर्णायक अधिकार आहे. हा अधिकार मानल्यावर, त्यांच्या सर्व वाजवी गरजा भागवल्यावर, त्यांच्या सहमतीने, क्षेत्रीय व राष्ट्रीय उपयोगासाठी या साधनसंपदेचा चिरंतन पद्धतीने वापर करता येईल अशी ही भूमिका आहे. त्याहीपुढे, भौतिक संबंध असतात, पैशांच्या भांडवलापेक्षा महत्त्वाचे व लोकांच्या हातांतील जमीन, पाणी, जंगलासारखे नैसर्गिक व सामाजिक भांडवल वा साधनसंपदा असते व तसे ते राहावे, त्यांचे खासगीकरण नको, यावर चळवळीचा भर आहे.

पर्यावरण, लोकशाही व समता या बाबी विकासाचा अपरिहार्य व अंतर्निहित भाग मानल्या पाहिजेत. आजवरच्या विकासप्रक्रियेत व संकल्पनेत फक्त तंत्र-वैज्ञानिक व आर्थिक वाढ याला विकास मानले जाते. पर्यावरणीय टिकाऊपणा, समता, लोकशाही प्रक्रिया हे मुद्दे बाह्य, अन्य (द अदर) दुय्यम वा अनुषंगिक मानण्याची आपली प्रथा आहे. त्यांची अंमलबजावणी करण्यासाठी तंत्र-आर्थिक वाढीला बाजूला सारण्याची कितीजणांची तयारी असते? जणू हे मुद्दे वाट पाहू शकतील किंवा नंतर बाहेरून जोडता येतील; निर्णायक, (स्ट्रॅटेजिक), सममूल्य (इक्विव्हॅलंट) नसतात, ऐच्छिक असतात. त्यांना गौण मानून त्याबाबत समझोता करायचा व कसेही करून विकासाला वाट मोकळी करून द्यायची असे चित्रही दिसते. नव्या विचारांनुसार, पर्यावरणीय निरंतरता, समता व लोकशाही हे आर्थिक वाढीचे सममूल्य घटक आहेत; ते नसतील तर त्या पूर्ण योजना-धोरणाचा फेरविचार व त्यांची फेरमांडणी करावी लागेल.

## ज्ञानाची बहुलता

या चळवळीतून व विकासाच्या समीक्षेतून आजवरच्या वर्चस्ववादी ज्ञान-विज्ञानावरही सवाल केले गेले आहेत व ज्ञानविज्ञानांचे बहुलवादी अस्तित्व ठसवले गेले. एका वर्गाचे ज्ञान किंवा अमुक प्रकारचेच विज्ञान, यांना एकमेवद्वितीय, प्रमाण मानण्याऐवजी प्रत्येक समाजघटकाचे व विभिन्न देशकालातील, अनुभव व प्रयोगांनी सिद्ध होत आलेले ज्ञान-विज्ञानदेखील महत्त्वाचे आहे, प्रमाण आहे, ही जाणीव अनेक चळवळी रुजवत आहेत. एखाद्याच वर्गाच्या, एकाच विशिष्ट कालातील व भूभागातील व एकाच पद्धतीच्या ज्ञानाचे प्रामाण्य व त्याची मक्तेदारी असणे हेसुद्धा वर्चस्वाचे व शोषणाचे एक मुख्य कारण आहे. साधारण जनसमूहसुद्धा शेकडो वर्षे आपली बुद्धी, सृजनक्षमता व परंपरेने शेतीस पाणी, आरोग्य, तंत्रविज्ञान विकसित करत आले आहेत. त्यांना व त्यांच्या क्षमतांना दुय्यम लेखण्याची वासाहतिक वृत्ती यापुढे चालणार नाही. लोकांच्या ज्ञानविज्ञानालाही कठोर वैज्ञानिक निकषांवर तावून-सुलाखून घ्यावे लागेल. प्रश्न आहे, समान वागणुकीचा व स्थानाचा. अनेक ज्ञान परंपरांची, काही समान निकषांच्या कसोटीवर सिद्ध झालेली बहुलता ही यापुढील समतेच्या, लोकशाहीच्या व पर्यावरणीय निरंतरतेच्या संदर्भात महत्त्वाची ठरेल.

आजच्या विज्ञानाबद्दल, त्याच्या अन्वेषण-उपयोजन पद्धतीबद्दलही मूलभूत सवाल निर्माण होऊ लागले आहेत. या आकलन-अन्वेषण पद्धतीतच हिंसा, विषमता अंतर्निहित आहे का, असे सवाल उभे झाले आहेत. त्यांतून विज्ञानाची व भौतिक संवेदनांची मर्यादा, इथपर्यंत चर्चा सुरू झाली, ज्याची दखल घेणे आवश्यक आहे.

## सम्यक् जीवनशैली

या सर्वांना जोडून, सामाजिक व व्यक्तिगत जीवनशैली-बद्दल आखणी करणे व धोरण असणे आवश्यक बनले आहे. जीवनशैलीचा मुद्दा उपभोगाशी, वस्तू व साधनसंपदेच्या वापराशी निगडित आहे. उपभोगवाद किंवा चंगळवाद हा मुद्दा व्यक्तिवादी नैतिकतेबरोबरच सामाजिक नीतीचा (सोशल मॉरॅलिटी), आपल्याशिवाय इतरांच्या लोकशाही हक्कांचा व साधनसंपत्तीषियक धोरणांचा आहे. प्रत्येकाने किती पाणी, वीज, जमीन, जंगल, नैसर्गिक साधनसंपत्ती वापरावी इथपासून किती धन व वस्तू संग्रह करावा, इथपर्यंत अनेक बाबी वापरण्यावर कमाल मर्यादा येतील. अमेरिका-युरोपप्रमाणे दरमाणशी वीजवापराचे व अन्य उपभोगाचे उद्दिष्ट प्रमाण मानले तर भारतातील सर्व नद्यांवर अगडबंब धरणे बांधून, सर्व जंगले, जमीन, पैसा वापरूनही, त्याची पूर्तता होणार नाही.

अशा मर्यादा असणे म्हणजे ज्यांना आजपर्यंत काहीच मिळाले नाही, त्यांना विकासाचे फायदे नाकारणे असे नव्हे. अनिर्बंध वापरावरच्या या कमाल मर्यादेशिवाय प्रत्येकाला किमान स्वस्त सेवा व संसाधनेही मिळणार नाहीत. सर्वांना व सर्वत्र किमान वीज, पाणी मिळायची असेल तर पंचतारांकित व अनावश्यक शहरी औद्योगिक वीज वापरावर, पाण्याच्या उधळपट्टीवर नियंत्रण जरूर आहे. भपका





व चंगळवादावरची नियंत्रणे ही सामाजिक न्यायासाठी आवश्यक आहेत. तसेच प्रतिष्ठेच्या, छद्म आधुनिकतेच्या कल्पनांवर-सुद्धा प्रश्नचिन्ह लावले जात आहे; लावणे जरूर आहे. कृत्रिम कापडांचा टाय व सफारी घालून मिरवणे, काहीही गरज नसताना झकपक गाड्या उडविणे, खाण्यापिण्यावर निर्बंध न ठेवता रोगांवर महागडे उपचार करणे, इत्यादी गोष्टी काही प्रतिष्ठेच्या नसून ती अवैज्ञानिकता व अडाणीपणा आहे; भंपक चंगळवाद म्हणजे बौद्धिक मागासलेपण होय.

वस्तूंचा अनिर्बंध व विषम उपभोग हा व्यक्तीच्या हितासाठी-स्वास्थ्यासाठीसुद्धा नुकसानकारक आहे. त्यामुळे व्यक्तींच्या ऐहिक जीवनाचे इतर अनेक संपन्न व सुंदर पैलू, वैचारिक, कलात्मक आयाम, मानवी संबंध, निसर्गाविषयी प्रगाढ जाणीव, सौंदर्यबोध, आत्मशोध या जीवनाच्या तेवढ्याच महत्त्वाच्या बाबींना आपण मुकतो. साधेपणा म्हणजे दरिद्रीपण नाही. जीवनावश्यक व अधिक सुटसुटीत व सुखकर वस्तू सर्वांना उपलब्ध व्हाव्यातच. मात्र, त्यापलीकडे ऐषआराम व प्रतिष्ठा- अहंकारपूर्तीचे साधन म्हणून वस्तूंसाठीची वखवख आपले जीवन दळभद्री करते. सर्व विचारधारांत व दर्शनांत ही बाब कमी-अधिक फरकाने आढळतेच. असा बिगर-वस्तुवादी दृष्टिकोन फक्त आर्थिक-राजकीय महाजन-अभिजनांसाठी राखीव नसतो. किंबहुना, लौकिक व्यापारापासून, किंमत लावण्यापासून दूर असलेल्या, बाजारू नसलेल्या याच गोष्टी, सामान्य माणसांचा सर्वांत मौल्यवान ठेवा असतो ; आणि त्यांच्या जीवनाचा तो सहज भाग असतो. या बाबींचेही परात्मीकरण व बाजारीकरण करून त्या बाबी पैसा-भांडवलाच्या दावणीला बांधण्याचे बनियावादी मंडळींचे प्रयत्न असतात. माणसांनी केवळ वस्तुवादी व चंगळवादी- ग्राहकवादी असणे हे भांडवलशाही-बाजारवादी व्यवस्थेचे गमक व विस्तार आहे. भौतिक बाबींपलीकडे जगण्यात जे काही असते, त्याच्यासाठी सर्वांना वाव मिळावा; ज्यामुळे व्यक्तिमत्त्व व सामाजिक जीवन अधिक संपन्न, सजीव होईल, त्या दृष्टीची समाजवादाच्या नव्या आखणीत समुचित मांडणी अंतर्निहित आहे.

संस्कृतीचे राजकारण हा सध्या कळीचा मुद्दा आहे. पथनाट्य, जनवादी साहित्य, विद्रोही चळवळ याचबरोबर, आपल्या आकलन-संवेदनेच्या, जाणिवा व अभिव्यक्तीच्या प्रतीक्षा, अस्सलतेच्या (ऑथेंटीसिटी) इत्यादी अनेक स्तरांवर चिंतन-चर्चा सध्याच्या एकछत्री किंवा घो॰ ॥-जिंगल्सवादी संस्कृतीच्या जमान्यात महत्त्वाच्या आहेत. फॅशन-शो, ग्लॅमरस जाहिरातीवाले-सुद्धा अभिव्यक्ती स्वातंत्र्य, उदारमतवादाची घोषणा देऊन स्वतःला बंडखोर व त्याला विरोध करणाऱ्यांना कल्चरल पोलिस म्हणतात. स्वदेशी-देशीची गुंतागुंत वाढतच आहे. अशावेळी दि.के. बेडेकर-लोहियांसारखे गंभीर संस्कृती चिंतन जरूरी आहे. हा विषय स्वतंत्र विवेचनाचा आहे, एवढा मूलगामी व सर्वस्पर्शी तो आहे. पर्यायी राजकारणाशी (पॉलिटिक्स) निगडित अशी पर्यायी नैतिकता (एथिक्स-जीवनमूल्ये) व सौंदर्यबोध (एथेटिक्स) विकसित होणे महत्त्वाचे आहे.

### अहिंसा : रणनीती व मूल्य

नव्या परिवर्तनवादी चळवळींच्या मुळाशी अहिंसेचा सिद्धांत व व्यवहार आहे. व शोषितांच्या दृष्टीने प्रस्थापितांविरुद्ध लढण्यासाठी तसेच लहानांपासून वृद्धांपर्यंत सर्वांच्या व्यापक सहभागाच्या दृष्टीने, अहिंसक लढाच उचित ठरतो. त्यामुळे लढा खऱ्या अर्थाने लोकांचा, पर्यायाने राजकीय बनतो. हिंसक लढ्यांना दडपण्याचे तंत्रव्यवस्थेला चांगले ठाऊक असते. एखाद्या चळवळींपेक्षा किंवा दहशतवादी समूहापेक्षा कितीतरी पटीने अधिक हिंसक शक्ती शासनाकडे वा प्रस्थापितांकडे असते.

मात्र रणनीतीहूनही महत्त्वाचे, चळवळींनी अहिंसेचा सिद्धांत म्हणून केलेला स्वीकार होय. हिंसा व तिची विविध रूपे ही परिवर्तनाचे योग्य साधन होऊ शकत नाही. लोकशाही, समता, न्याय, लोकाधिकार, पर्यावरणीय निरंतरता यांच्या पर्यायी विकासाच्या राजकारणासाठी अहिंसा व शांती हाच मूलाधार असू शकेल. सिद्धांततः व व्यावहारिकदृष्ट्यासुद्धा. अहिंसा ही या सर्व प्रक्रियांची मूळ प्रेरणा असते. अहिंसेचा हा सकारात्मक आविष्कार अणवस्त्रविरोधी, लष्करीकरणविरोधी चळवळीतून पुढे येत आहे.

### बिगर-पक्षीय राजकारण

नव्या समाजवादाची वाटचाल ही राजकारणाच्या विविध माध्यमांतून होत आली आहे. समाजातील सत्तासंतुलनात व निर्णयप्रक्रियेत परिवर्तन घडविणे हा जर राजकारणाचा अर्थ असेल, तर सध्याच्या अनेक चळवळी हे राजकरण करत आहेत. त्या परिवर्तनाचे पक्षबाह्य राजकारण बळकट करत आहेत. त्यांच्यामुळे पक्षीय राजकारणालाही नवे मुद्दे, नवे आयाम मिळाले. गेल्या काही दशकांत राजकीय, सामाजिक कार्यकर्त्यांनी सध्याच्या पक्षीय राजकारणाविषयी गंभीर आलोचना केली आहे. पक्षीय राजकारणाचे आजचे केंद्रीकृत व भ्रष्ट स्वरूप हे केवळ त्यात चांगले लोक नाहीत म्हणून नाही, तर त्याचे कारण संरक्षणात्मकही असते. पुरोगामी








पक्षही, त्यांच्यावर होणाऱ्या टीकेला पात्र नाहीत, असे नाही. शिवाय, सध्याच्या चळवळी-आंदोलने यांच्या पक्षांसंबंधी भूमिका ही बरीच बदललेली आहे. अनेक संघटनांनी निवडणुकांच्या राजकारणात भाग घेतला आहे; पक्षांशी संघर्ष-सहकार्याचे धोरण ठेवले आहे.

वस्तुतः, राजकारण - समाजकारणाच्या सर्व आघाड्यांवर, गाव ते आंतरराष्ट्रीय प्रतलांवर विविध पक्ष, संघटना, आंदोलने, विधायक समूह, तज्ज्ञ, आपापल्या परीने संघर्ष, रचना, संशोधन, सल्ला-दबाव (लॉबिंग), नवी माहिती आदी काम करत असणे ही बहुलता पुरोगामी राजकारणाची शक्ती आहे. या बिरादरीचा उपयोग करून घेणे आवश्यक आहे. त्यासाठी पुरोगामी पक्षांनी चळवळीचे मुद्दे अंगीकृत करणे परस्परहिताचे ठरेल.

या चळवळींनी राज्ययंत्रणेवर तर सतत टीका केली, त्याविरुद्ध संघर्षही केला आहे, मात्र त्यांनी राज्याचे अस्तित्व वा प्रयोजन नाकारले नाही. एखाद्या गोष्टीवर टीका करणे म्हणजे तिचे अस्तित्व नाकारणे नव्हे; उलट त्याची अधिमान्यता गृहीत धरून अपेक्षा व्यक्त करणे असेदेखील असू शकते. राज्याची ऐतिहासिक गरज मान्य करताना, ते कसे असावे या अपेक्षा, मागण्या पुढे आल्या. तसेच सर्वशक्तिमान व केंद्रीकृत राज्य पुरस्कार त्यांनी नाकारले व निर्णयप्रक्रिया लोकांच्या हाती असण्याचा पुरस्कार केला. राज्याचे अस्तित्व गृहीत धरून, अधिक विकेंद्रित संरचना, त्याहीपेक्षा व्यापक राजकीय समूहाचे (पोलिटिकल सोसायटी) स्थान व अधिकार आहेत, ही भूमिका अधिक लोकशाहीवादी आहे.

**नवा आंतरराष्ट्रीय वाद**

आधीच्या समाजवादी परंपरेप्रमाणे, पर्यायी चळवळींनीही विकासाच्या प्रश्नाचे आंतरराष्ट्रीय धागेदोरे स्पष्ट केले. भारतातील खेड्यापाड्यांवरील विपरित विकासाचा, पर्यावरणीय व सामाजिक दुष्परिणामांचा संबंध भारतातील सरकार व त्याच्या धोरणांशी तर आहेच; मात्र जागतिक बँकेसारख्या आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्था, बहुराष्ट्रीय कंपन्या, प्रगत देशांच्या अर्थ-राजकारणाशीसुद्धा आहे, हे साधार विशद केले. १९९२-९३ च्या जागतिकीकरणाच्या धोरणाच्या आधीपासून, नर्मदेसारख्या चळवळींनी १९८० च्या दशकातच जागतिक बँकेच्या तिसऱ्या जागातील विनाशकारक विकासधोरणाला थोपविण्यासाठी आव्हान दिले होते. त्यासाठी विविध देशांतील पर्यावरणीय व वसाहतविरोधी संघटनांच्या बरोबरीने या संस्था व बड्या भांडवली शक्तींनी, बड्या राष्ट्रांच्या धोरणविरोधाच्या मोहिमा चालवल्या व लढ्याला आंतरराष्ट्रीय परिमाण दिले. जागतिकीकरणाविरोधातील भूमिका ही वर्चस्वपरिघाच्या व स्वातंत्र्याच्या व्यापक भूमिकेवर आधारित आहे. जागतिकीकरणामुळे उत्पादन, उपभोग (कंझुम्शन) वितरणाच्या लोकशाही प्रक्रयेत अडथळा पैदा होतो व फक्त भांडवलाच्या जोरावर अधिक चांगल्या, उपयोगी व बहुल उत्पादन-उपभोग प्रक्रियेला दाबले जाते. त्यांचे सांस्कृतिक व सामाजिक राजकारण तर अधिकाधिक स्पष्ट होत जात आहे. हे सर्व जनसंघटना व संबंधित तज्ज्ञांनी अभ्यासपूर्ण रीतीने समोर आणले.

१९९० नंतर जागतिक व्यापार संघटना व बहुराष्ट्रीयबाजार व भांडवलाच्या खुल्या वर्चस्ववादी राजकारणाविरोधातील व लष्करीकरण-अण्वस्त्रविरोधी जागतिक चळवळींचा भारतातील संघटना महत्त्वाचा भाग आहेत. १९९६ मध्ये सुरू झालेल्या 'परपल्स ग्लोबल ॲक्शन' या खुल्या भांडवलशाही व कोणत्याही प्रकारच्या शोषण-वर्चस्वाच्या विरोधातील समता लोकशाही व पर्यावरणीय विकासासाठी लढणाऱ्या अनेक प्रकारच्या समूहांच्या, संघटना व व्यक्तींच्या खुल्या मंचाचे जनआंदोलनाच्या राष्ट्रीय समन्वयासह अनेकजण भाग आहेत. सिॲटिकल, वॉशिंग्टन, प्राग, क्युबेक इत्यादी ठिकाणच्या संघर्षात अनेक भारतीय संघटना सहभागी झाल्या होत्या. या सर्व प्रयत्नांतून समता, शांतता व खऱ्या विकासाचा एक नवा आंतरराष्ट्रीयवाद विकसित होत आहे. भांडवलशाहीच्या जागतिकीकरणाला हा नवा आंतरराष्ट्रीय वाद हे उत्तर ठरेल.

**उत्तर-आधुनिक वादापलीकडे...**

प्रचलित विकास संकल्पना व पद्धती ही वास्तवातील घटकांना परस्परांपासून व व्यापक संदर्भापासून तोडू पाहते. या प्रयोगशालेय- क्लिनिकल (वैज्ञानिक नव्हे) पद्धतीचे व्यवस्थेचे आकलन होण्यात अडचण निर्माण होते. त्यातून अ-राजकीयीकरणाच्या (डी-पोलिटिसायझेशन) शक्यता वाढतात. काही अपवाद वगळता, सध्याच्या पर्यायी आंदोलन-चळवळींतून अशा परस्पर- परिणामकारी समग्रतेची संकल्पना रुजत आहे. एका धरणाच्या लढ्यात तांत्रिक मुद्द्यांपासून सामाजिक, आर्थिक, राजकीय, वैज्ञानिक, विकासाच्या मुद्द्यांपर्यंत सर्वांचा समावेश होतो. तर आजचे नागरी-ग्रामीण प्रश्न, नैसर्गिक संपदेचा विनाश, विषम वाटप, केंद्रीकरण, वर्चस्ववाद, धर्म, राज्यविषयक व आंतरराष्ट्रीय संदर्भ, सांस्कृतिक - सामाजिक बाबी, जीवनशैली या सर्वांच्या संदर्भात प्रश्न आकळायचे असतात व उत्तरे शोधायची असतात.

उत्तर-आधुनिक आकलन-विश्लेषणासंबंधी बलस्थानाचा मर्यादित वापर करून या चळवळी आपली स-संदर्भतेची, समग्रतेची सैद्धांतिक अवजारे आपल्या राजकीय कृतीच्या दृष्टीने महत्त्वाची मानतात. भोवतालच्या परिस्थितीतच याची निकड अंतर्निहित आहे. सर्वोदयी आंदोलन, हमाल-पंचायत, समान पाणीवाटप, कष्टकऱ्यांची आंदोलने, गिरणगावचा संघर्ष, अंधश्रद्धा निर्मूलन, छत्तीसगढ, नर्मदा बचाओ यांसारखी आंदोलने, मच्छिमार-आंदोलन, राजस्थानातील माहितीच्या अधिकारांचे आंदोलन, अण्वस्त्रविरुद्धची चळवळ व अनेक विधायक कामे इत्यादींच्या राजकारणातून वेगवेगळ्या प्रकारे उत्तर-आधुनिकोत्तर जाणीवपूर्वक राजकीय कृतीची चिन्हे दिसतात.

नव्या समाजवादाला आव्हान भांडवलशाही व मूलतत्त्ववादी संघटना, हितसंबंधीय, प्रसिद्धीमाध्यमे, तज्ज्ञ व राज्यकर्त्यांकडून आहे. त्याचा तपशील सर्वचजण जाणतात. पर्यायी विचार व राजकारण हे समाजाला अधिक उन्नत व जीवन अधिक समृद्ध करण्याचे साधन आहे, हे लोकांपर्यंत पोचविण्याचे व जागतिकीकरणाच्या काळात आणखी एक आवाहन आहे. पर्यायी विकास व समाजवाद म्हणजे काहीतरी वेगळी व असाधारण (ॲबनॉर्मल!) बाब आहे व त्या नेहमीच वेगळ्या (द अदर) असतात. त्या नेहमीच व्यापक समाजाच्या जाणिवांच्या परिघावर राहतात, ही धारणा काढावी लागेल. रूढ विकासाऐवजी, समाजवाद हा आपल्या अधिक चांगल्या समृद्ध (एनरिचड्) जीवनासाठी आवश्यक व सहज शक्य आहे, हे ठसवणे व समाजवादाला साधारण स्थितीत स्वीकारार्ह व नॉर्मल चर्चाविश्वाचा (डोस्कोर्स) भाग करणे आवश्यक आहे. सध्या स्थितीवादी व भांडवली शक्तींनी पुन्हा एकदा माध्यमांमधून व राजकीय अभिजनांच्या निर्णयांतून पर्यायी विचार व राजकारण दाबून टाकण्यात, त्याच्या विकृतीकरणास जोर लावला आहे. अशावेळी सर्व परिवर्तनवादींनी कल्पकतेने व एकदिलाने वेगवेगळ्या आघाड्यांवर काम करणे जरूरी झाले आहे.

येथेच आणखी एक आवाहन आहे. त्याचा सर्वच चळवळींना विचार करावा लागेल. पुरोगामी व समाजवादी चळवळीला वजाबाकीच्या राजकारणाचा व अहंकार, असूया, असहिष्णुतेच्या व विनाकारण फाटाफुटीच्या क्षुद्रवादी राजकारणाचा शाप आहे. यातच आता भर पडली ती फक्त संशोधन-लिखाण हीच राजकीय कृती आहे असे मानून राजकीय कृती व जबाबदारी असलेल्या चळवळींना पिंजऱ्यात उभे करणाऱ्या मठांची व त्यातील रिसर्चर जातीची. सतत निराशा करणाऱ्या सध्याच्या वातावरणात, राजकीय जबाबदारीने, थकेपर्यंत कामातच असणाऱ्या कार्यकर्त्यां-समोर अशा पूर्णवेळ 'रिसर्चर्स' किंवा 'फुलपाखरां'च्या अर्धवट व काल्पनिक माहिती-विश्लेषणाचा प्रतिवाद करण्याचे त्राण नसते. आपल्या संघर्षाविषयी ही मंडळी राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय विद्यापीठे, सेमिनार्स इत्यादी ठिकाणी काय पेपर्स लिहितात-बोलतात त्यांची खुद्द त्या लोकांना व कार्यकर्त्यांना माहितीच नसते. मात्र असे रिसर्च-संशोधन (रिसर्च) पुढे इतिहास वा प्रमाण भाष्य म्हणून रूढ होतात. हे सांगण्याचे हेतू बौद्धिकता विरोध (अँटि-इंटलेक्चुअलिझम) नाही. स्वतंत्र अभ्यासक व कार्यकर्त्यांकडून चळवळींचे व त्यांच्या मुद्द्यांचे सिद्धांतीकरण, वाद-विवाद, टीका-आलोचना महत्त्वाची आहे व विश्लेषणात पुढे जाण्यासाठी त्याची आवश्यकता आहे. चळवळींना दयाभावाची (पेट्रनायझिंग वृत्ती)ची अपेक्षा नाही. मात्र कोणत्याही विश्लेषणात खरेपणाची, सहिष्णु लोकशाही वृत्तीची, प्रामाणिकतेची व जबाबदारीची जोड असावी ही अपेक्षा स्वतःला परिवर्तनवादी म्हणवून घेणाऱ्यांकडून राहील. इतरांकडून तशी अपेक्षा असण्याचे कारणच नाही. समाजवादाच्या नव्या वाटचालीत, ग्राम्सीच्या कल्पनेतील राजकीय कृती व सिद्धांत यांचा, तसेच ज्ञान व कार्यकर्ते यांचा द्वंद्वात्मक, डोळस व जैवसंबंध रहावा यासाठी संघटनेचे अधिक जाणीवपूर्वक प्रयत्न राहवेत.

या चळवळींचे परस्पर समन्वयाचे व एकजुटीच्या राजकीय हस्तक्षेपाचे प्रत्येक प्रांतात व भारतीय पातळीवर काही प्रयत्न जारी आहेत. महाराष्ट्राच्या पातळीवर शेतकरी-शेतमजूर समन्वय समिती, लोकविज्ञान चळवळ, शोषित जनआंदोलनापासून भारतीय पातळीवर जनआंदोलनाच्या राष्ट्रीय समन्वयापर्यंत या प्रक्रिया अनेक बाह्य-अंतर्गत आवाहनांना तोंड देत जारी आहेत. जागतिकीकरणवादी धोरणांना विरोध, पर्यायी विकास धोरणांसाठी प्रयास, सेक्युलर व समतापूर्ण सामाजिक-राजकीय संरचनेसाठी प्रयत्न, अशा मुद्द्यांवर हा समन्वय आधारित आहे. अशा समन्वयाच्या प्रयत्नांच्या यशापयशाचेसुद्धा आकलन व्हावे.

यांतूनच नव्या समाजवादाचे दर्शन व राजकारण आकार घेत आहे. याची अधिक जाणीवपूर्वक दखल घेतली जावी व जोपासना व्हावी.

('साधना' ऑगस्ट २००२)



अनुक्रमणिका

(मुखपृष्ठ क्र. २ वरून)

तुलसीदासजींचा मंत्र अनुभवांचे सार आहे. विनोबा म्हणत होते, 'मंदिरात प्रवेश करतेवेळी आपले जोडे, चप्पल, वहाणा देवळाबाहेर काढा आणि मग मंदिरात प्रवेश करा.' म्हणून आपली मतमतांतरे आणि राजकीय पक्षांचे जोडे गावाबाहेर काढून आपण ग्रामसभेच्या मंदिरात नागरिक या नात्याने प्रवेश करूया.

**गावाची त्रिविध शक्ती :**

भारतात गावांची त्रिविध शक्ती हे कार्य संपन्न करील. गावांच्या लोकांची देशात असणारी बहुसंख्या, शरीरश्रमाचे कार्य करण्याची क्षमता व एकतेस सोडून गावकरी कोणाच्या भरवश्यावर जगणार? धनबल, विद्याबल त्यांच्याजवळ नाही. म्हणून जे त्यांच्याजवळ आहे त्यांचीच अस्त्र-शस्त्रे बनवून आपणास हा संग्राम करावा लागेल. भारतीय संस्कृतीतील सत्याग्रहाचे अस्त्र काढून आम्ही विदेशी साम्राज्यातून मुक्त झालो. आता गावाचे **शोषण, व्यसने, आळस, भ्रष्टाचार मिटविण्यासाठी** विज्ञानाचा उपयोग करून याच एकीच्या व सत्याग्रहाच्या शस्त्राने संग्राम करावयाचा आहे. म्हणून ग्रामसभेस सक्रिय करून हे संपन्न करूया. राळेगणसिद्धीत व हिवरे बाजारात जर हे होऊ शकते तर आमच्या गावात का होऊ नये? प्रत्येत गावात असे विचार करणारे ५-१० युवक व भगिनी मिळतील. त्यांचे संगठन बनवून ५ वर्षे सक्रीयतेने काम केले तर काय होऊ शकणार नाही? श्रमदानाने लाखो रुपयांचे काम दरवर्षी होऊ शकते. स्वदेशीचा मंत्र जागविला, गावाबाहेर बनलेल्या वस्तूंचा, विशेषतः विदेशी वस्तूंचा - साबण, ब्रश, पावडर व पेस्ट, जोडे, तेल इ. व कोका-कोला सारख्या शीतपेयांचा - संपूर्ण बहिष्कार केला, नायलॉन-टेरोलीनचा बहिष्कार करून सुती वस्त्र वापरले. एक खादीचा पोषाख पहिले पाऊल म्हणून केला तर शक्ती येईल. आत्मविश्वास वाढेल व शोषण क्षीण होईल. (१) त्याचबरोबर कायदेमंडळात जाणाऱ्यांनी आश्वासनानुसार काम केले नाही तर त्यांना परत बोलविण्याचा घटनेत बदल करून अधिकार, तसेच (२) केंद्र व राज्य सरकारच्या विषयांच्या प्रमाणेच ग्रामसभेच्या विषयांच्या चौथ्या सूचीचा घटनेत संशोधन करून अंतर्भाव व (३) घटनेतील ३६ ते ५१ पर्यंत असणाऱ्या नीतिनिर्देशक तत्त्वांना मौलिक अधिकाराचे स्वरूप देणे ज्यामुळे याबाबतीत कोणीही न्यायालयात जाऊ शकेल, असे करण्यासाठी संविधान-संशोधनातून मतदारांची संमती घेऊन वातावरण बनवावे लागेल.

साऱ्या दुनियेतील सर्व विकसित व अविकसित राष्ट्रांत राज्यसत्ता व अर्थसत्तेने संयुक्तपणे सामान्य माणसाच्या विरुद्ध षड्यंत्र केले आहे. २४ जून १९८१ मध्ये विश्वातील ५३ नोबेल पारितोषिक विजेत्यांनी जिनेव्हा, रोम, ब्रुसेल्स, बर्न, पॅरिस ओटावा व न्यूयॉर्क या महानगरांतून संयुक्त अपील काढून घोषणा केली की 'आजची राजनीती व अर्थव्यवस्था करोडो लोकांच्या भूकमरीसाठी जबाबदार आहेत. त्यांना भाकरीचे आश्वासन देण्यात त्या व्यवस्था असमर्थ ठरल्या आहेत व माणसांना पायदळी तुडवत आहेत. जर या व्यवस्थेने स्वतःस बदलण्यास नकार दिला तर विश्वाचा नाश होण्याची अटळ शक्यता आहे. विश्वातील शक्तिशाली लोकांनी हवेची दिशा ओळखून बदल केले तर फार चांगले. अन्यथा गांधीप्रणीत शांतिमय आंदोलनाचा आश्रय घेऊन दुनियेच्या दुर्बलांना आत्मघात करण्यापासून रोकावे लागेल. मानवीय मूळ अधिकारांचे कायदे सोडून, लोकांचे संघटन बनवून शेष सर्व कायद्यांविरुद्ध असहयोग पुकारला व गांधीजींच्या सत्याग्रहाच्या रस्त्याचे वरण केले तर आजचे विश्वव्यापी संकट टळू शकते.'

इंग्रजांची सत्ता हटविण्यासाठी सुरू झालेला पहिला स्वतंत्रता संग्राम १९४७ मध्ये पूर्ण झाला. आज ५८ वर्षे झाली. झोपण्याच्या बाबतीत आपण लोकांनी कुंभकर्णावरही ताण केली. म्हणून अनेक दिशांनी राष्ट्राची अधोगती झाली. आता आम्ही जागले पाहिजे. प्रथम स्वतंत्रता संग्रामाने निर्माण झालेल्या ऊर्जेने काही काम झाले. आता नवीन ऊर्जा निर्माण केल्याशिवाय कोणताही मौलिक बदल होणे शक्य नाही. या द्वितीय स्वतंत्रता संग्रामास अनेक वर्षांचा उशीर झाला आहे. परंतु 'जब जागे तब ही सबेरा.' गांधीजींनी सांगितले होते. 'अजूनसुद्धा फार उशीर झालेला नाही आणि बिघडलेले मामले ठीक करण्याची वेळ गेलेली नाही. जर आपण स्वार्थाचा त्याग केला, सेवेची भावना जागवली व पाखंड सोडले. सत्याचा स्वीकार करून इमानदार व नैतिक बनावे.' हे त्यांचे कथन आजही लागू आहे. आता तरी उशीर व्हायला नको.

**(भारत काल, आज व उद्या : परंधाम प्रकाशन २००५)**



हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




